# प्रेमचंद : व्यक्ती आणि वाङ्मय

: लेखक :

चंद्रकांत बांदिवडेकर




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

प्रकाशक :

सचिव,

**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ**

मंत्रालय, मुंबई ४०००३२

**मूल्य : रुपये १८-००**



मुखपृष्ठ :

**सुभाष अवचट**

मुद्रक :

**सौ. कांता जयसिंग नलावडे**

शिल्पा आर्टस,

सी / ४ दीप अपार्टमेंट

छेडा नगर मुंबई-८९

## : अ नु क्र म णि का :

# दोन शब्द

१९८० हे प्रेमचंद जन्मशताब्दी वर्ष. या वर्षी सर्व भारतीय भाषात प्रेमचंदांच्या साहित्याचा परिचय करून घेतला गेला, परिसंवाद झाले, व्याख्याने झाली. हिन्दीमध्ये प्रेमचंदांच्या वाङ्मयाचा पुनर्विचार झाला. मराठीमध्येही सरकारी / निमसरकारी / खाजगी स्तरावर प्रेमचंदांच्या साहित्याविषयी अनेक कार्यक्रम आयोजित करण्यात आले.

पण एक उणीव तीव्रतेने भासत होती. प्रेमचंदांच्या साहित्याचा परिचय करून देणारे नियतकालिकांचे विशेषांक प्रसिद्ध झाले तरीही हे प्रयत्न तसे स्थायी स्वरूपाचे नव्हते. मराठीत प्रेमचंदांवर लहान–मोठी एक दोन पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत. तरीही त्यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने (व त्यांच्या मृत्यू-नंतर सुमारे ४० वर्षांनी) मराठीत प्रेमचंदांच्या वाङ्मयाचा समीक्षणात्मक परिचय करून देणाऱ्या ग्रंथांची आवश्यकता होती.

साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेन्द्र बार्लिंगे यांच्या मनात एक व्यापक कल्पना घोळत होती. सर्वच महत्वाच्या भारतीय साहित्यिकांचा समीक्षात्मक परिचय मराठीतून वाचकांना व्हावा अशी योजना त्यांनी हाती घेतली. 'आंतर भारती' हे त्या योजनेचे नामकरण. या योजनेचा भाग म्हणून प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित होत आहे. प्रेमचंदांच्या साहित्याचा अभ्यासक या नात्याने प्रेमचंदांवर मराठीत समीक्षात्मक ग्रंथ प्रसिद्ध व्हावा अशी माझी तीव्र इच्छा होती व डॉ. बार्लिंगे यांच्या मनात महत्वाकांक्षी योजना आकार घेत होती. या दोन्ही गोष्टींचें फलित म्हणजे हा ग्रंथ. हा ग्रंथ लिहिण्याची संधी मला मिळाली हे माझे भाग्य. मी व्यक्तिशः डॉ. सुरेन्द्र बार्लिंगे यांचा आणि साहित्य संस्कृती मंडळाच्या कार्यकारिणीतील सदस्यांचा फार आभारी आहे.

प्रेमचंदांच्या साहित्यावर हिन्दीमध्ये खूपच लिहिले गेले आहे. या ग्रंथातील समीक्षात्मक लेखनासाठी अप्रत्यक्षपणे त्याचा उपयोग झाला असला तरी हे सर्व लेखन स्वतंत्र व मौलिक आहे. प्रेमचंदांच्या जीवन कहाणीसाठी प्रेमचंदांचे सुपुत्र

श्री. अमृतराव यांच्या 'कलम का सिपाही' या ग्रंथाचा व डॉ. कमलकिशोर गोयनका यांच्या 'प्रेमचंद विश्वकोश' भाग १–२ या ग्रंथांचा विशेष उपयोग झाला. दुसरे प्रकरण हैद्राबादहून निघणाऱ्या 'पंचधारा' या त्रैमासिकाच्या प्रेमचंद विशेषांकात प्रकाशित झाले होते. त्यात काही बदल केलेले आहेत.

या ग्रंथाच्या लेखनात माझी पत्नी सौ. लीला बांदिवडेकर यांची खूप मदत झाली.

प्रेमचंदांच्या जन्मशताब्दी निमित्त ही काहीशी स्थायी स्वरूपाची श्रद्धांजली व्यक्त करण्याची संधी लाभली याबद्दल मनात खूप समाधान आहे. या ग्रंथामुळे प्रेमचंदांचे साहित्य वाचण्याची आकांक्षा मराठी वाचकात निर्माण झाली तर या ग्रंथाचे प्रयोजन सिद्ध झाल्याचा आनंद होईल.

फाल्गुन पौर्णिमा शके १९०४

दिनांक २८–३–८३

**चंद्रकांत बांदिवडेकर**

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने अन्य भाषांतील प्रथितयश साहित्यिकांचा आणि त्यांच्या साहित्याचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याची योजना आखली व तिला अनुसरून डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर यांना सुप्रसिद्ध हिंदी साहित्यिक स्व. प्रेमचंद यांची व त्यांच्या साहित्याची ओळख करून देणारे एक छोटेखानी पुस्तक लिहून देण्याची विनंती केली. डॉ. बांदिवडेकर यांनी आमची विनंती मान्य करून सदर पुस्तक लिहून मंडळास सादर केले. हे पुस्तक 'प्रेमचंद : व्यक्ती आणि वाङ्मय' या नावाने प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे. प्रेमचंद शताब्दीचा हा उचित असा समारोप ठरावा. डॉ. बांदिवडेकर यांचे मंडळाच्या वतीने आभार.

**सुरेंद्र बारलिंगे,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

यशोधन,
मुंबई–४०० ००१,
दि. २७ एप्रिल, १९८३.

# प्रेमचंद : धडपडणाऱ्या माणसाची जन्मकहाणी

लमही. बनारसपासून चार मैलावर असलेले एक लहानसे खेडे. मौजे मढवा. पंधरावीस कुणब्यांची घरे, तीन–चार मुसलमानांची, एखादे क्षत्रियाचे, दोन कुंभारांची आणि नऊ–दहा कायस्थांची. शेती कुणब्यांनी करावी, कायस्थांनी सरकारी नोकरीत सेवा करून शान दाखवावी. याच लमही गावात एका कायस्थ कुटुंबात प्रेमचंदांचा जन्म झाला. या कुटुंबाचे मूळ शोधताना हाती येते ते नाव–लाला टीकाराम यांचे. यांच्या तिसऱ्या पिढीतले मुन्शी गुरुसहाय्य तलाठी होऊन ऐरे नावाच्या गावाहून लमहीला आले. (लाला टीकाराम– मनियारसिंह– मैकूलाल गुरुसहायलाल अशी कुटुंब परंपरा) त्यांचे बरोबर त्यांचा पुतण्या होता. हरनरायन लाल. यांचेही वंशज लमहीमध्ये राहिले, वाढले, गुरुसहायलाल– अजायलाल– प्रेमचंद अशी वंश परपरा सरकारी नोकरीचा फायदा घेऊन गुरुसहायलाल यांनी साठ बिघे जमीन आणि काहीशी मायाही जमा केली होती. पण पुढे भाऊबंदकीमुळे हे कुटुंब विखुरले आणि प्रेमचंदाच्या वडिलांपर्यंत येता येता त्या चार भावात फक्त सहा बिघे जमीन राहिली. प्रेमचंदाचे काका महावीरलाल शेती सांभाळू लागले. व बाकीचे तिघे कायस्थांच्या वहिवाटीप्रमाणे सरकारी नोकरीत घुसले. थोडेसे उर्दू फार्शीचे ज्ञान व समजण्याइतपत इंग्रजीचे ज्ञान या बळावर सरकारी नोकऱ्या मिळणे कठीण नव्हते. तिघेही पोष्टात कारकून झाले.

प्रेमचंदाचे वडील अजायबलाल प्रामाणिक व नाकासमोर चालणारे साधे गृहस्थ होते. दहा रुपयांवर चिकटले ते चाळीस रुपयांवर निवृत्त झाले. एकत्र कुटुंबाचे संस्कार होते व कौटुंबिक जबाबदारीही थोडीफार उचलावी लागली. धर्मावर त्यांची फारशी श्रद्धा नव्हती. पण सदाचारावर होती. त्यांना सुदैवानें पत्नी फारच चांगली मिळाली. सुंदर व सुस्वभावी, पण अशा घरच्या लक्ष्मीचे दुःखही मोठे होते. त्यांची मुले जगत नव्हती. दोन मुली वारल्या. तिसरी मुलगी

सुग्गी मात्र जगली. हिच्या पाठीवर ३१ जुलै १८८० रोजी मुलगा जन्मला मोठा गोड, गोरागोमटा, सुंदर पित्याने आनंदाने 'धनपत' नाव ठेवले व मोठ्या चुलत्याने कौतुकाने ठेवले 'नबाब' हेच प्रेमचंद. तीन मुलींच्या पाठीवर झालेला मुलगा— म्हणजे आई बापापैकी एकाचा बळी घेणारच. पण तसे काहीच झाले नाही. आईचा अतिशय लाडका हा नबाब, मोठा चुणचुणीत आणि देखणा होता. तसेच खोडकर पण हुशार होता. आईला सारखी भीती वाटायची याला दृष्ट लागेल. त्यामुळे तिचा सतत दृष्ट काढण्याचा उपक्रम चालू असायचा.

प्रेमचंद लहानपणी अभ्यासापेक्षा खोड्या व उनाडक्या करण्यात पटाईत. आता त्याचे विश्लेषण करता येणे शक्य आहे. त्यांचा पिंड लेखकाचा असल्यामुळे जीवनाचा अनुभव घेण्यात त्याना रस वाटे. ठराविक साच्याचा अभ्यास करण्यापेक्षा काहीतरी निराळें करावे, वेगळे पहावे, नवीन अनुभव घ्यावेत ही ओढ. अर्थात आपण अशा मुलांना व्रात्यच म्हणतो आणि लहानपणी आईला त्याचा त्रासही व्हायचा हे खरे. या बाळाने एकदा 'न्हावी–न्हावी' खेळताना आपल्या मित्राचा कानच कापला. त्या मुलाची आई तक्रार घेऊन भांडत आली. नबाबरायच्या आईने मुलाला यासंबंधी रागवून विचारले नबाबराय दूर साळसूदपणे बसला होता. जसे काही फारसे बिघडले नव्हतेच. नबाबराय शांतपणे उत्तरले छे ! मी तर त्याची हजामत करीत होतो. या खोड्या नेहमीच्या. शेतात घुसून ऊस पळवावे, मटर पळवावी, अचूक दगड मारून आंबे पाडावे. तक्रारी यायच्या, मोठी माणसे रागेही भरायची पण त्या चोरीतही मिठास होती. आणि मोठ्या माणसांनी रागे भरल्याशिवाय या खोड्यांना चव कुठली ? पतंग उडवणे, विटी-दांडू खेळणे यात नबाब फारच पटाईत. या चोऱ्या, खोड्या, खेळ या सर्वांचा मोठा कलात्मक उपयोग नबाबांनी आपल्या साहित्यात करून घेतला आहे.

नबाबरायचे लक्ष मात्र अभ्यासात फारसे नसायचे. लमहीपासून मैल सव्वा-मैल दूर एक मौलवी होते. त्यांचा मुख्य धंदा शिंप्याचा पण फावल्या वेळात ते उर्दू व फारशी शिकवत असत. नबाब आपल्या बंधूबरोबर त्यांच्याकडे शिकायला जात. शिकण्याची फारशी निकड विद्यार्थ्यांनाही नव्हती आणि गुरुजींनाही त्यात फारसे स्वारस्य नव्हते. शाळेच्या नावाखाली घराबाहेर पडून शाळा सुटण्याच्या वेळी घरी

यायचे. मधला वेळ कुठे कसा घालवायचा हे सर्वस्वी प्रेमचंदाच्या मनावर होते. स्टेशनवरून सुटणाऱ्या ट्रेन बघण्यात ते तासन्तास घालवीत. हा त्यांचा छंद एवढा मोठा होता की कोणती ट्रेन कुठे व कधी येते हे एकवेळ स्टेशनमास्तरांना सांगता आले नसते पण प्रेमचंदानी सांगितले असते. एका म्हाताऱ्या माळ्याच्या बागेत काम करायची त्यांना फार हौस होती. दिवसभर हा माळी जे काम करीत असे ते काम प्रेमचंद व त्यांचा भाऊ दोन–तीन तासात करुन मोकळे होत असत. हा माळीही तसा वस्ताद होता. मुलांना काम करू देण्यात आपण फार दया करत आहोत असा तो आव आणायचा. हे प्रेमचंदानेही कळे पण बागेत काम करण्यांची संधीही त्यांना हवीच असे. मास्तरांना वश करण्याची युक्तीही फारच सोपी होती. त्यांना कधी कैऱ्या आणून द्यायच्या तर कधी ऊस, मटर, चणा, हे सर्व दुसऱ्यांच्यांच शेतातले. मास्तरांना पक्षी पाळायचा नाद होता. त्यांच्या पक्षांसाठी किडे आणून दिले की मास्तर खूष असायचे. त्यांच्या वस्तू बाजारातून विकत आणून द्यायच्या, बकरीसाठी कोवळा पाला आणून द्यायचा. चिलीम भरुन द्यायची– अशी गुरुसेवा केल्यावर वर्गात तासनतास बसण्याची काय आवश्यकता? या सर्व गोष्टीत प्रेमचंदामधील एक प्रकारचा खोडकरपणा प्रकट होत होता आणि पुढे त्यांच्या लेखनातही वरून साधा–भोळा भाव पण आतून खोडकरपणा अशी एक गमतीदार किमया आढळते. त्यांच्या 'बडे भाईसाहब' मधे ही किमया उठून दिसते पण हे सर्व असले तरी याच मौलवीकडे प्रेमचंदाच्या उर्दू व फार्शीचा पाया चांगलाच घातला गेला हेही खरे.

प्रेमचंदानी लहानपणी जीवनाचा आनंद मनसोक्त लुटला. अजाणतेपणी पण सृजनशील स्वभावाने तो भरभरून घेतला आणि म्हणूनच जीवनावरचे त्यांचे प्रेम कधीच कमी झाले नाही. जीवन ही एक क्रीडा आहे, जग ही एक रंगभूमी आहे, आणि प्रत्येकाने आपला डाव मनापासून खेळताना हार वा जीत, सहजपणे स्वीकारली पाहिजे. हे त्यांचे विचार केवळ बौद्धिक क्षेत्रातलेच नव्हते. ('रंगभूमि' या कादंबरीत मोठ्या परिपक्वतेने ते स्पष्ट झाले आहेत.) हे विचार त्यांच्या व्यक्तिमत्वाचा भागच झाले होते. लहानपणापासून ही वृत्ती त्यांच्यात आढळते. 'चोरी', 'होली की छुट्टी', 'कजाकी', 'गुल्ली डंडा' या सारख्या अमर कथातून व अनेक कादंबऱ्यातून या लहानपणीच्या घटनांचा त्यांनी वेळोवेळी उपयोग करून घेतला आहे.

त्यांना गूळ फार आवडे. त्यात त्यांचा जिभेवर संयम थोडा कमीच. आई माहेरी गेली असताना तिने यांच्यासाठी वेगळा गूळ काढून ठेवला आणि घरी तीनचार महिने पुरेल एवढा गूळ चांगला बंदोबस्तात ठेवला. प्रेमचंदानी तो सर्वच गूळ येता जाता आठ-दहा दिवसात फस्त करून टाकला. उष्णता होऊन अंग सडेल ही भीती हवी होती पण विवेक जिभेवर नियंत्रण घालू शकत नव्हता. जोडीला मासे पकडून भाजून खाण्याचा वर चिंचा पोटात घालण्याचाही उद्योग होताच.

लहानसहान चोऱ्या करताना बालवयात अपराधीपणा वाटत नाही. फक्त वाटते ते पकडले जाण्याचे भय. एकदा प्रेमचंदानी घरातला एक रुपया चोरला बरोबर चुलतभाऊ हलधर होताच. रुपया तर मिळाला पण तो खर्च कसा करायचा ? घरच्या माणसांच्याही लक्षात येऊ नये व आनंदही खूप दिवस टिकायला हवा. मिठाई घेतली तर पैसे लवकरच संपतील. त्यांची नजर पेरुंवर गेली. दोन पैशाचे पेरु घेतले. पेरुंनी दोघांचे अंगरखे भरून गेले. पेरुवालीच्या हातावर रुपया ठेवला. ती चमकली म्हणाली, ' रुपया कुठे मिळाला बाळानो ? चोरून तर आणला नाहीत ? नबाबरायकडे उत्तर तयार होते, ' मौलवीसाहेबांची फी द्यायची आहे. काकांकडे सुटे पैसे नव्हते. त्यांनी रुपया दिला. दोघे शाळेत गेले तिथे कळले की तलावाजवळ जत्रा आहे आणि मौलवीसाहेब बुलबुल उडवायला जाणार आहेत. पण त्यांनी एक अट घातली. जो धडा पाठ म्हणणार नाही त्याला जत्रेत जायला मिळणार नाही. प्रेमचंद सुटले, हलधर अडकले. पैसे प्रेमचंदांकडे असल्यामुळे हलधर मागे राहिल्याचे त्यांना विशेष वाईट वाटले नाही. पण त्यांनी निश्चय केला होता. हलधर येईपर्यंत पैसा खर्च करायचा नाही. हलधरची वाट पाहून थकले शेवटी त्यांनी रेवड्या घेतल्या व हलधरच्या वाट्याचे पैसे खिशात टाकून घरी निघाले. वाटेत एक मुलगा भेटला. म्हणाला, ' आता घरी जा. मार कसा मिळतो ते बघ. काका हलधरला बडवत घेऊन गेलेत. अरे असा जोरात धपाटा दिला की हलधर खालीच कोसळला, फरफटत ओढत घेऊन गेले. तू मौलवीसाहेबांना जी फी दिलीस तीही परत घेतली. आता काहीतरी युक्ती काढ नाहीतर चांगलाच मार खाशील. ' प्रेमचंद फारच घाबरले. सर्व देवांच्या प्रार्थना सुरू झाल्या, नवस बोलले. गावाजवळ येताना पाय जडावले. रात्र बाहेर काढून सकाळीच घरी जावे म्हणजे राग थंड झालेला असेल असा विचार करू लागले. पण कुणीतरी त्यांना पाहिले. वडिलांनी विक्राळ रूप धारण केले होते. त्यांनी

मारायला हात वर केला तो प्रेमचंद इतक्या जोरात किंचाळले की वडिलांचा हात वरच स्थिरावला, मारण्याआधीच ही अवस्था तर मारल्यावर काय होईल. चाणाक्ष प्रेमचंदानी हे ओळखले आणि जोराने भोकाड पसरले. आत तर विलक्षण दृश्य होते. हलधरला एका खांबाला बांधले होते. त्याचा सबंध देह धुळीने माखला होता व तो स्फुंदून स्फुंदून रडत होता. काकी त्याला रागावत होती. आईने प्रेमचंदाना विचारले, 'रुपया कोणी चोरला ? तू की हलधरने ? प्रेमचंदानी निःशंकपणे सांगितले 'हलधरने' मग तू घरी का सांगितले नाहीस ? प्रेमचंदानी सरळ म्हटले हलधरने दम दिला होता, कुणाला सांगितलेस तर मार खाशील. प्रेमचंद सुटेल त्यांचा हिशेब असा– जिवावर बेतणार असेल तर थोडे खोटे बोलावे. शिवाय हलधर तगडा होता, मार खाल्याने त्याला विशेष काहीच होणार नव्हतं. प्रेमचंद नाजूक होते. त्यांना मार खाणे शक्यच नव्हते. खरी गोष्ट अशी होती की प्रेमचंद बुद्धिमान होते अशा प्रसंगी सर्वच लहान मुलें वागतात त्याप्रमाणे खोटेनाटे करायला मागेपुढे बघत नसत त्यांच्या 'चोरी' या कथेत वरील हकीकत आलेलीच आहे.

या बालपणीच्या सुखाच्या काळात एक अरिष्ट ओढवले. नबाब केवळ आठ वर्षांचे असतांना त्यांची आई वारली. नबाब पोरके झाले. पुढे वडिलांनी दोन वर्षांनी दुसरा विवाह केला, नबाब अधिक एकटा, पोरका, उदास झाला, सावत्र आई त्यांच्या कथातून नेहमीच येते. त्यांना लहानपणीच सिगरेटचा नाद लागला. नको त्या गोष्टी लहान वयातच समजू लागल्या. आणि त्याच बरोबर एकटेपणाची पोकळी भरून काढण्यासाठी एक चांगला नाद लागला– वाचनाचा. ही सुखाची किल्लीच त्यांना सापडली. एका दुकानात त्यांना 'तिलिस्मे– होशरुबा' नावाच्या कथांचे ग्रंथ सापडले. अकबराच्या मनोरंजनासाठी फैज नावाच्या लेखकाने लिहि-लेल्या या काल्पनिक कथा सुमारे पंचवीसहजार पृष्ठांचा हा ग्रंथ या तेरा वर्षाच्या मुलाने दोन–तीन वर्षात वाचून काढला. शिवाय त्या वयात मोह घालणाऱ्या भुता-खेतांच्या कथा, जादूगारांच्या चातुर्यकथा, गुप्त पोलिसांच्या हिकमती, वीरांच्या शौर्यकथा या सर्व कथा त्यांनी वाचल्या. मौलाना हुसेन यांच्या हास्यकथा आणि मिर्जा रुसवा, रतननाश सरशार याच्या शेकडो कथा त्यांनी वाचल्या. कादंबऱ्या संपल्या तेव्हा त्यांनी पुराणकथा वाचायला सुरुवात केली. रेनॉल्डच्या मिस्टरीज ऑफ दि कोर्ट ऑफ चे उर्दू अनुवादही फस्त केलें. एका बुकसेलर्सची पुस्तके मित्रांना

विकायची किंवा त्याचे थोडेसे काम करायचे व ही पुस्तके वाचायची. त्याचे मित्र त्यांना पुस्तकातला किडा म्हणायचे. भावी थोर लेखकाच्या लेखनकार्याची ही जणू पूर्वतयारीच चालली होती.

प्रेमचंदांचे उपजत गुण लहानपणीच दिसत होते. वडिलांच्या दुसऱ्या लग्नाच्या वेळी जमलेल्या मंडळींना त्यांनी एक गजल ऐकवून चकित केले होते. त्याचे एक अविवाहित नातेवाईक त्यांच्या घरी येऊन राहिले होते. प्रयत्न करूनही लग्नाचे कुठे जमत नव्हते. ते एका चांभार स्त्रीच्या प्रेमात पडले. चांभार जमातीला हे आवडले नाही. त्यांनी कट करून एकदा दोघांना एकत्र पकडले. सारा गाव जमा झाला. ती चांभार बाई रडूनभेकून सुटली पण यांना चांगलाच मार मिळाला. ही घटना नाटयत्मक रीतीने लिहून प्रेमचंदांनी ती सर्वांना वाचून दाखवली· त्या गृहस्थांनी मुकाटयाने पाय काढता घेतला ! प्रेमचंदांच्या लेखनाचा हा पहिला विजय होता. त्यांना आपल्यातील सुप्त शक्तीचा पत्ता लागला आणि जबरदस्त आत्मविश्वास त्यांच्यात निर्माण झाला.

प्रेमचंदाचे वडील गोरखपुरमधे होते. प्रेमचंद शालेय परीक्षात जेमतेम पास होत नववीत गेले. पुढे शिकण्याची सोय गोरखपुरला नव्हती. बनारसला जाणे भाग होते. पाच रुपये महिना पाठवायचे वडिलांनी मान्य केले. काशी क्वीन्स कॉलेजमधे ते शिकत होते कारण फी माफ होती. याच सुमारास आणखी एक घटना घडली. प्रेमचंदांच्या जीवनावर प्रभाव टाकणारी. आई वारल्यानंतर त्यांचे बालपण एक प्रकारे कोमेजूनच गेले होते. त्यात त्यांचा विवाह करण्याचा निर्णय घेण्यात आला. हा विवाह त्यांच्या सावत्र आईच्या वडिलांनी ठरवला होता. त्यांच्या एका मित्राच्या मुलीचा उद्धार करण्यासाठी. प्रेमचंद खुलले होते. पुस्तकातून त्यांनी प्रणयाच्या कथा वाचल्या होत्या आता ते सर्व अनुभवायला मिळणार म्हणून ते चांगलेच खूष होते. विवाह ठरला, झाला. प्रेमचंदांनी आपल्या पत्नीला पाहिले आणि रंगीत फुगलेला फुगा टाचणी लागून फुटावा तसे त्याचे फुगलेले मन चिरडून गेले. त्यांची पत्नी लट्ठ, बेढब आणि आचरट होती. चेहऱ्यावर देवीचे व्रण होते. एका पायाने थोडीं लंगडी होतीं, डोक्याने काहीशी अर्धवट होती आणि महिन्यातून एकदा तरी तिच्या अंगावर वारे येत असे. राजबिंडा, कोमल आणि सुंदर नबाब आणि त्याची अशी कुरूप पत्नी !! पहाणाऱ्याच्या मनातही कीव उत्पन्न व्हायची त्यात तिचा स्वभाव कर्कश

आणि भांडखोर होता, प्रेमचंदानाही ती मारण्याच्याही धमक्या देत असे. तुसडच्या स्वभावाची ही स्त्री भांडणं करुन माहेरी गेली की सासरी यायला तयार होत नसे. प्रेमचंदाचे व तिचे पटणे शक्यच नव्हते. प्रेमचंदाच्या वडिलांना इतके वाईट वाटले की या विवाहानंतर दीडच वर्षात काही महिन्यांच्या आजाराने ते निर्वतले. 'माझ्या सोन्यासारख्या मुलाचे वाटोळे झाले' असे या विवाहासंबंधी ते उद्‌गार काढत.

१८९६ मध्ये नबाबचे लग्न झाले. १८९७ मध्ये मॅट्रिकची परीक्षा द्यायची होती. वडीलही वारले होते, नबाब पुढच्या वर्षी परीक्षेला बसले व दुसऱ्या वर्गात उत्तीर्ण झाले. त्यांच्यापुढे प्रश्न निर्माण झाला, क्वीन्स कॉलेजमध्ये पहिल्या वर्गात आल्याशिवाय फी माफ होत नसे. सुदैवाने त्याच वर्षी हिंदू कॉलेज उघडले, प्रवेश परीक्षा झाली. इंग्रजीत त्यांची प्रगती संतोषजनक होती पण गणितात मात्र 'असमाधानकारक' शेरा मिळाला. प्रेमचंद हिहितात– 'गणित म्हणजे गौरीशंकराचे शिखर, मी त्यावर कधीच चढू शकलो नाही' पण प्रवेश पाहिजे तर गणित सुधारणे भाग होते व त्यासाठी शहरात राहणेही भाग होते. सुदैवाने एका वकिलाच्या मुलाला शिकवण्याचे काम मिळाले. पाच रुपये वेतन, दोन रुपयात आपला खर्च भागवून तीन रुपये घरी पाठवण्याचा निर्धार त्यांनी केला. वडिलांच्या मृत्युनंतर सावत्र आईची व एका सावत्र भावाची जबाबदारी त्यांच्यावर आली. एकत्र कुटुंबपद्धतीचे संस्कार झालेल्या त्यांच्या मनाने या जबाबदाऱ्या कधीच नाकारल्या नाहीत. त्या वकिलांच्या घोड्यांच्या तबेल्यात एक लहानशी खोली होती. त्यात रहायची अनुमती त्यांनी मिळवली. एक गोणपाट, एक छोटा दिवा, काही मोडकी भांडी एवढा संसार, खिचडी पकवायची व ती खाऊन वाचनालयात कादंबऱ्यांचे वाचन चालायचे. पंडित रतननाथ यांचे 'फसाना आजाद' त्यांनी याचवेळी वाचले. 'चंद्रकांता संतति' वाचले. बंकिमबाबूंचे उर्दूत झालेले अनुवाद वाचले. त्यांना उसनवारी करावी लागे. कर्ज देणाऱ्यांची तोंडे चुकवण्याचे नशिबी येई. कधी उपास काढावे लागत. पण त्यांच्या वाचनांच्या वेळी कल्पनेच्या राज्यात ते राजे होते, सर्व भौतिक दुःखे तिथे विसरून जात.

याचवेळी एक चांगली घटना त्यांच्या आयुष्यात घडली, एका पुस्तकविक्रेत्याच्या दुकानात जुने पुस्तक विकताना एका पारशी गृहस्थांची त्यांच्याशी गाठ पडली, त्यांनी सहजपणे चौकशी केली, त्यांना आपल्या शाळेत एक शिक्षक हवा

होता आणि यांना कुठेंतरी काम हवे होतेच, अठरा रुपये वेतनावर शाळेत शिक्षक म्हणून प्रेमचंदांची नियुक्ती झाली,

प्रेमचंद लिहितात, 'अठरा रुपये ! !' त्यावेळी माझ्या निराश, व्यथित जीवनात कल्पनेच्या भरारीपेक्षा ते उंच होते, शिक्षक बनून ते बनारसहून दूर चुनारला गेले, बरोबर सावत्र बंधू विजयबहादुर होते. या दोघांचे चांगले सख्य जुळे. इथेही ते पाच रुपयांची शिकवणी करीत. नबाबांचे इंग्रजी चांगले आहे, असा लौकिक पसरला होता व त्याचा त्यांना फायदा मिळे. शिक्षक म्हणून प्रेमचंदांच्या जीवनाला सुरुवात झाली आणि पुढे खूप वर्षे ते शिक्षकी पेशात राहिले.

प्रेमचंद नम्र होते. निगर्वी होते. मोठेपणाचे खोटे ओझे त्यांनी आपल्या खांद्यावर कधी बाळगले नाही. पण ते विलक्षण स्वाभिमानीही होते. शाळेबरोबर एकदा गोऱ्यांच्या टीमची फूटबॉलची मॅच झाली. गोरे हरले. शाळेतल्या मुलानी चिडवण्यासाठी हुर्यो केले. एका चवताळलेल्या गोऱ्याने एका मुलाला बुटाने मारायला सुरुवात केली. प्रेमचंदांना हे सहन झाले नाही. त्यांचे शरीर दुर्बल होते पण मन खंबीर व निर्भय होते त्यांनी मैदानात रोवलेला एक बावटा हातात घेतला व त्या गोऱ्याला पिटायला सुरुवात केली. त्यांचा तो जोर पाहिल्यावर सर्व मुले जमा झाली आणि त्या गोऱ्यांना त्या सर्वांनी चांगलेच पिटून काढले. वरिष्ठांबरोबर न्यायासाठी संघर्ष ही प्रेमचंदांच्या जीवनातली काही पहिलीच घटना नव्हती. याच शाळेत इब्नेअली नावाच्या मौलवीवर अन्याय झाला. प्रेमचंदांनी त्यांची बाजू घेतली. दोघांना शाळेतून काढून टाकण्यात आले. अशातऱ्हेने चुनार येथील वास्तव्य संपले.

प्रेमचंद बनारसला आले. क्वीन्स कॉलेजच्या प्रिन्सिपॉल बेकन यांच्या शिफारशीमुळे प्रेमचंदाची नियुक्ती बहराईचच्या जिल्हा स्कूलमध्ये पाचवे असिस्टंट शिक्षक म्हणून झाली. पगार फक्त वीस रुपये होता. पुढे प्रतापगढ येथे बदली झाली. तिथे एका ठाकुरसाहेबांच्या हवेलीत ते रहात असत. त्यांच्या दोन्ही मुलांना शिकविण्याचे काम करीत. मास्तरकीच करायची तर ट्रेनिंग घेतलेले बरे अशा विचाराने दोन वर्षाची सुटी घेऊन ६ जुलै १९०९ ला ते अलाहाबादला आले. ट्रेनिंग कॉलेजमध्ये प्रवेश घेतला.

त्यांचे वाचन चाललेच होते. आजूबाजूच्या समाजाचे डोळस निरीक्षण चालले होते. ब्राह्मणवर्गाचे ढोंग व दांभिकपणा त्यांना चीड आणत असे. पंडे व महंत यांच्या विलासमय जीवनाबद्दल व खोटेपणाबद्दल त्यांना फार राग येत असे.

हिंदू स्त्रियांवर होणाऱ्या अनेक प्रकारच्या अत्याचारांना व त्यांच्या चाललेल्या आर्थिक व लैंगिक शोषणाला जबाबदार असणाऱ्या लोकांविषयी व समाजव्यवस्थेविषयी त्यांना घृणा वाटे. त्यांनी स्वतःच्या घरात वडिलांचा व सावत्र आईचा विषम विवाह पाहिला होता. त्यांचा स्वतःचा विवाह एका विद्रूप मुलीशी झाला होता. त्यांना हिंदू समाजातील वैवाहिक रुढीबद्दल तीव्र घृणा वाटे. अनेक हिंदू जाति व्यवस्थेला कंटाळून दारिद्र्याला विटून ख्रिश्चन बनताना ते बघत व त्याचे मन विद्रोहाने भरून येई. त्यांची एक कथा 'खून सफेद' याच विषयावर लिहिलेली आहे. त्यांच्या मनावर आर्य समाजाच्या विचारांचा पगडा बसू लागला होता. त्यांच्या या मनःस्थितीचे प्रतिबिंब या सुमारास प्रसिद्ध झालेल्या 'असरारे मआबिद' (देवस्थानचे रहस्य) या कादंबरीत पडलेले दिसते. बनारसच्या 'आवाज ए खल्क' नावाच्या उर्दू साप्ताहिकात ८ ऑक्टोबर १९०३ पासून ही कादंबरी क्रमशः प्रकाशित होऊ लागली. एका ढोंगी, बदमाश व क्रूर महंताच्या दुष्कृत्यांवर त्यांनी प्रखर प्रकाश झोत टाकला आहे. किशोरावस्थेत कल्पित किस्से वाचणाऱ्या या युवकाने सामाजिक दृष्टीने साहित्यविषयांकडे पहायला सुरूवात केली. आणि आधीच्या वास्तव्यापासून दूर असलेल्या साहित्याला वास्तवाभिमुख केले. उर्दू लेखक सरशार यांचा प्रभाव प्रेमचंदामध्ये अधिक प्रखर, अधिक कलात्मक झाला.

१९०४ मध्ये ते ट्रेनिंगची परीक्षा प्रथम वर्गात उत्तीर्ण झाले; पण गणित शिकवण्याची त्यांची असमर्थता सर्टिफिकेटावर नोंदवली गेली. याच सुमारास त्यांनी हिंदी व उर्दू या भाषांची स्पेशल व्हर्नाक्युलर परीक्षा दिली. याच वेळी त्यांना एक मित्र मिळाला– 'जमाना' या उर्दू पत्रिकेचे संपादक दयानारायण निगम. यांची मैत्री अतिशय घनिष्ट झाली. निगमसाहेबांकडे प्रेमचंदाच्या अंतरंगाचे दर्शन घडवणारी व त्यांच्या जीवनातील संघर्षांची प्रत्यक्ष साक्ष देणारी शेकडो पत्रे होती. ते प्रेमचंदाचे मित्र, मार्गदर्शक सहायक, पालक, सर्व काही होते, विचारातले अंतर किंवा विशिष्ट क्षणी घडणाऱ्या चकमकी त्यांच्या मैत्रीतली आंतरिकता कधीच कमी करु शकल्या नाहीत.

ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपाल केम्प्स्टर यांनी जवळच्या मॉडेल स्कूलमध्ये हेडमास्तर म्हणून प्रेमचंदांना नियुक्त करून घेतले व अलाहाबादला बोलावून घेतले, २५ व्या वर्षी हेडमास्तर झालेल्या प्रेमचंदांना या शाळेतील वातावरणात खूप

उत्साह वाटू लागला. पण पुढे तीन महिन्यांनी कानपूरच्या जिल्हा शाळेत आठव्या क्रमांकाचे शिक्षक म्हणून त्यांची बदली झाली.

त्यांची क्रमशः प्रकाशित झालेली 'असरारे मआबिद' प्रेमचंदाच्या दृष्टीने प्रगतिशील असली तरी कलात्मक दृष्टीने खूप कमजोर होती. नव्या लेखकाचे दोष त्यामध्ये दिसून येतात. शिथिल बांधणी, भडक वर्णने, अतिरेक एकांगीपणा, पात्रांचा यांत्रिकपणा, हे दोष आहेत. जीवनाचे विरुपत्व पहाण्याचा सोस अधिक आहे. त्या मानाने त्यापुढील कादंबरी 'हमखुर्मा व हमसबाब' (हिंदीमध्ये ही कादंबरी 'प्रेमा' नावाने प्रसिद्ध झाली) अधिक प्रगल्भ आहे. 'जमाना'मध्ये तिची जाहिरात १९०६ च्या सप्टेंबरच्या अंकात आली आहे. ती १९०७ मध्ये प्रकाशित झाली असावी यातही घटनांचे चक्करदार जाळे, संयोगाची गर्दी, कथेत बसवण्या-साठी चरित्रांच्या विकासाच्या बोथट कडा वा बोलतेपणा हे दोष आहेत, पण वास्तवावरची पकड अधिक घट्ट आहे. या कादंबरीचा नायक अमृतराय पूर्णिमा नावाच्या तरुण विधवेशी विवाह करण्यासाठी आपल्या प्रेमा नावाच्या प्रेयसीला सोडतो. सनातनी लोकांचा विरोध त्याला सहन करावा लागतो. पुढे प्रेमचंदांच्या कथासाहित्यातील नायक वा नायिका समाजातील दृष्ट प्रवृत्तीबरोबर लढा देतात याची बीजे या कादंबरीत आढळतात. त्यांच्या आणखी दोन कादंबरिका 'किशना' व 'रुठी राणी' १९०७ मध्ये प्रकाशित झाल्या. त्यांची एकही प्रत सापडत नाही. 'किशना' मध्ये स्त्रियांच्या अलंकारप्रियतेचा उपहास केलेला आढळतो.

कानपूरला प्रेमचंद निगमसाहेबांच्या हवेलीत राहू लागले. त्यांचे इथले दिवस फार सुखाचे गेले. तिथे साहित्यप्रेमी मंडळींचा अड्डा जमत असे. खूप गप्पा होत. साहित्यचर्चा व हास्यविनोद होत असत. कधीतरी वाटल्याही फुटत. एरवी लाजरे-बुजरे आणि संकोची प्रेमचंद मित्रमंडळीत खुलून गप्पा रंगवीत. त्यांचे उन्मुक्त सातमजली हास्य फार प्रसिद्ध आहे.

हे जीवन त्यांना इतके सुखाचे वाटे की, उन्हाळ्याच्या सुटीत लमहीला जाणे म्हणजे स्वर्गातून साक्षात नरकपुरीकडे जाणे असे वाटायचे. लमहीचे घर खेड्याच्या मानाने बरे असले तरी सुखाने रहाता यावे अशी एकही खोली त्यात नव्हती. उन्हाळ्यात तर जीवघेणा उकाडा व्हायचा. घाम आणि गाई बैलांच्या शेणाची घाण यांनी जीव नकोसा व्हायचा. त्यातच सावत्र आईची व कर्कशा

बायकोची भांडणे, पैशाची ओढाताण, बायकोच्या धमक्या या सर्वांनी प्रेमचंद फार कंटाळून जात. लिहिणे वाचणे अशक्य करून टाकणारे सर्व वातावरण होते. यातच एकदा पत्नीने गळफास लावून जीव देण्याचा प्रयत्न केला पण सासूच्या सावधपणामुळे तो टळला. पण पत्नीने माहेरी जाण्याचा व कधीच न परतण्याचा निर्धार जाहीर केला. प्रेमचंदांनी कशीतरी पैशाची व्यवस्था केली व तिला माहेरी पाठवून दिले. आपल्या नशिबी संसारसुख नाही व या कजाग व विद्रुप बायकोशी जुळते घेणे शक्य नाही असे त्यांना वाटू लागले. आता संसारसुख नाही मिळाले तरी चालेल पण या कजाग पत्नीस नांदवायचे नाही असा निश्चय त्यांनी केला पण तेवढयात एक अशी सुखद घटना घडली की प्रेमचंदाचे एकटेपण संपून गेले.

कोणी देवीप्रसाद (सलेमपूर, कनवार जि. फत्तेपूर) आपल्या बालविधवा मुलीचा विवाह करू इच्छित होता. लग्न झाल्यावर तीन महिन्यानीच त्या मुलीचा नवरा वारला होता. तिने नवऱ्याचे तोंडही पाहिले नव्हते. वर्तमानपत्रातील जाहिरात वाचून प्रेमचंदानी चौकशी केली आणि विधवेशी विवाह करण्याचे क्रांतिकारक पाऊल उचलले. १९०६ मध्ये हा विवाह झाला. हा शिवरानींशी झालेला विवाह खूपच सुखाचा ठरला. प्रेमचंदांची पहिली पत्नी या दुसऱ्या विवाहा-नंतर काही वर्षे जिवंत होती. तिला परत आणण्याचा आग्रह शिवरानीजी करीत होत्या पण प्रेमचंदांनी नकार दिला.

१९०५ ते १९०९ या चार वर्षांच्या काळात कानपूरच्या वास्तव्यात प्रेमचंदावर लोकमान्य टिळकांच्या उग्र राजकीय विचारांचा प्रभाव पडू लागला होता. १९०७ मध्ये 'दुनिया का सबसे अनमोल रत्न' नावाची कथा प्रसिद्ध झाली. फाशी जाणाऱ्या पित्याचे अश्रु ? छे ! एका सतीची राख ? नाही मग ? देशाच्या स्वातंत्र्यासाठी पडलेला रक्ताचा शेवटचा थेंब ! ! असा निष्कर्ष काढणारी ही कथा कलात्मकदृष्टया सामान्य वाटली तरी देशभक्तीच्या उत्कट भावनेने भारलेली ओजस्वी कथा आहे. खुदीरामसारख्या कोवळयापोराला फासाकर चढविणाऱ्या क्रूर इंग्रजांबद्दलची कायमची अढी प्रेमचंदांच्या मनात पडलेली होती. सरकार व प्रेमचंद यात हे खुदीरामचे प्रेत सतत उभे होते. १९०७ मध्ये 'जमाना' मध्ये गॅरीबाल्डीचे जीवनचरित्र त्यांनी क्रमशः प्रसिद्ध केले, त्यासाठी हीच देशप्रेमाची जाज्वल्य भावना होती. विवेकानंदांच्या भारतीय अस्मितेचा प्रभावही त्यांच्यावर खूप पडलेला दिसतो. प्रेमचंद केवळ राजकीय दृष्टया अधिक जागरूक होते असे

नव्हे तर ते आपल्या सामाजिक सहानुभूतीच्या जाणिवांचे क्षेत्रही व्यापक करीत होते. सामाजिक सुधारणा कोणासाठी ? मूठभर मध्यम वर्गासाठी ? या प्रश्नांच्या मुळाशी जाताना त्यांचे मन सर्व भारतीय जनतेच्या सुख-दु:खाचा विचार करू लागे. विवेकानंदासंबंधी लिहिताना ते म्हणतात, 'स्वामीजींचा आदर्श' फार मोठा होता. खालच्या श्रेणीच्या लोकांचा उद्धार करणे, त्यांना शिक्षण देणे व आपलेसे करणे आवश्यक आहे. हे लोकच हिंदू धर्माची मुळे आहेत व शिक्षक वर्ग शाखा. केवळ शाखांना पाणी देऊन वृक्ष पुष्ट होत नाही. त्याच्या विकासासाठी मुळांनाच पाणी दिले पाहिजे. विवेकानंदाच्या विचारांचा हा गाभा पकडताना प्रेमचंदांच्या स्वत:च्या जनवादी विचारसणीचा स्तोत दृष्टीस येतो. कादंबरी हा काळाचा आरसा असतो असे प्रतिपादन करून याच सुमारास त्यांनी उर्दू लेखक सरशार यांच्या बाजूने एक टिपण लिहिले आहे.

१९०९ मध्ये डेप्युटी डायरेक्टर या पदावर त्यांची नेमणूक महोबा येथे झाली. त्यांना कानपूरच्या सुखद वातावरणाला मुकावे लागले पण त्याची उणीव बुंदेलखंड पाहून त्यांनी भरून काढली. त्यांचे वेतन दरमहा पन्नास रुपये होते. १९०८ च्या सुमारास त्यांचा एक कथासंग्रह 'सोजेवतन' हा प्रकाशित झाला होता. सरकारी नोकरी असल्यामुळे तो 'गुलाबराय' या नावाखाली लिहिला गेला. पण लवकरच खरी गोष्ट सरकारच्या कानावर गेली. तातडीने प्रेमचंदांना बोलावले गेले. बैलगाडीत बसून तीस चाळीस मैलांचा रात्रीचा प्रवास करून प्रेमचंद मॅजिस्ट्रेटपुढे उभे राहिले. त्यांच्यासमोर 'सोजेवतन' ची प्रत होती. आता काहीच लपवणे शक्य नाही हे प्रेमचंदाना कळले. त्यांनी पुस्तकाचे लेखक असल्याचे मान्य केले. मॅजिस्ट्रेटने कथांचा गोषवारा विचारला, प्रेमचंदानी तो सांगितला. मॅजिस्ट्रेट गरजले, 'तुमच्या कथा राजद्रोहाने भरलेल्या आहेत, तुम्ही ब्रिटीश सत्तेमध्ये आहात याबद्दल आपल्या नशिबाचे आभार मानायला हवेत. मोगली सत्तेने दोन्ही हात कलम केले असते. तुमच्या कथा एकांगी आहेत. तुम्ही ब्रिटीश सत्तेचा अवमान केला आहे. पण शेवटी शेपटावर निभावले. 'सोजे–वतन' च्या सर्व प्रती सरकारच्या स्वाधीन करायच्या व सरकारच्या अनुमतीशिवाय यापुढे काहीही लिहायचे नाही. या अटीवर समझौता झाला. नोकरीतून बडतर्फीची शक्यता होती. जेलमध्ये जाण्याची शक्यता होती. आता 'नबाबराय' या नावाने लिहिणे शक्य नव्हते आणि प्रेमचंदासारखा प्रचुर लेखन करणारा मनस्वी लेखक दरवेळी सरकारची अनुमती

घेईल हे ही शक्य नव्हते. शेवटी नाव बदलायचे व नवे टोपणनाव घ्यायचे असेही ठरले. निगम यांच्या सल्यावरुन 'प्रेमचंद' हे नवे टोपण नाव घेतले. 'बडे घर की बेटी' ही १९१० मध्ये 'प्रेमचंद' या नावाने प्रसिद्ध झालेली पहिली कथा होय.

या सर्वातून जाताना सरकारी नोकरी सोडून स्वतंत्र धंदा करावा अथवा स्वातंत्र्य अबाधित टिकवील अशा ठिकाणी नोकरी करावी असे विचार प्रेमचंदांच्या मनात घोळत. ते अस्वस्थ होत पण ते जसे भावनाशील होते, स्वाभिमानी–तेजस्वी होते तसेच पक्के व्यवहारीही होते. त्यांची राहणी फार साधी होती व गरजाही फार मर्यादित होत्या. दोन वेळ जेवणाची सोय होईल, जाडाभरडा कपडा मिळेल एवढी तरी व्यवस्था व्हायला हवी होती. इंडियन प्रेसचे मालक चिंतामणी घोष यांनी प्रेमचंदांना त्यांच्या संकल्पित 'उर्दू' मासिकाचे संपादक व्हायचे निमंत्रण दिले पण प्रेमचंद सरकारी नोकरी सोडण्याचा निर्णय घेऊ शकत नव्हते. 'जमाना' मध्ये त्यांनी यावे असे निगमनी सुचवून पाहिले पण किमान आर्थिक हमी त्यांनी घ्यावी अशी प्रेमचंदानी अट घातली. ती पाळणे निगमसाहेबांना केवळ आर्थिक स्थितीमुळे शक्य नव्हते. मारवाडी स्कूलमध्ये असिस्टंट शिक्षक म्हणून काम करायला त्यांचे मन तयार नव्हते. लेखनावाचनाच्या सवलतीसाठी किमान हेडमास्तरची जागा त्यांना हवी होती.

प्रेमचंदांना लिहिण्यावाचण्याचे व्यसन जबरदस्त होते. फिरतीवर असताना त्यांना पुष्कळशी नियतकालिके मिळत नसत. ही व्यथा ते निगमसाहेबांना वरचेवर कळवीत. ते कुठेही बसून तावचे ताव लिहू शकत असत. पोटावर उपडे निजून हवेत पाय हलवीत ते आपले लेखन करीत. असा एक अनुभव त्यांचे मित्र प्यारेलाल शाकिर यानी नमूद केला आहे. पण शांतवेळी लिहिण्यावाचण्याची साधीशी इच्छाही पुरी होत नसे. आर्थिक ओढग्रस्त नेहमीच असे. निगमसाहेबांना लिहिलेल्या पत्रातून त्यांच्या आर्थिक अडचणींचे स्वरूप लक्षात येते. एका पत्रात ते लिहितात–'जर फारसे कष्ट होणार नसतील तर तीन-चार रुपयांचे एक घड्याळ व साडेचार रुपयाचे जुते पाठवू शकाल तर आपला ऋणी होईन. एकाच पार्सलामध्ये दोन्ही वस्तू येऊ शकतील. माझ्या वहाणा छोटकने घेतल्या आणि मी आता अनवाणी फिरतो आहे.' ही मागणी आपल्या निकटच्या मित्राकडे केली आहे आणि निगमसाहेबांच्या 'जमाना' मध्ये ते लिहीत त्याच्या मोबदल्यात केली आहे.

हे लक्षात घऊनही प्रेमचंदांसारख्या लेखकाची ही विपन्नावस्था पाहून मनाला घरे पडतात. निगमसाहेब पैसे मिळवण्यासाठी काही धाडसी उपाय सुचवीत. एकदा प्रेमचंदांनी त्यांना लिहिले. 'एंटरप्राईज रिकाम्या खिशाने आणि केवळ हवाई गप्पांनी तर होत नाही. तुम्ही असा एखादा मार्ग सांगा की माझी भाकरी मिळवताना मी एंटरप्राईज करू शकेन.' प्रेमचंदांचा हा व्यवहारीपणा लक्षात घेतला तर त्यांच्या रक्तात शेतकऱ्याचा प्रवाह वाहतो आहे असे दिसून येते. व्यवहारी हेतूनेच ते ट्रेनिंगसाठी वळले. पुढे बी. ए. व्हायचेही त्यानी ठरवले

महोबाच्या फिरतीच्या नोकरीला ते कंटाळले होते आणि दहा रुपये कमी घेऊन शिक्षकाची नोकरीही करायला ते तयार झाले होते. याच काळात त्यानी 'रानी सारंधा' व 'राजा हरदौल' सारख्या कथा लिहिल्या. बुंदेली साहस व शौर्य, सौंदर्य व निसर्ग यांनी या कथांचा पट विस्तृत केला आहे.

वयाच्या बत्तिसाव्या वर्षी प्रेमचंदानी इंटरची परीक्षा दिली. सुदैवाने गणित हा विषय सक्तीचा राहिला नव्हता आणि म्हणूनच ते इंटर पास होऊ शकले. इंग्रजी साहित्य, तर्कशास्त्र, फाशी, आधुनिक इतिहास हे त्यांचे विषय होते. परीक्षा सोपी नव्हतीच. शिवाय मुंशीजींचे वय लक्षात घेता फारच अवघड होती पण ते द्वितीय श्रेणीत पास झाले.

१९१२ मध्ये 'जत्वाए इसार' प्रसिद्ध झाले. हिंदू मुसलमान समस्या हा एक मुंशीजींचा काळजीचा विषय होता. राष्ट्रीय जीवनातील ही एक प्रखर समस्या होती आणि इंग्रजांच्या फूटपाड्या धोरणाने ही दरी रुंदावत चालली होती, असा प्रेमचंदाचा विश्वास होता. या समस्येविरुद्ध त्यांची चाललेली झुंज त्यांच्या अनेक कथांतून स्पष्ट होते. वर उल्लेखलेल्या कादंबरीत प्रेमचंदांच्या पुढच्या कथा साहित्यात आढळून येणाऱ्या जन आंदोलनाचे स्त्रोत आढळतात. असंतोषाच्या लहानशा ठिणगीने आगीचे प्रचंड रुप घ्यावे आणि जनतेच्या प्रक्षोभा पुढे ऐहिक शक्तींनी नमते घ्यावे असे अनुभव यात व्यक्त झालेले आहेत. यात साकार झालेली काहीशी हिंदुत्ववादी मनोवृत्ती प्रेमचंदांची त्यावेळची तात्कालिक मन:स्थिती असावी. कारण आपल्या सर्व लेखनात संप्रदायवादी संकुचित विचारांना त्यांनी तीव्रपणे विरोधच केला आहे. या कादंबरीत प्रेमचंदामधील कलावंत अधिक शक्तिमान झालेला दिसतो. ग्रामीण जीवन, होळीचे सण, विलासमय जीवन याचे चित्रमय वर्णन करण्यात आणि मानवी स्वभावाची प्रभावी चित्रे रेखाटण्यात खूपच

प्रगल्भता आढळते. प्रेमचंदाची वास्तवावरची पकड किती भक्कम आहे याची ही कादंबरी जाणीव करून देते. याच उर्दू कादंबरीचे रुपांतर पुढे ' वरदान ' या हिंदी कादंबरीत झाले. या कादंबरीला ' प्रतापचंद ' या नावानेही ओळखले जाई.

प्रेमचंदाना महोबा येथे पोटाचा विकार जडला व वर्ष दीडवर्षात त्यांचे स्वास्थ पार बिघडले. या विकाराने त्याना आयुष्यभर त्रास दिला. गोरेपान राजबिंडे, सुंदर दिसणारे प्रेमचंद अकाली वृद्ध दिसू लागले. त्यांची बस्ती जिल्ह्यात बदली झाली आणि त्यांची तब्येत फारच बिघडली. शेवटी त्यांना वैद्यकीय उपचारासाठी अर्धपगारी रजा घ्यावी लागली. बस्ती येथे असताना त्यांचा ' प्रेमपचीसी ' हा कथासंग्रह प्रसिद्ध झाला. याच सुमारास प्रेमचंद हिंदीमध्ये लिहू लागले होते. उर्दूतला अनुभव फारसा चांगला नव्हता. पुस्तके योग्य वेळी प्रकाशित होत नव्हती. चांगल्या रीतीने तर प्रकाशने होतच नव्हती. पहिली आवृत्ती संपायला वर्षांनुवर्षे लागत शिवाय लेखकाला मानधनही फारच कमी मिळत असे. त्यामानाने हिंदीचा वाचकवर्ग मोठा होता. वेगाने पुस्तके प्रकाशित होत होती, आणि उर्दूच्या मानाने लेखकाला पैसाही बरा मिळत होता. याचवेळी बस्ती जिल्ह्यात तहसीलदार म्हणून मन्मननाथ द्विवेदी यांची नेमणूक झाली आणि त्यांचा प्रेमचंदाशी परिचय झाला. त्यांच्या आग्रहाने प्रेमचंदांना हिंदीत लिहिण्याची जोराची प्रेरणा मिळाली.

प्रकृतीच्या जाचाला कंटाळून शेवटी प्रेमचंदांनी आपली शिक्षक म्हणून नेमणूक करून घेतली. ' नॉर्मलस्कूल ' मध्ये गोरखपूरला ६० रुपये पगारावर ते असिस्टंट शिक्षक म्हणून काम करू लागले. त्यांचे हेडमास्तर बेचनलाल हे फार चांगले गृहस्थ होते. व प्रेमचंदावर त्यांची चांगली मर्जी होती. त्यांनी बोर्डिंग हाऊसचे सुपरिटेंडेंट केले व १५ रुपये बढती दिली. फर्स्टएड ट्रेनिंगला पाठवले व आणखी दहा रुपये वाढवून दिले. या शाळेचे वातावरणही चांगले होते, तिथे घरही चांगले मिळाले होते. मोठे प्रशस्त अंगण होते. महावीर प्रसाद पोद्दार हे नवे मित्र त्यांना लाभले. प्रेमचंदांना हिंदीत लिहायला लावण्यात यांचाही वाटा महत्वाचा आहे. घरच्या अंतस्थ कटकटी होत्या. शिवराणीजी कडक स्वभावाच्या व अभिमानी होत्या. त्यांचे व सावत्र आईचे खटके उडत. सावत्र भावाला प्रेमचंद शिकवत असत पण त्याला शिक्षण घेणे जमले नाही. पुढे त्यांनी त्याला बुक्कीपिंग व टायपिंगचा कोर्स करण्यासाठीं लखनौला पाठवले. आपल्या सावत्र भावाच्या मिळकतीत प्रेमचंद

भागीदार बनू पहातात असा आरोप सावत्र आईने प्रेमचंदावर केला. प्रेमचंदांना खूप वाईट वाटले व रागही आला. सावत्र आई व सावत्र भावासाठी जे आजवर केले त्यावर हे बोळा फिरवल्यासारखे होते. ते रागाने पत्नीला म्हणाले, 'ज्या दिवशी मला दुसऱ्याच्या कमाईवर जगण्याची पाळी येईल त्या दिवशी मी विष खाईन.' या कटकटींनी त्यांना मानसिक त्रास व्हायचा. पण त्यांचा राग दीर्घकाळ टिकत नसे. स्फोट व्हायचा व निचरा व्हायचा. मनात गाठ पडत नसे. अढी नसे कुढणे नसे. त्यांचे मन आरशासारखे स्वच्छ होते.

प्रेमचंद हिंदीत लिहू लागले, याआधी ते लेखन आधी उर्दूत करीत व मग हिंदीत त्याचा अनुवाद करत असत. शेख सादींवर त्यांनी हिंदीतच पुस्तक लिहिले. टॉलस्टॉयच्या कथांचे अनुवाद हिंदीत केले. त्यांच्या हिंदी कथांचा पहिला संग्रह 'सप्तसरोज' १९१७ साली प्रकाशित झाला. 'बडे घर की बेटी', 'सौत', 'सज्जनता का दंड', 'पंच परमेश्वर', 'नमक का दारोगा', 'उपदेश', व 'परीक्षा' या त्या सात कथा हिंदीतील काही सर्वोत्कृष्ट मानल्या जाणाऱ्या कथा यात आहेत. प्रेमचंदांना माणसाच्या मनाचे खेळ दाखवण्याची खूप आवड होती. कथेत मनुष्याच्या मनाचे अंतर्भेदी विश्लेषण असायला हवे हा त्यांचा आग्रह होता. त्यांच्या वरील काही कथात हे विश्लेषण आढळते. यावेळी लेखक म्हणून प्रेमचंदाना हिंदी प्रदेशातच नव्हे तर बाहेरही मान्यता मिळू लागली होती. गुजराती व मराठी भाषांतून त्यांच्या कथांची भाषांतरेही होऊ लागली होती.

प्रेमचंदांचा दुसरा लघुकथा संग्रह मुंबईच्या 'हिंदी ग्रंथ रत्नाकर' ने प्रकाशित केला, 'नवनिधि' पुढे 'प्रेम पूर्णिमा' नावाचा आणखी एक कथासंग्रह प्रकाशित झाला. 'ईश्वरीय न्याय' सारखी उत्तम कथा या संग्रहात आहे.

याच सुमारास प्रेमचंदांची प्रख्यात उर्दू कवी फिराक गोरखपुरी यांच्याशी मैत्री झाली. ते संध्याकाळी फिरायला जात, गप्पा मारीत, साहित्यिक वादविवाद होत. वैचारिक मतभेद असूनही त्यांची मैत्री प्रगाढ होती. याचे मुख्य कारण म्हणजे प्रेमचंदांचा मनमोकळा व प्रेमळ स्वभाव. माणसाला त्याच्या अंगभूत दोषां-सह स्वीकारण्याची व त्याच्यातील गुणांचा गौरव करण्याची वृत्ती प्रेमचंदांमध्ये होती. नव्या लेखकांच्या प्रतिभेचा शोध घेणे व त्या प्रतिभेला उत्तेजन देणे हा प्रेमचंदांचा फार मोठा गुण होता. नवोदित लेखकांना ते योग्य तो सल्ला देत असत

पण तो देताना नवोदितांच्या स्वाभिमानाचेही भान ठेवीत असत. आणि म्हणून नवीन लेखकांशीही त्यांचे चांगले जमे. नवीन लेखकांनाही प्रेमचंद आपल्यातलेच वाटत आले. छोटा–बडा हा भेदभाव प्रेमचंदांकडे नव्हता ते नोकरांशीही अतिशय आपुलकीने वागत असत. शाळेतील शिक्षकांचे तर ते चाहते होतेच पण विद्यार्थीवर्गही त्यांच्यावर फार खुश होता. फिराकसाहेब हाडाचे कवी होते. प्रेमचंदांना मात्र काव्याविषयी फारशी आवड नव्हती. याला फक्त अपवाद म्हणजे इकबालचे काव्य. प्रेमचंदांना जोरदार, कठोर, पुरुषी असे गद्य आवडत असे. कोमल, हळवे, स्त्रैण असे भावनात्मक वाङ्मय फारसे आवड़त नसे. पण विचारात असा मूलभूत फरक असूनही त्यांची व फिराकची मैत्री आजीवन टिकली.

प्रेमचंदांना त्यांच्या आर्थिक ओढग्रस्तीने व आजारीपणाने खूपच छळल. १९१७ साली म्हणजे वयाच्या ३७ व्या वर्षी एका पत्रात ते लिहितात. 'माझ्या बाबतीत म्हातारपणाचा उल्लेख व्यर्थ आहे. मी म्हाताऱ्यापेक्षा वेगळा थोडाच आहे?' आणखी एका पत्रात ते लिहितात. जीवनाची उमेद इथेसुद्धा कमीच दिसते... मृत्युची चिंता जीवघेणी वाटते. ईश्वरावर विश्वास ठेवावा असे कित्ती वाटते! पण मन मोठे खराब आहे. मानतच नाही. कोण्या महात्म्याचा सत्संग घडला तर ठिकाणावर येईल. काळजी एवढीच आहे की मी जर गेलो तर या मुलांना कोण विचारील ?– पत्नीने काटकसर करून दोन अडीच हजार रुपये जमा केले होते. त्यावर ते कितीतरी इमले हवेत बांधीत असत. 'पैसा कसा मिळवावा' यावर लिहिलेले पुस्तक त्यांनी संग्रही ठेवले होते. कधी कधी व्याजावर पैसे देत असत पण मुद्दलही परत येत नसे. लॉटरीचे तिकीट ते खरेदी करीत असत. शेअर खरेदी करण्याचे मनसुबे बांधत असत. पैशाचा लोभ नव्हता पण जरुरीपुरता पैसा मिळवून निश्चितपणे लेखन करावे असे त्यांना सारखे वाटे. आर्थिक विवंचनांनी या माणसाला पोखरले होते पण जिजीविषा एवढी दांडगी की काळजीचा ढग जरा दूर गेला की आनंदाचा झरा वाहू लागे. आकाश गडगडावे तसे हास्याचे स्फोट होत!

मित्रांसाठी त्यांचे मन आसुसलेले असायचे. लाहोरहून जनाब इम्तियाज अली 'ताज' एक नियतकालिक प्रकाशित करत– 'कहकशाँ' त्यांची प्रकाशन संस्थाही होती. तिचे नाव– 'दारुल इशअत' मुंशीजी 'कहकशाँ' मध्ये लिहीत. दोघांची प्रत्यक्ष भेट अशी कधी झाली नव्हती. पण पत्रांच्या सहाय्याने ते मित्र

झाले होते. २९ जानेवारी १९२१ रोजी एका पत्रात प्रेमचंद लिहितात 'आपली भेट होईल की नाही ? माझे या जगात काही मोजकेच मित्र आहेत. आपण या वर्तुळातले एक खास सदस्य आहात, पण दुःखाची गोष्ट अशी की आपला चेहरा मोहराच मी अजून पाहिला नाही. एक फोटोच का पाठवीत नाही ? पुढे दोघांची दोस्ती अधिकच घनिष्ट झाली. ताज साहेबांचे राष्ट्रीय विचार प्रेमचंदाना आपले वाटत. निगमसाहेबांचा 'जमाना' फारसा चांगला निघत नसे. त्यांची प्रकाशन व्यवस्थाही सुमार होती. त्यामानाने ताज यांचा प्रेस चांगला होता. पुढे मागे त्यांच्या 'दारुल इशाअत' प्रकाशन संस्थेतर्फे पुस्तके छापली जाण्याची शक्यताही होती. वाज साहेबांकडे झुकण्यात हा व्यवहारी विचारही काही अंशी प्रेरक झाला असेल.

१९१६–१७ मध्ये प्रेमचंद 'बाजारेहुस्न' लिहित होते. ही कादंबरी मुळात उर्दूमध्ये लिहिली पण तिचे हिंदी रुपांतर 'सेवासदन' आधी १९१७ साली प्रकाशित झाले. या कादंबरीने हिंदीत एका नव्या युगाचा प्रारंभ झाला. या कादंबरीला प्रकाशकाने बाराशे रुपये दिले. या कादंबरीत प्रेमचंदांना खरा सूर गवसला, समाजातील ढोंग, दंभ, अन्याय, विषमता यावर प्रखर हल्ले करणे हे त्यांचे ध्येय ठरले. सर्वात अधिक शोषित स्त्रीच्या विविध प्रश्नांकडे त्यांचे लक्ष प्रकर्षाने जाऊ लागले. 'सेवासदन'ने हिंदी कादंबरीला सामाजिक वास्तवाशी प्रतिबध्द केले. मनोरंजक, घटनाप्रधान वाङ्‌मयाची परंपरा साहित्यातील मानाच्या स्थाना-वरून खाली ढळली. पदमसिंह शर्मा, रामदास गौड सारख्या समीक्षकांनी त्यावर गौरवपूर्ण लेख लिहिले. एका वर्षातच पहिली आवृत्ती संपली. त्यामानाने उर्दूमध्ये तिचं स्वागत झाले नाही.

सुमन या मध्यमवर्गीय तरुण स्त्रीच्या जीवनाची करुण कहाणी या कादंबरीत येते. या सुंदर व सुशील तरुणीला वेश्याव्यवसाय स्वीकारावा लागतो. मध्यम वर्गातली आर्थिक स्थिती, प्रतिष्ठेची खोटी कल्पना, हुंडा समस्या, सुधारणावाद्यांचा पोकळ शाब्दिक वितंडवाद, सनातनी समाजाचा अमानुषपणा, मध्यम वर्गीय मनाचा कमजोर ध्येयवाद इत्यादी वास्तवाचे अनेक घटक या कादंबरीच्या अनुभवविश्वात कलात्मक पातळींवर एकजीव होऊन येतात. या कादंबरीने प्रेमचंदांना हिंदी कादंबरीच्या युगप्रवर्तनाचे श्रेय दिले व हिंदी कादंबरी वास्तवोन्मुख होऊन वाटचाल करु लागली.

याच वेळी देशात दडपशाही वाढत होती. मॉटेग्यू सुधारणांचे फेकलेले तुकडे मवाळवादी चिघळू पहात होते. पण एका बाजूला वृत्तपत्रे, सभा यावरील बंधने अधिक मजबूत केली जात होती. इंग्रजांना युद्धासाठी जवान हवे होते, जनतेचे पाठबळ हवे होते, पैसा हवा होता. याप्रसंगी टिळक व गांधी यांनी वेगवेगळ्या भूमिका घेतल्या होत्या. प्रेमचंद सरकारी नोकरीत घुसमटत होते. ते राजकारणा-कडे बारकाईने पहात होते. प्रत्यक्ष राजकारणात उतरायची त्यांची तयारी नव्हती. पण राजकारणाची जाण सामान्य वाचकापर्यंत पोचविणाऱ्या स्वातंत्र्य सैनिकाचे महत्त्वाचे काम त्यांना करायचे होते. तेच आपले खरे काम आहे असे त्यांना वाटत होते. प्रेमचंदानी भारतातील बुद्धिवादी वर्गाचे चांगले निरीक्षण केले होते. आणि हा वर्ग सुखसुविधांच्या, मानमरातबाच्या आणि हे मिळवून देण्याऱ्या पैशाच्या मागे लागून आत्मरत बनत चालला आहे असे त्यांचे मत होते. वकील, डॉक्टर, प्रोफेसर इत्यादी समाजातील शिक्षित मंडळी काय किंवा सरकारी अधिकारी काय जनतेचे शोषण करण्याच्या वेगवेगळ्या मार्गांना आपल्याकडून हातभारच लावीत आहेत असे त्यांना ठामपणे वाटत होते. खेड्यात राहणाऱ्या सामान्य शेतकऱ्याला जमीन-दार वर्ग, सरकारी अधिकारी वर्ग आणि धर्माच्या नावाखाली चालणाऱ्या निरनिराळ्या रूढी पिळून काढीत आहेत व त्यांची घोर फसवणूक करीत आहेत हे प्रेमचंदाना बारीक सारीक घटनातून दिसत होते. शेतकऱ्यांमध्ये रशियातील समाजवादी प्रयोगाबाबत उत्सुकता निर्माण झाल्याचे त्याना दिसत होते. त्यांच्या 'गोशाए आफियत' या कादंबरीत या सर्वांचे प्रतिबिंब दिसते.

त्याचबरोबर गांधीजींच्या नेतृत्वामुळे शिक्षितांवर होणाऱ्या चांगल्या संस्कारां-चाही परिणाम त्यांच्या लक्षात येत होता. गांधींच्या हृदयपरिवर्तनाचा सिद्धांत सर्वबाबतीत खरा ठरणे शक्य नव्हते पण काहीवर लगेच प्रभाव पडत होता हे सत्य नाकारून चालणार नाही. २ मे १९१८ मध्ये प्रेमचंदानी 'गोशाए आफियत' चे लेखन सुरू केले व २५ फेब्रुवारी १९२० ला संपविले. या काळातील राष्ट्रीय घडामोडीवर आधारीत अशी ही कादंबरी होती. हिंदीमध्ये 'प्रेमाश्रम' या नावाने ही कादंबरी प्रसिद्ध झाली. शेतकरी वर्गाच्या सर्वंकष पिळवणुकीचे इतके हृदय-विदारक वास्तव चित्र क्वचितच पहायला सापडेल. प्रेमचंद गांधीजींच्या नेतृत्वाकडे आकर्षिले जात होते. गांधींच्या विचारांना त्यांनी पूर्ण मान्यता दिली होती असे म्हणणे बरोबर नाही पण त्यांच्या सामर्थ्याविषयी व नेतृत्वाविषयी ते निःशंक होते.

याच काळात मुन्शीजींचा बी. ए. चा ही अभ्यास सुरु होता. ते बी. ए. ची परीक्षा द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण झाले.

१९१८ चे युद्ध संपले. इंग्रजांना विजय मिळाला व विजयोत्सव सुरु झाला. या विजयोत्सवाच्या शाळेतील कार्यक्रमात प्रेमचंद सामील झाले नाहीत. शिक्षण संचालक मॅकेन्झी यांनी याबाबत जाब विचारला व प्रेमचदांनी लेखी जाब दिलाही हे प्रकरण वाढण्याची शक्यता होती पण हेडमास्तरांनी ते कसेबसे दाबून टाकले प्रेमचंद स्वाभिमानी होते आणि या बाबतीत ते गोऱ्या साहेबाशी टक्कर द्यायला मागेपुढे पहात नसत. मुंशीजींची गाय एकदा कलेक्टरांच्या आवारात गेली. यावरून कलेक्टरांनी मुंशीजींना जाब विचारला. मुंशीजींनी न डगमगता त्यांच्याशी वाद घातला. असेच एकदा एका कलेक्टराने त्याना विचारले, ' मी रोज यावेळी फिरायला जातो. तुम्ही सलाम कसा करीत नाही ?' प्रेमचंदांनी उत्तर दिले, ' मी माझ्या कामात व्यग्र असतो. या बाजूने जो जाईल त्याला सलाम करीत राहणे माझ्या ड्युटीत नाही.' ही शाब्दिक लढाई वाढली. शेवटी प्रेमचंदांनी दरडावून सांगितले, ' आता मुकाट्याने येथून पाय काढा. नाहीतर शाळेतील शिक्षक व विद्यार्थी तुमचा चांगलाच समाचार घेतील. कलेक्टरसाहेबांनी मुकाट्याने पलायन केले. प्रेमचंद नम्र होते पण स्वाभिमानी होते आणि स्वराज्याच्या त्या वातावरणात निर्भयपणा वाढत होता. याच वातावरणात ' प्रेमाश्रम ' लिहिली जात होती.

याबरोबर घरच्या आपत्ती होत्याच. प्रेमचंदांचा एक मुलगा अकरा महिन्यांचा होऊन देवीच्या आजाराने वारला. त्याना अपार दुःख झाले. ते त्यानी सहनही केले पण मनावर कुठेतरी विलक्षण औदासिन्याची दाट छाया पडली. दुःखात एखाद्याने सिनिकल हास्य करावे तसे प्रेमचंदांनी मित्राला लिहिले, ' लेकिन मैं खुश हूँ कि फ़िक्र का आधा बोझ सर से दूर हो गया।' मुलाच्या मृत्युनंतरचे हे उद्‌गार बापाच्या दुःख पचवण्याच्या प्रक्रियेतून आले आहेत. पुढे ' पूस की रात ' सारख्या असामान्य कथेत नीलगाईनी शेताचा फडशा पाडल्यावर शेतकरी असाच ' खुश ' (?) होतो. दुःख पचवण्याची व व्यक्त करण्याची ही तिरकस पद्धत त्यांच्या कथा साहित्यात अनेक ठिकाणी दिसते.

अतिसाराच्या आजाराने त्यांना जेरीला आणले होते. ते कधी चिडचिडे होत तर कधी छोट्या छोट्या कारणांवरून खूप रागावत. एकदा त्यांनी स्लेट नि

पेन्सिलसाठी पैसा घेऊन गेलेल्या धन्नूला (श्रीपतराय) हुक्क्याच्या नळीने यथेच्छ बदडून काढले कारण काय तर त्याने पेन्सिल आणली नाही व पैशाचे काय झाले हे तो सांगू शकला नाही. विहिरीत धन्नू पडला व त्याच्या जवळ असलेल्या मोठ्या बहिणीने घाबरून स्वत:ही उडी घेतली. दोघे कसेबसे वाचले पण प्रेमचंदांनी मुलीला खरपूस चोप दिला. या सारख्या त्यांच्या स्वभावाशी विसंगत घटना मधून मधून घडत. शारीरिक ताकदही हळूहळू तोकडी होत होती. मानसिक बळही कमी झाले होते त्यामुळे मधून मधून त्यांचा तोल जात असे. दु:खाची गोष्ट अशी होती की जगाला विवेकाचे धडे देणाऱ्या या प्रतिभाशाली लेखकाला वैयक्तिक जीवनात हादरून टाकणाऱ्या परिस्थितीने असहाय करून टाकले होते.

पण या माणसाची परिस्थितीशी झुंजण्याची ताकद विलक्षण होती. एम्. ए. करायचा विचार करत होते पण तो सोडावा लागला. प्रेस घेण्याचेही मनोरथ रचत होते. कलकत्त्याला त्यांचे बंधू (मेहताबराय) ज्या प्रेसमध्ये काम करीत तो विकला जाणार होता. प्रेमचंद तो विकत घ्यायलाही तयार झाले होते पण व्यवहारदक्ष शिवरानीजींनी सांगितले की जर प्रेस विकत घ्यायचा असेल तर तो मेहताबराय यांच्या नावावर न घेता मोठ्या मुलाच्या (धन्नूच्या) नावावर विकत घ्यावा. यातून दोन भावांमध्ये मनोमालिन्य निर्माण करणारा पत्रव्यवहार झाला व शेवटी प्रेस घेण्याचा बेत थंड झाला पण प्रेस विकत घ्यायची इच्छा अधिकच बळावली.

८ फेब्रुवारीला गांधीजी गोरखपूरला आले. त्यांना पहायला प्रचंड समुदाय जमला होता. गांधीजींच्या उपस्थितीचा प्रेमचंदांच्या मनावर फार परिणाम झाला. खरे तर तो परिणाम प्रखरपणे सक्रीय व्हावा याला गांधीजींची उपस्थिती कारणीभूत झाली एवढेच. गांधींच्या विचारांशी प्रेमचंदाच्या मनाची तार पूर्वीपासून जुळली होती. त्यांनी शिवरानीजींशी चर्चा केली. त्यांनी दोन दिवस विचार करण्यासाठी संधी मागून शेवटी सहमती दर्शवली. थोडे दिवस थांबून नोकरी सोडली असती तर दोन महिन्यांचा पगार फुकट हाती पडला असता. तसा सल्लाही मित्रांनी दिला. पण प्रेमचंदानी तो स्वीकारला नाही. पवित्र कामात सौदेबाजी असू नये असे त्यांचे मत होते. विद्यार्थ्यांचे त्यांच्यावर अतोनात प्रेम होते. अनेक विद्यार्थीही त्यांच्याबरोबर शाळा सोडायला तयार झाले. पण प्रेमचंदानी त्यांना सल्ला दिला की ' मी वयाच्या आता अशा अवस्थेत आलो आहे की नोकरी-

शिवायही काही करू शकेन. तुमचे तसे नाही. तुम्हाला अजून तुमचे सर्व जीवन घडवायचे आहे.

नोकरीचा राजीनामा दिला. १५ फेब्रुवारी १९२१ रोजी १६ तारखेला तो मंजूर झाला व ताबडतोब प्रेमचंदांनी सरकारी घर सोडले.

प्रेस काढण्याचा विचार अधिकच बळावला. त्या आधी कपडयाचा कारखाना काढला. त्यात ७–८ हातमाग होते. चरखे बनवले जात होते. चरख्याच्या धंद्यात महिनाभर नशीब अजमावून पाहिले. हे सर्व धंदे पोटा पुरते देण्यास अपुरे होते. त्यांनी वर्तमानपत्रात वा मासिकात कॉलम लिहून देण्यासंबंधी विचारणा केली पण १६ कॉलम मजकूरासाठी त्यांना पन्नास रुपयेही मिळत नव्हते. 'आज' मध्ये ३ रुपये प्रति कॉलमप्रमाणे महिन्यात चार लेख देण्याचे काम स्वीकारले. महावीर प्रसाद पोद्दार 'असहयोगमाला' प्रकाशित करीत होते त्यात प्रेमचंदांच्या तीन कथा प्रकाशित झाल्या. 'स्वराज्य के फायदे' नावाची एक पुस्तिका त्यांनी लिहिली. पण हा सर्व प्रयत्न साधी राहणी असलेल्या या महान लेखकाला निर्वाहाचीसुद्धा हमी देऊ शकत नव्हता.

शेवटी राजीनामा दिल्यावर चार महिन्यांनी कानपूर येथे मारवाडी विद्यालयात हेडमास्तर म्हणून त्यांची नियुक्ती झाली. तिथेच ऑगस्टमध्ये दुसरा मुलगा अमृतराय याचा जन्म झाला. त्याला बन्नू म्हणत.

प्रेमचंद नियमित लेखन करणारे लेखक होते. स्फूर्तीसाठी थांबून राहणारे ते लेखक नव्हते. ही 'लक्झरी' त्यांना परवडणारी नव्हती. व त्यांची प्रतिमा तशी लहरीही नव्हती. दिवसामाजी काहीतरी लखन करणारा हा लेखक पहाटे उठत असे. लेखणी व दौत घेऊन बसे. थंडी असली तर कांबळे ओढून चार पाईवर उताणे पडून पाय मुडपून घेऊन ते लिहीत असत, तर कधी पोटावर निजून हवेत पाय हलवीत जमिनीवर ठेवलेल्या कागदावर झरझर लिहीत असत. कधी रात्री जागत असत तर कधी पहाटें उठून लिहू लागत. त्यांच्या तब्येतीची काळजी करणाऱ्या शिवरानीजींना हे आवडत नस. त्या त्यांच्यावर रागवत, हातातली लेखणी फेकून देत असत, दिवा मालवून टाकत असत. पण निजानीज झाल्यावर प्रेमचंद हळूच उठत व लिहू लागत. यासबंधी मोठी चित्रात्मक वर्णनें शिवरानीजींनी आपल्या 'प्रेमचंद अपने र में' या पुस्तकात केली आहेत.

लेखन हा त्यांचा एक प्रकारचा लढाच होता. स्वातंत्र्यासाठी अनेक पातळ्यांवर अनेक प्रकारचे लढे लढले जात होते. हा स्वातंत्र्याचा पाईक आपल्या कुवतीप्रमाणे आणि प्रकृतीगुणांप्रमाणे लेखनाचे क्षेत्र निवडून लेखणीने लढत होता. अमृतराय यांच्या भाषेत ' हा बिनवर्दीचा लेखणीधारी शिपाई ' होता. देशासाठी व गरीब जनतेसाठी लेखणी अक्षरश: राबविताना त्याला कसलाही संकोच वाटला नाही.

प्रेमचंद इतिहास, समाजशास्त्र व राजकारण या विषयाचे विद्यार्थी होते. त्यांचे या विषयावरचे वाचन व निरीक्षण जबर होते. पण पांडित्यपूर्ण वाचनापेक्षा त्यांची भिस्त आपल्या दांडग्या ' कॉमनसेन्स ' वर होती. त्यांची विवेकशक्ती जबर होती. दिवसेदिवस काँग्रेसचे बळ वाढत होते आणि स्वार्थापोटी आलेल्या वर्गांना वा व्यक्तीला त्यात राहणे कठीण होऊ लागले होते. काँग्रेस जनताभिमुख होऊ लागली तसे तिच्यातील अंतर्विरोधही प्रकट होऊ लागले. प्रेमचंदांच्या कथासाहित्यात काँग्रेसच्या अंतर्विरोधांची व नेतृत्वाची उत्तम मीमांसा आढळते. निवडणुकांचे राजकारण करणारी मंडळी, नेतृत्वाचा शिथिलपणा, बुद्धिजीवी वर्गाचा दुतोंडीपणा व आत्मकेंद्रितपणा, व्यापारीवर्गाचे ढोंगी चारित्र्य या सर्वांवर त्यांच्या साहित्यात प्रकाश टाकलेला आहे. प्रेमचंदांनी राष्ट्रीय आंदोलनाच्या पार्श्वभूमीवर ' संग्राम ' नावाचे नाटकही लिहिले आहे.

राष्ट्रीय संग्रामाचे विद्रूप अंग म्हणजे हिंदू-मुसलमानांचे दंगे, प्रेमचंदांवरची आर्यसमाजी वैचारिक छाप आता फारच कमी झाली होती. मुसलमानांशी हिंदूंनी अधिक समजूतदारपणे वागावे असे त्यांचे मत होते. या समस्येचा त्यांनी खूप आत्मीयतेने विचार केला. त्यांनी एक लेख लिहिला. तो ' कहतुर्रिजाल ' व ' जमाना ' मध्ये छापण्यासाठी निगमसाहेबांकडे पाठवून दिला. तो छापण्याची हिंमत निगमसाहेबांना होईना. त्यांनी नऊ महिने तो तसाच ठेवला पण अखेर प्रेमचंदांच्या तगाद्यानंतर तो त्यांनी छापला. यावर खूप वादळ उठले. प्रेमचंदांनी हिंदूंच्या संकुचितपणावर खूप ताशेरे झोडले होते. प्रेमचंदांनी हिंदूंमध्ये गंभीर नेतृत्वाचा अभाव आहे असे प्रतिपादन केले होते. हिंदूंनी त्यांना चांगलेच धारेवर धरले तर मुसलमानांनी हिंदुंच्या संकुचितपणाचा दाखला म्हणून याचा चांगलाच उपयोग करून घेतला. लेख १९२४ च्या फेब्रुवारीत छापला गेला. दंगे होतच राहिले. प्रेमचंदांनी हिंदू-मुसलमानांच्या ऐक्याच्या दृष्टीतून ' कर्बला ' नावाचे

नाटक लिहिले. स्वतःच्याच प्रसमध्ये ते छापण्यासही सुरुवात केली पण नंतर आर्थिक अडचणींमुळे ते नाटक दुलारीलाल भार्गव यांच्याकडे दिले. १९२४ मध्ये ते हिंदीत प्रकाशित झाले पण उर्दूमध्ये ते आलेच नाही. ‘ जमाना ’ मध्ये क्रमशः छापले गेले तेवढेच. ‘ कर्बला ’ चा विषय प्रेमचंदांना खूप आवडला होता. हजरत हुसेन ‘ कर्बला ’ मैदानात शहीद झाले होते. मोहरम म्हणजे त्यांची स्मृती व त्यांच्या मृत्यूचा शोक. या लढाईत हजरत हुसेन यांच्याबरोबर काही हिंदूही शहीद झाल्याचे प्रेमचंदानी दाखवले होते. हे नाटक लिहिण्यात त्यांचा उद्देश एवढाच होता की मुसलमानांच्या इतिहासाची हिंदूंना माहिती व्हावी आणि हिंदू–मुसलमान ऐक्याचे काही धागेदोरे जनतेपुढे आणून वैमनस्याची धार कमी करावी. पण हे नाटक हिंदूंना तर आवडले नाहीच पण मुसलमानांनीही नाके मुरडली. याचे प्रेमचंदाना खूप वाईट वाटले.

नोकरीत संघर्ष चाललाच होता. शाळेचे व्यवस्थापक काशीनाथ यांचे व प्रेमचंदांचे फारसे पटत नसे. प्रेमचंद आपल्या शिक्षकांवर पुरेसा दाब ठेवत नाहीत असे काशीनाथांना वाटत असे. सर्व संबंध प्रेमावर आधारलेले असावेत असे प्रेमचंदाना वाटत असे. शिक्षक त्यांच्यावर खुश होते. शेवटी कंटाळून प्रेमचंदानी हेडमास्तरकीचा राजीनामा दिला. ताबडतोब ‘ मर्यादा ’ मासिकाचे संपादक म्हणून ते बनारसला गेले. ते लमहीमध्ये राहत व चालत शहरात येत. त्यांच्या या संघर्षाविषयी प्रेमचंद लिहितात. ‘ सर्व आयुष्यात हेच स्वप्न पहात राहिलो की घर बसल्या डाळरोटीची सोय व्हावी आणि सर्व वेळ लिखाण वाचन करता येणे शक्य व्हावे पण स्वप्न स्वप्नच राहिले.

शेवटी प्रेस एकदाचा प्रत्यक्षात उतरला. बाबू बलदेवलाल यांनी अडीच हजार व फिराक गोरखपुरींनी दोन हजार रुपये घातले. प्रेस जेमतेमच चालत होता. ‘ मर्यादा ’ ची नोकरीही संपुष्टात आली होती. पण लगेचच काशी विद्यापीठात हेडमास्तरची जागा मिळाली. ‘ प्रेमाश्रम ’ ही चांगलेच खपत होते. एका वर्षात एक हजार प्रती खपल्या. याच सुमारास त्यानी काही उत्तम कथाही लिहिल्या. ‘ विध्वंस ’, ‘ अधिकार चिंता ’, ‘ चकमा ’, ‘ बौडम ’ इ. या कथातून इंग्रजी राजवटीवर सरळ वा अन्योक्तीने टीका केलेली आहे.

प्रेस घेतला पण काम मिळेना. मेहताबरायना सर्व कामाचा पुरेसा अनुभव नव्हता. वर्षाकाठी ६०० रुपयांचे नुकसान होत होते. भागीदार आपले पैसे परत

मागू लागल. भागीदारी संपुष्टात आणण्यासाठी तगादा करू लागले. त्यांच्या बंधूबरोबर संबंध दुखावले. या प्रेसने खूपच त्रास दिला, पण सोडले तर पळते धरले तर चावते अशी स्थिती झाली होती.

१ ऑक्टोबर १९२२ ला लिहायला घेतलली कादंबरी 'रंगभूमि' ('चौगाने हस्ती') १ एप्रिल १९२४ मध्ये पूर्ण झाली. गांधींचा सत्याग्रह तत्कालीन राजकीय, सामाजिक व आर्थिक स्थिती, मध्यम वर्गांचे चारित्र्य, उद्योगधंद्याच्या विकासाचे युग, देशातील विभिन्न वर्गाची अवस्था इत्यादी घटक कादंबरीच्या अनुभवविश्वात समाविष्ट केलेले आहेत. प्रेमचंदांच्या लेखनात आजुबाजूच्या जीवनातील संदर्भ आढळत असत. त्यांची दृष्टी वर्तमानकाळातील घटनांवर पक्की स्थिर होती. 'रंगभूमि' म्हणजे विसाव्या शतकातील १९२४ पर्यंतचे भारताचे विराट चित्र आहे. प्रेमचंद स्वत: कुठल्याही पक्षाचे नव्हते. ते जहाल अथवा मवाळ कुठल्याच पार्टीवर बसू शकत नव्हते. १७-२-१९२३ रोजी निगमसाहेबांना लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात, 'आपण मला विचारता मी कुठच्या पार्टीचा आहे. मी कुठल्याही पार्टीचा नाही. मी त्या भावी पार्टीचा सदस्य आहे. जी सामान्य लोकांच्या राजकीय शिक्षणाचा कार्यक्रम हाती घेईल'. प्रेमचंदांनी स्वत: या दृष्टीतून विपूल लेखन केले आहे.

'रंगभूमि' कादंबरीचा नायक आहे एक आंधळा भिकारी, एक उद्योगपती त्याची पिढीजात असलेली छोटी जमीन व झोपडी हिसकावून घेण्याचा प्रयत्न करतो. या दोघांच्या संघर्षात सर्व देशाचे राजकारण, समाजकारण, प्रेमचंदांनी कलात्मकतेने गुंफले आह. जीवनाचे विविध प्रवाह यात इतक्या वेगाने वहाताना दिसतात की वाचकांचे लक्ष रचनेच्या शैथिल्याकडे किंवा लहानसहान कलात्मक दोषांकडे जाऊच नये. हिंदी कादंबरी वाङ्मयात ही कृती म्हणजे दीपस्तंभच आहे.

या अवधीत प्रेमचंदांच्या वैयक्तिक जीवनात काही दुःखद घटना घडल्या. ८ मार्चला एक मुलगी झाली आणि तीनच महिन्यात गेली. आई वडिलांना खूप दुःख झाले. प्रेमचंदांचा अतिसाराचाही आजार बळावला. प्रेसने इतका मनःस्ताप दिला की ते नोकरीचा शोध करु लागले. 'दुलारेलाल भार्गव' यांनी त्यांना १०० रुपये पगारावर 'गंगा पुस्तक माला' मध्ये सल्लागार म्हणून नेमले. प्रेमचंदांना लखनौला जाव लागले.

'रंगभूमि' १९२५ मध्ये प्रकाशित झाली. तिची खूपच प्रशंसा झाली. अमरनाथ झा' यांनी अतिशय भारावून या कादंबरीची प्रशंसा केली.

एकीकडे 'कायाकल्प' कादंबरीचे लेखन चालू होते तर दुसरीकडे अनातोल न्सच्या 'थायस' चा अनुवाद, रतननाथ सरशार यांच्या 'फसानए आजाद' संक्षिप्त रुपांतर (आजाद कथा) इत्यादी कामे चालली होती. लखनौच्या, स्तव्यात 'शतरंज के खिलाडी', 'सवा सेर गेहूँ', 'सभ्यता का रहस्य' मंदिर और मसजिद' सारख्या कथाही लिहिल्या. 'कायाकल्प' कादंबरी प्रेम- द्रांनी मुळात हिंदीतून लिहिली. आतापर्यंतच्या कादंबऱ्या आधी उर्दूत लिहीत णि हिंदीत त्याचा अनुवाद करत असत. १० एप्रिल १९२४ मध्ये लिहायला तलेली कादंबरी १९२६ मध्ये पूर्ण झाली. ही कादंबरी सरस्वती प्रेसमध्येच द्रित झाली.

ही कादंबरी एका तऱ्हेने नकटी झाली. इतर कादंबऱ्यांसारखाच विशाल नव्हास लाभलेली पण जन्मपुनर्जन्माचे कथानक मध्येच घुसल्यामुळे वास्तवावरची ांची पकड ढिली झाल्यासारखी वाटते. हा रायडर हागर्डच्या 'शी' कादंबरीचा नाव आहे, असे मानले जाते. यात विमाने आहेत, कायाकल्प करणारी रसायने हेत, अद्भुत गोष्टी आहेत. कधी कधी असे वाटते की किशोरावस्थेत वाचलेला द्भुत किश्शांचा खजिना इथे मोकळा झाला की काय. पण या कादंबरीचे इतर माजिक व राजकीय वास्तव पाहिले की आश्चर्य वाटते. ही अनेक कुटुंबाची था आहे. प्रत्येक कुटुंबाच्या माध्यमातून सामाजिक, राजकीय परिस्थितीचे स्तव चित्रण केले आहे. अनेक भारतीय जीवनातल्या समस्या यात विवेचिल्या ल्या आहेत. हिंदू मुसलमान ऐक्याच्या प्रश्नाला फार मोठे स्थान देण्यात ले आहे. प्रेमाची अनेक रूपे व त्यातील गुंतागुंत यात आली आहे. विषमता, न्याय, हिंसा आणि स्वार्थ यांनी बजबजलेल्या या जगात न्याय कधी निर्माण होईल य? या जगाची निर्मिती ईश्वरानेच केली आहे काय असे प्रश्न प्रेमचंदांनी चारले आहेत.

प्रेमचंदाची लेखन क्षमता आश्चर्यकारक आहे. कौटुंबिक स्वास्थ्य बिघडवणारे ंग वारंवार येत असत, तब्येत तर कायमच बिघडली होती आणि आर्थिक ीच्या परिस्थितीत उदरनिर्वाहासाठी वृत्तपत्रातून, मासिकातून लेखन करीत

असताना प्रेमचंदानी इतके दर्जेदार लेखन केले कसे? खरे तर या प्रश्नाचे एक साधे उत्तर आहे तेच त्यांच्या जीवनाचे प्रयोजन होते.

त्यांनी इंद्रनाथ मदान यांना लिहिले होते, 'रामाँ रोलाँ' प्रमाणे नियमित लेखन करणाऱ्यावर माझा विश्वास आहे.

या नियमित लेखनातही खंड पडत असे. अमृतरायनी त्यांच्या एकूण लेखनाबद्दल मोठे मार्मिकपणे लिहिले आहे. 'पुस्तक सुरू करण्याआधी त्यांना जो काही आरंभिक वेळ लागत असे तेवढाच, एकदा का लिखाणाला सुरूवात केली की न थांबता प्रचंड झपाट्याने त्यांची लेखणी चालत असे. विचारांच्या गतीबरोबरच लेखणीची गती ही वाढत असे. दोघात जणू स्पर्धाच चालत असे. विचारांची ही गती घरातली आरडाओरड किंवा येणाऱ्या जाणाऱ्यामुळे खंडीत होत नसे. या गरिबाच्या जीवनात, निदान स्वतःची एक अशी खोली असावी की ज्यात निदानपक्षी कामाच्या वेळी मुलांची ये-जा नसावी. अशी स्थिती कधीच आली नाही. मुन्शीजी मळकट फरशीवर बसत. आपल्या छोट्या उतरत्या डेस्कवर बसून काम करीत राहायचे आणि आसपास मुलांचा गोंधळ सुरू असायचा. हा गोंधळ जरा अधिक झाला की थोडे दटावून त्याना बाहेर जायला सांगायचे. पण अशी वेळ क्वचितच यायची. कधी कधी मुलाना अभ्यास करायला जवळच बसवले जायचे. तेव्हा अभ्यास होवो न होवो (बहुधा होतच नसे) पण गोंधळ तरी कमी व्हायचा. मुंशीजी कोणाला नक्कल लिहून काढायला बसवत तर कुणाला प्रश्न देत. मुले आपले काम करीत. मुंशीजी आपले काम करीत असत. मधून मधून मुलांकडे लक्ष देत यामुळे त्यांचे लक्ष विचलीत होत नसे. विचारांचा जणू अविरत वर्षाव होत असे. सृजनाच्या पातळीवरचे हे जीवन अशा गोष्टींनी बाधित होत नसे नेहमीच अशा स्थितीत काम करींत राहिल्यामुळे हा त्यांचा स्वभावच बनला होता. किंबहुना आपल्या मनाची घडीच त्यांनी अशी बसवली होती.' (कलम का सिपाही)

लेखन योग चालू असताना मित्रांना येण्याची बंदी नव्हती. कुणाला कधी भेटायचे नाकारले असे झालेच नाही. त्यांना मित्रांनी सांगितले 'भेटण्याची वेळ निश्चित करा.' त्यावर ते म्हणायचे 'तो साहेबीपणा मला जमणार नाही. माझ्याकडे जो कोणी येतो तो प्रेमाने येतो. त्याला मी दुखवू शकणार नाही. काम तर जीवनभर करायचेच आहे. चाललेलेच असते.' मुंशीजी कोणालाही मोठ्या प्रेमाने भेटत असत. कमीत कमी पान देऊन त्याचे अतिथ्य करीत असत. मुंशीजी

लेखणी बाजूला ठेवीत, चष्मा काढून डेस्कवर ठेवीत असत आणि गप्पा-टप्पा सुरू करीत. हास्याचे मजले चढत असत. कुणाला वाटावे, मुंशीजी जणू गप्पा करायला आसुसले होते. पण तसे नसायचे. पाहुणा गेला की पटकन चष्मा नाकावर, लेखणी हातात आणि गंभीर होऊन लेखन सुरू करीत असत. इंग्रजी, हिंदी, उर्दू कुठल्याही भाषेत सुंदर अक्षरात लेखन सुरू व्हायचे. पेन ठराविक हवे असे नाही, कागदही चांगला हवा असेही नाही. मजूराला हे नखरे थोडेच परवडणारे होते? ते तर लेखणीचे मजूर होते.

स्वतःच्या लेखनासंबंधीचा, लेखन जपून ठेवण्याबाबतचा त्यांचा निष्काळजी-पणा आश्चर्यकारक होता. त्यांच्याकडे कथांच्या स्थळ प्रती नसायच्या, प्रकाशित कथांची कात्रणे नसायची, असली तर ती धडपणे ठेवलेली नसायची. लेखनाचे आराखडे कुठेही असत, डायरीमध्ये, गवळ्याच्या बिलावर, वर्तमानपत्राच्या तुकड्यावर.

प्रेमचंदाकडे प्रेस होता पण स्वतःची पुस्तके प्रकाशित करण्याइतके पैसे नव्हते. त्यांनी एका श्रीमंत माणसाबरोबर करार केला. पैसा त्याने पुरवायचा प्रेस प्रेमचंदांचा. फायदा अर्धा अर्धा घ्यायचा. या कराराप्रमाणे दोन वर्षात चार सहा पुस्तके 'सार्वजनिक ग्रंथमाला' नावाने प्रकाशित झाली. पुढे तो उपक्रम बंद झाला.

'चाँद' नावाचे एक मासिक प्रसिद्ध होत होते. खास करून त्यात स्त्रियांसाठी लेखन प्रकाशित केले जाई. प्रेमचंदांच्या कथा त्यात छापून येत असत. त्यांची एक अप्रतिम लघुकादंबरी 'निर्मला' 'चाँद' मधून प्रकाशित झाली आणि १९२७ साली तिथूनच पुस्तक रूपाने प्रकाशित झाली. 'चाँद'च्या संपादकांनी आणखी एका पुस्तकाची मागणी केली. प्रेमचंदाकडे जुना 'प्रेमा' कथेचा किस्सा होता. तो त्यांनी खुलवून 'प्रतिज्ञा' नावाने क्रमशः प्रकाशित केला. अर्थातच 'निर्मला' कादंबरीचे यश 'प्रतिज्ञा' ला लाभले नाही. 'निर्मला'ची कथा म्हणजे-एका वयस्कर व तीन मुलांच्या बापाशी तरुण निर्मलेचा विवाह होतो. त्याचा मोठा मुलगा निर्मलेच्या वयाचा असतो. या सर्वांच्या परस्पर संबंधाचे मनोवैज्ञानिक चित्रण प्रेमचंदानी या सुंदर कृतीत केले आहे.

बाबू किशन नारायण भार्गव यांनी दरमहा दोनशे रुपये पगारावर 'माधुरी' मासिकाचे संपादक म्हणून काम करण्याचे निमंत्रण प्रेमचंदांना दिले व ते त्यांनी सहर्ष स्वीकारले. १९२७ ते १९३३ पर्यंत त्यांचे वास्तव्य लखनौला होते.

'माधुरी' मध्ये प्रेमचंदानी एक 'मोटेरामशास्त्री' नावाची कथा छापली एका कामुक व वाईट चालीच्या वैद्यांची यात चेष्टा केली आहे. ही कथा इतकी प्रभावी ठरली की लखनौच्या कुण्या एका पंडित शाळीग्राम शास्त्री या वैद्याने 'माधुरी' च्या संपादकावर अब्रुनुकसानीचा दावा केला. वॉरंट येण्याआधीच संपादक कोर्टात हजर झाले. तडजोडही झाली. ही कथा कुणा एका विशिष्ट व्यक्तीला समोर ठेवून लिहिली नाही असे सांगण्यात आले. प्रेमचंदानी तडजोडीचा जो मसुदा तयार केला आहे तो मोठा गमतीदार आहे. प्रेमचंदानी ती कथा पुन: छापली आणि तडजोडीचा मसुदाही पुन: छापला. या सर्व प्रकरणात प्रेमचंदांच्या व्यक्तित्वात लपलेला एक खोडकर मुलगाही दिसू लागतो. आणि लखनौच्या एकूण वातावरणातील हास्य व आनंद लुटण्याच्या वैशिष्टयाचाही परिणाम दिसतो.

प्रेमचंद 'माधुरी' चे संपादक होते पण त्यांना तिथे काही अन्य कामेही करावी लागत असत. कधी जाहिराती लिहाव्या लागत असत. कथांचा अनुवाद करावा लागे तर कधी दुसऱ्यांचा अनुवाद तपासावा लागत असे. पण या लखनौच्या वास्तव्यात प्रेमचंद खूपच प्रसन्न व उत्साही होते. आर्थिक विवंचना फार कमी झाली होती. संपादकीय खोलीतून हास्याचे फवारे सुटत. आजुबाजूचे वातावरणही त्या हास्याने, प्रसन्नतेने उजळून निघत असे. कधी दोस्तांच्या मैफिलीत प्रेमचंद पीतही असत. घरी आल्यावर कान उघाडणी होई. तेवढयापुरते ते न पिण्याची प्रतिज्ञा करीत असत पण मित्रांच्या आग्रहामुळे, भिडस्त वृत्तीमुळे आणि कायस्थी स्वभावामुळे ही प्रतिज्ञा टिकतही नसे. पण पिण्याचे व्यसन असे त्यांना कधीच लागले नाही. शिवरानीजींचा त्यांच्यावर चांगलाच वचक होता.

हळूहळू त्यांच्या कथांचे विदेशी भाषांतही अनुवाद होऊ लागले होते. राजेश्वरप्रसाद सिंह यांना त्यांच्या 'तारा' कथेचा अनुवाद 'Actress' या शीर्षकाखाली केला व तो 'लीडर' मध्ये प्रकाशित झाला. ताराचंद राय (प्रोफेसर ऑफ हिंदी, बर्लिन युनिव्हर्सिटी) यांनी जर्मनमध्ये काही कथांचे अनुवाद केले. केशोराम सब्बरवाल यांनी 'मुक्तिमार्ग' ही कथा जपानी 'काइजो' या मासिकात अनुवादित केली. त्यांनी पुढे प्रेमचंदाच्या अनेक कथांचे अनुवाद केले. जपानी लोकांना त्यांच्या कथा आवडत असत.

याच सुमारास त्यांच्या कन्येचा विवाह झाला. कन्येच्या विवाहप्रसंगी प्रेमचंद काहीसे अनुत्साही व निष्क्रीय राहिले. एकूण त्यांचा या कर्मकांडवर फारसा

विश्वास नव्हता. प्रेमचंदांनी 'गबन' कादंबरी लिहायला सुरूवात केली होती. १९३१ साली ती सरस्वती प्रेस तर्फे प्रकाशित झाली. मध्यम वर्गीय स्त्रीच्या मनात दागिन्यांविषयी खूप आकर्षण असते. आणि त्यामुळे जीवन दु:खमय होऊन जाते असा विषय या कादंबरीत निवडला आहे. पण हा विषय म्हणजे एक निमित्त आहे. या विषयाच्या निमित्ताने त्यांनी भारतीय मध्यम वर्गाचे विलक्षण प्रभावी चित्र रेखाटले आहे. उत्तरार्धात तत्कालीन राजकीय वातावरणाचा दबाब या कादंबरीवर पडलेला दिसतो. क्रांतिकारकांची धरपकड, त्यांच्यावरचे आरोप सिद्ध होण्यासाठी सरकारतर्फे आणलेले बनावटी साक्षीदार, या साक्षीदारांनी सरकारला पूरक साक्ष द्यावी म्हणून पोलिसांनी रचलेले जाळे, त्यांना मोहाविष्ट करणारे प्रसंग, दडपशाही, त्या दडपशाहीचा जनतेने केलेला विरोध इत्यादी तत्कालीन भारतीय जीवनातील वास्तव या कादंबरीत प्रतिबिंबित झालेले आहे. दागिन्यांसाठी जीव पाखडणाऱ्या स्त्रीच्या मनात त्यागाचा पवित्र अग्नी कसा प्रज्वलित होतो आणि ती विमल चारित्र्याच्या शिखरावर जाऊन कशी बसते हे ही प्रभावीपणे यात दाखवले आहे. आत्म्याला औदात्याचा स्पर्श घडवणारे कितीतरी प्रसंग या कादंबरीत आहेत. तसे हे प्रसंग प्रेमचंदांच्या साहित्यात अनेक ठिकाणी येतात व कलात्मकतेने येतात.

लोकप्रियतेच्या शिखरावर पोचलेला आणि हिंदी साहित्याला नवी दिशा व शक्ती देणारा हा साहित्यिक वैयक्तिक जीवनात मात्र अगदी साधा भोळा होता व विश्वास बसणार नाही इतक्या साधेपणाने रहात होता. या दृष्टीने त्यांची व जैनेंद्रकुमार यांची झालेली प्रथम भेट लक्षणीय आहे. या भेटीसंबंधी जैनेंद्र जी लिहितात.

'मी ओळखले की हे प्रेमचंद आहेत. आता या अपरिचयापासून सुटकाच नव्हती. पण हेच प्रेमचंद असावेत या जाणिवेचे सुख मला झालेच नाही. काय यानांच प्रेमचंद म्हणून ओळखायचे ? प्रेमचंदाच्या नावने उभा असलेला हा समोरचा माणूस इतका साधारण, इतका फालतू, इतका खेडवळ भासला की—'

पण थोड्याच वेळात त्यांची मनोवस्था पूर्ण बदलली. प्रेमचंदांनी या नुकत्याच साहित्यक्षेत्रात पाउल टाकलेल्या माणसाचे इतके मनऽपूर्वक स्वागत केले की क्षणानच त्यांच्या बाह्यवेषाचा आणि घरातील पसाऱ्याचा सुन्न करणारा प्रभाव नष्ट झाला आणि जन्म जन्मांतरीची ओळख असल्याच्या थाटात प्रेमचंदांनी

त्यांच्याशी गप्पा मारायला सुरूवात केली. जैनेंद्र लिहितात : आधुनिक साहित्याच्या प्रवृत्तीची त्यांची जाण पाहून मी विस्मित होऊन गेलो ! युरोपिअन साहित्यातले जाणण्यासारखे त्यांनी सर्व जाणून घेतले आहे. नुसते जाणूनच घेलले नाही तर ते खोलात जाऊन मार्मिकपणे समजून घेतले आहे, ह्याची पारख केली आहे आणि मूल्यपानही ! ते स्वत: संबंधी सजेत आहेत. Consistent आहेत, स्वनिष्ठ आहेत ?

प्रेमचंदाबद्दल खूप लोकानी अशाच प्रतिक्रिया व्यक्त केल्या आहेत. प्रेमचंदांचा बाह्य वेष एखाद्या शेतकऱ्यासारखा मळका असे. फिराक गोरखदुरानाही साहित्य-सम्राट प्रेमचंद असे असावेत हे मनोमन आवडले नव्हते. त्यांच्या बोलण्यात गोडवा होता. बोचरी गोष्टही मिठास रूप धारण करून प्रकट व्हायची. वरकरणी त्यांचा खेडवळ वेष पाहून असे वाटायचे की हा माणूस अगदी गावठी असेल. पण थोडीशी जवळीक झाली की त्याचे समृद्ध व्यक्तित्व विलक्षण मोहिनी टाकत असे.

एकदा इम्तयाज अली यांनी त्यांना चहाला बोलावले. मुंशीजींना वाटले घरगुती चहा असेल. तेव्हा पायी शहरभर भटकंती करून ते दिवसभराच्या मळलेल्या, चुरगळलेल्या कपड्यांनिशी त्यांच्या घरी गेले. नेहमीचेच मिलचे धोतर आणि जाडसा कुर्ता, धुळीने माखलेले केस, तिथे जाऊन पहातात तो मोटारीच्या रांगा बाहेर लागलेल्या. प्रेमचंदांच्या सन्मानासाठी ते सर्व लोक आले होते ! स्वत:च्या वाङ्मयीन महत्तेची व लोकमानसावरील प्रभावाची या माणसाला तशी जाणीव नव्हती असे नव्हे. पण त्यातून निर्माण होणारी मोठेपणाची प्रतिमा जपून ठेवण्याची त्यांची वृत्ती मुळीच नव्हती.

अमृतराय या प्रसंगाचे वर्णन करून पुढे लिहितात : ‘पण हे केवळ बहिरंग आहे. आतून त्यांचे मन अत्याधुनिक आहे. आपल्या मातीचा स्पर्श कायम ठेवून त्यांनी युरोपियन ज्ञान–विज्ञानाचे आणि कला–साहित्याचे आकलन केले आहे. आणि त्याही आधी सादीच्या विनोदी किश्यांचा व हाफिजच्या गजलांचा वारसा कायम ठेवला आहे. तो चटपटीतपणा, खुसखुशीतपणा, रंगीन वृत्ती, हजरजबाबी स्वभाव जो फारसीचा प्राण मानला जातो, प्रेमचंदांच्या रक्तात विरघळून गेला आहे.’ (कलम का सिपाही)

पटना येथे हिंदी साहित्य परिषदेचा कार्यक्रम होता. त्यांनी आपल्या गाडीची सूचना दिली होती. स्वागतासाठी साहित्यिक जमा झाले होते. प्रेमचंद नेहमीच्या

बावळ्या वेषात आले व त्यांना कुणीच ओळखले नाही. सर्व डब्यात पाहून झाले, शेवटी निराश होऊन परत गेले. शेवटच्या गाडीने आले असतील म्हणून दुसऱ्या दिवशी लोक पुनः आले. तिथे एक गृहस्थ आढळले. मध्यम वयाचे, सफेद केस-प्रवासाने थकलेले, रात्रभर मुसाफिरखान्यात पहुडलेले. त्यांना सहज विचारले तर तेच प्रेमचंद निघाले ! त्यांना विचारले 'रस्त्यात त्रास तर झाला नाही. प्रेमचंद म्हणाले, 'त्रास ? 'मी तर रात्रभर याच विचारात होतो की थांबावे की परत जावे. रात्री पंजाब मेलने उतरलो. आपले दर्शन घडले नाही तेव्हा मुसाफिरखान्यात जाऊन पहुडलो. मन मोठे अस्वस्थ झाले होते. इथे कोणी विचारपूस करणारेच नाही तर परत जावे. रिटर्न तिकीट होतेच. प्लॅटफॉर्मवर गेलो. गाडी आली पण चढलो नाही, वाटले, तुम्हाला दुःख झाले असते. 'तुम्हाला दुःख झाले असते' ही यातली भावना. म्हणजे प्रेमचंदांच्या मानवतेचा उद्रेक होता. हा सर्व परिणाम त्यांच्या बाह्य व बावळ्या वेषाचा होता. पण त्यांनी या सर्व अडचणी खुल्या मनाने आनंदाने सहन केल्या. प्रेमचंदांचे अंतरंग विलक्षण समृद्ध होते. त्यांच्यामध्ये समोरच्या कुठल्याही माणसाला प्रेम देण्याची उदंड क्षमता होती. कोणीही सहृदय जीव त्यांच्या आत्मीयतेच्या कक्षेत ओढला गेल्यावर या माणसाचा मित्र बनल्या. शिवाय रहात नसे. ही त्यांची आत्मीयता केवळ विशिष्ट श्रेणीच्या लोकांपुरती मर्यादित नव्हती. एकदा ते श्रीमती महादेवी वर्मा यांना भेटण्यासाठी त्यांच्या घरी गेले." त्यांची नोकराणी भक्तिन पुढे आली आणि म्हणाली 'महादेवीजी कामात आहेत.' प्रेमचंद हसून म्हणाले, 'ठीक आहे. मी थांबतो. तू तर कामात नाहीस ना ? तुझ्याशीच गप्पा मारतो. बडबड्या भक्तिनला आणखी काय हवे होते ? थोड्याच वेळात महादेवीजी बाहेर येऊन पहातात तो प्रेमचंद सर्व नोकरांमध्ये बसून मोठ्या मजेत गप्पा मारीत आहेत. आणि हास्याचे मजले चढवीत आहेत.

प्रेमचंदांनी आपल्या समकालिनाचे साहित्य मोठ्या जिज्ञासेने तर वाचले होतेच पण त्यांचे गुणदोष, शक्ती, सीमा या सकट त्यांचे मूल्यमापनही त्यांनी केले होते. नवीन लोकांचे स्वागत करण्यात त्यांना फारच आनंद होत असे. नवनव्या प्रतिभेचा शोध घेऊन, नवीन लेखकांना प्रकाशात आणण्यात ते धन्यता मानीत. कानपूरच्या सद्‌गुरुशरण अवस्थींना ते एका पत्रात लिहितात, 'आपल्या वर्गामध्ये जर साहित्यिक अभिरुची असलेले विद्यार्थी असतील तर त्यांना लिहित राहण्या-साठी सतत प्रेरणा देत रहा. तरुण कधी कधी अशी सुंदर कथा लिहितात, जी

आम्हालाही जमत नाही. आमचे यश आमच्या सवयीत असते. नवीनपणा, चमत्कृती व वैविध्य तर त्यांच्याकडे असते. वीरेश्वरसिंह नावाच्या लेखकाला ते लिहितात, 'लेखन ही ईश्वरी शक्ती आहे. प्रयत्नाने त्यात चमक आणता येते पण जिथे ती नाही तिथे सबंध पुस्तकालय वाचूनही काही जमत नाही.' उपेंद्रनाथ अश्कना ते नवनवीन पुस्तके वाचत राहण्याचा सल्ला देत असत. स्वत: प्रेमचंदाचे वाचन अफाट होते. कमलकिशोर गोयंका यांनी प्रेमचंद विश्वकोशाच्या एका टिपणात या संबंधी लिहिले आहे. त्यांनी ज्या पुस्तकाचे सहज संदर्भ दिले आहेत. त्यांचीच संख्या सुमारे पाच हजार ग्रंथांची आहे.

देशातले राजकीय वातावरण तापत होते. प्रेमचंदांनी 'हंस' नावाचे मासिक प्रकाशित करण्याचे ठरवले. सर्व वाङ्मयीन व्यवहार बुडीत चालले असतानाही त्यांचा उत्साह उसळी मारून येई, आशावाद फोफावे आणि नव्या जोमाने ते काही योजना आखीत. 'दांडी यात्रा' २५ मार्चला सुरू होणार होती. मार्चच्या पहिल्या आठवड्यात 'हंस' चा पहिला अंक बाहेर पडणार होता. या अंकातील 'संपादकीय' प्रेमचंदांच्या व्यक्तित्वावर आणि त्यांच्या कर्तृत्वावर प्रकाश पाडणारे आहे.

'हंस' चा जन्म अशा शुभसमयी होत आहे की ज्या वेळी भारतात एका नव्या युगाचे आगमन होत आहे. या वेळी भारत पराधीनतेच्या बेड्यातून सुटण्या-साठी तडफडत आहे. 'हंस' चे हे परम भाग्य आहे. या तिथीची स्मृती एक दिवस विशाल रूप धारण करील.

असे म्हणतात की जेव्हा श्रीरामचंद्र समुद्रावर पूल बांधत होते त्यावेळी छोटे छोटे पशूपक्षी माती आणून समुद्र हटविण्यात मदत करीत होते. यावेळी देशात त्याहूनही बिकट संग्राम सुरू झाला आहे. शांतिपूर्ण संग्रामाचा शंख भारताने फुंकला आहे. 'हंस' सुद्धा मानस सरोवराच्या शांतीचा त्याग करून आपल्या छोट्याशा चोचीत चिमूटभर माती घेऊन समुद्र हटवण्यासाठी स्वातंत्र्याच्या लढ्यात योगदान करण्यासाठी– चालला आहे. समुद्राचा विस्तार पाहून त्याची हिंमत खचली आहे पण संघ– शक्तीने त्याचे हृदय अधिक मजबूत केले आहे.

पुढे त्यात भारतातील राजकीय शक्तीचे विश्लेषण आहे. संपूर्ण स्वराज्याचा पाठपुरावा आहे. यात काही महत्वाची वाक्ये आहेत, 'डोमिनियन पक्षाकडे बारकाईने

पाहिले तर असे दिसेल की त्यांना आपल्याला स्वराज्यात दबून रहावे लागेल अशी भीती वाटत असावी ? स्वराज्यात मजूरांचा व शेतकऱ्यांचा आराज इतका दुबळा नसेल. हे लोक आवाजाच्या भयाने थरथर कापत आहेत का ? आम्हाला तर असेच वाटते ते असे समजतात की त्यांच्या हितसंबंधाचे रक्षण इंग्रजी सत्ताच करू शकेल. स्वराज्य त्यांना गरिबांना तुडवण्याची व त्यांचे रक्त शोषून घेण्याची संधी कधीच देणार नाही. स्वराज्य गरिबांचा आवाज आहे, तर डोमिनियन गरिबांच्या कमाईवर लठ्ठ होणाऱ्यांचा.'

प्रेमचंद लेखक होते. कलेची महती व स्वायत्ता मानणारे होते पण 'हंस' त्यांनी केवळ कलात्मक प्रेरणांच्या पुर्तीसाठी काढले नव्हते. ते जनवादी लेखक होते. जनतेच्या सुखासाठी देशाच्या राजकीय स्वातंत्र्याची निकड त्यांना जाणवत होती. म्हणून ते राष्ट्रवादी होते. आणि प्रसंगी कलात्मक मूल्ये बाजूला ठेऊन प्रचार करण्यासाठी उपयोगी साहित्य लिहायला ते तयार होते. खरे तर त्यांच्या साहित्यात जनवादी–प्रेरणा, राष्ट्रीयता, प्रचार इत्यादी गोष्टी केवळ बाह्य वास्तव राहिल्याच नव्हत्या. कारण ते मनाने भारतीय स्वातत्र्यसंग्रामाशी व जनतेच्या सुख-दु:खांशी एकरुप झाले होते. सामान्यत: ज्याला बाह्य वास्तव समजले जाते ते प्रेमचंदांच्या कलात्मक जाणीवांचा असा एक अपरिहार्य भाग झाला होता की त्यांचे सर्जनात्मक स्फुरण त्या वास्तवाच्या संपृक्तीनेच होत होते.

'हंस' मधून तेजस्वी लेख येऊ लागले. चार अंक प्रकाशित झाल्यावर सरकारने प्रेसकडे एक हजार रुपयांचा जामीन मागितला. हा मोठा आघात होता.

देशात दडपशाहीचे थैमान वाढले होते. जवाहरलालजींच्या माता स्वरुपरानी लखनौमध्ये आल्या. त्यांचा स्त्रियांवर विलक्षण प्रभाव पडला. आता तर शिवरानीजी स्वत: हातात झेंडा घेऊन रणमैदानात उतरल्या. पिकेटींग करताना त्यांना पकडले व दोन महिन्यांची सजा झाली. १२ जानेवारी १९३१ रोजी जैनेंद्रांना लिहिलेल्या पत्रात प्रेमचंद कौतुकाने आणि नर्मविनोदाने लिहितात, 'हो, पत्नीजी आल्या खऱ्या. पण कदाचित पुन: जातील. अजून त्यांचे समाधान झाले नाही. सारे स्वराज्य एकाच वेळी त्या घेणार ! हप्त्या हप्त्यांनी त्यांना नको.

प्रेमचंदांचे मन आतून पेटत होते. नेहरुजींच्या मातेला मार लागला तेव्हा ते कळवळून लिहितात, 'सरकारचा अत्याचार आता सहनशक्तीच्या बाहेर गेला

आहे. पं. जवाहरलालांच्या वृद्ध मातेशी किती निर्घृण व्यवहार केला गेला ! आता बाहेर राहणे मला निर्लज्जपणाचे वाटते.'

या मन:स्थितीत त्यांच्या मनात 'कर्मभूमि' कादंबरी विकसित होत होती. १६ एप्रिल १९३१ ला 'कर्मभूमि' चे लेखन सुरू झाले. १९३२ च्या ऑगस्ट महिन्यात ती प्रकाशित झाली. या आधी प्रेमचंदांची 'माधुरी' मधील नोकरी सुटली कारण माधुरीचे प्रोप्रायटर बाबू विष्णुनारायण भार्गव वारले.

प्रेस धडपणे चालत नव्हताच. 'हंस' चे वर्णन प्रेमचंदांनी केले आहे. 'हंस कोढ में खाज साबित हो रहा था' आर्थिक तंगीमुळे ते किती जेरीस आले होते !

त्यांनी टेक्सबुके लिहिली. पण ती मंजूर झाली नाहीत. अनुवादाचीही कामे मिळवायचा त्यांनी प्रयत्न केला.

प्रेमचंदजींचा उत्साह आणि आशावाद इतका दांडगा की 'हंस' वर जामीन द्यावा लागत असताना आणि प्रेस यथातथाच चालला असताना त्यांनी 'जागरण' पाक्षिक चालवायला घेतले ! १२ अंक प्रकाशित झाल्यावरही दोनशेहून अधिक सभासद नव्हते. ते बुडणार हे आधी माहीत होतेच. चार महिने बंद ठेवलेले 'हंस' परत सुरू केले तेव्हा सरकारने दोन हजारांचा जामीन मागितला. प्रेमचंद उद्वेगाने लिहितात—'जरा जरा—सी बात मे गर्दन पर छुरी चल जाती है।'

'कर्मभूमि' ही एक प्रेमचंदांची श्रेष्ठ कादंबरी. गांधींच्या नेतृत्वाचा शहरात, खेड्यात सर्व वर्गावर होणाऱ्या प्रभावाचे प्रत्ययकारी चित्रण या कादंबरीत आढळते. प्रेमचंदाचे स्वभावचित्रण करण्याचे कसब व मानवी मनाचे विश्लेषण करण्याचे कौशल्य या कादंबरीत प्रकर्षाने आढळते. लोकांमधील सुप्त तेज या कादंबरीत उफाळून बाहेर पडताना दाखविले आहे. एका बाजूला वैयक्तिक जीवनात अनंत अडचणींनी घेरले जात असतानासुद्धा हा माणूस लेखक म्हणून एका वेगळ्याच धुंदीत जगत होता.

प्रेमचंद देशातील राजकारणाबाबत जसे जागरुक होते तसेच आंतरराष्ट्रीय परिस्थितीवरही त्यांचे उत्तम लक्ष होते. इकडे गोलमेज परिषदेच्या धोळावर ते हल्ले चढवत होते तर दुसरीकडे हिटलरच्या जर्मनीतील विजयाचे त्यांना अपार दु:ख होत होते. हिटलरचा विजय म्हणजे लोकशाही शक्तींचा पराभव हे त्यांना पक्के ठाऊक होते. हिटलरने यहुदी लोकांवर अत्याचार करायला सुरुवात केली

त्याविरुद्ध प्रेमचंदांनी तळमळून कळवून लिहिले. आर्थिक मंदीने बिकट झालेल्या परिस्थितीची कारणमीमांसा करताना ते भांडवलशाही व्यवस्थेवर प्रहार करत होते तर दुसरीकडे रशियातील समाजवादाच्या प्रयोगाकडे आपुलकीने व आशेने पहात होते. जपानने चीनवर हल्ला केला तेव्हा युरोपियन राष्ट्रे मूग गिळून बसली. यातले रहस्य त्यांनी चांगले ओळखले होते. चीन साम्यवादी मार्गाकडे चालू पहात होता आणि पुढे मागे त्याची साम्यवादी रशियाशी होणारी मैत्री महाग पडणार हे त्यांच्या मूकपणाचे रहस्य होते. प्रेमचंदांच्या राजकीय व सामाजिक विचारांचा केंद्रबिंदू सामान्य जनतेचे सुख-दुःख हा होता. ते रशियन वाङ्मयाचे भक्त होते. सामान्य जनतेच्या संघर्षाचे प्रतिनिधित्व करणारा गोर्की व त्याचे साहित्य हा त्यांच्या प्रेमाचा व आदराचा विषय होता. प्रेमचंद मानवाचे शोषण करणाऱ्या सर्व दानवी शक्तीचे विरोधक होते आणि या बाबतीत ते खूप हळदेही होते. 'यामा' कादंबरीतील वेश्यांच्या जीवनाचे भयावह करुण वास्तव वाचून ते अक्षरशः हलले होते. त्यातील काही भाग वाचताना ते रडत असत. प्रेमचंदांच्या व्यक्तित्वात वैयक्तिक व सार्वजनिक, देशी-विदेशी, राष्ट्रीय-वैश्विक असे कप्पे नव्हते. त्यामुळेच त्यांच्या लेखनातही अशी द्वंद्वे कृत्रिम पातळीवरही आढळत नाहीत. ज्याला बाह्य प्रचारात्मक असे सामान्यतः म्हटले जाते ते त्यांच्या लेखकीय व्यक्तित्वात जिरून एकरुप झाले होते. अमृतरायनी मोठ्या मार्मिकपणे लिहिले आहे. 'अच्छे संतरी की तरह मुंशीजी की नजर हर तरफ है।' (कलम का सिपाही)

त्यांची प्रखर नजर वास्तवाच्या प्रत्येक घटकाचा सूक्ष्म वेध घेण्यात तरबेज झाली होती. ब्राह्मणांनी केलेले समाजाचे शोषण असो, भांडवलदारांनी श्रमिकांचे केलेले शोषण असो किंवा जमीनदारांनी चालवलेला शेतकऱ्यांचा छळवाद असो प्रेमचंदांच्या गरुड नजरेतून काहीही सुटणे शक्य नव्हते. प्रेमचंदांच्या भेदक विश्लेषणाचे काही थोडेसे नमुने देणे अनुचित ठरणार नाही.

युरोपच्या अर्थतज्ज्ञांनी एक मोठा सोपा उपाय शोधला आहे. बस् ! ज्या वस्तूचा भाव खाली येईल त्या वस्तूचे उत्पादनच कमी करायचे. भांडवलदारांना स्वस्ताई काळचा नागासारखी दिसते.'

'भांडवलदार शेतकऱ्यांच्या दयनीय दशेचा लाभ घेण्याचा उपक्रम सोडून देतील अशी आशा करणे म्हणजे कुत्र्याकडून चामडयाची रखवाली करून घेणे

ठरेल. या हिंस्त्र जनावरांपासून स्वत:चे रक्षण करायचे असेल तर आपल्याला स्वत:ला सशस्त्र व्हावे लागेल.'

गांधीवादी आदर्शाकडून ते समाजवादी विचारसरणीकडे झुकत होते.

'जोपर्यंत संपत्तीवर व्यक्तिगत अधिकार राहील तोपर्यंत मानव समाजाचा उद्धार होऊ शकणार नाही.'

'काही लोकांना शंका येते की व्यक्तिगत स्वार्थाशिवाय माणसात प्रेरक शक्ती कुठून येणार ? मग विद्या, कला आणि विज्ञान यांची उन्नती कशी होते ?'

'समष्टि–कल्पना आली की स्वार्थ चेतना स्वत:च संस्कार संपन्न होईल.'

'हंस', 'जागरण' या नियतकालिकातून मुंशीजी लिहित होते पण आर्थिक स्थितीने त्यांची कंबर खचत होती. कधी कधी ते खूप लाचार होत. बिर्लाकडे जाहिरातीसाठी प्रयत्न करावेत अशी ते मित्रांची मनधरणी करीत. 'जागरण' बंद करण्याचे विचार जोराने मनात येत. 'जागरण' ला महिना दोनशे रुपयांचा तोटा होत होता.

या प्रतिकूल वातावरणात एक मंद वाऱ्याची झुळूक आली. महालक्ष्मी सिनेटोनने 'सेवासदन' घेतले. नाव 'बाजारे–हुस्न' च कायम ठेवले व बंबईया फिल्मिकरण केले. प्रेमचंदांना फस्त सातशे रुपये मिळाले. प्रेमचंदांनी सिनेमा पाहून मुलाला तार केली. Sevasadan Released saw, Fair but not Satrsfactory त्याचवेळी तामिळमध्ये के सुब्रमण्यम यांनी दिग्दर्शित केलेली फिल्म सेवासदन फारच चांगली निघाली. आताची प्रख्यात गायिका एम. शुभलक्ष्मी हिने पहिल्यांदा सिने जगतात पदार्पण करून सुमनची भूमिका केली. एका चक्रव्युहात सापडलेल्या लेखकाला असे दिलासे जगवू शकत होते. त्याचवेळी मुंबईहून अजंता सिनेटोनकडून त्यांना पटकथा लेखक म्हणून बोलावणे आले. बुडणाऱ्याला हा काडीचा आधार होता. प्रेमचंदांनी मित्रांशी विचारविनिमय केला. पण निमंत्रण स्वीकारण्यावाचून गत्यंतरच नव्हते. प्रेस व नियतकालिकांनी दिलेले तडाखे सहन करण्यासाठी तो एक मार्ग होता. प्रेमचंद मुंबईला गेले. ही एक गाजराची पुंगी होती. वाजली तर वाजली नाही तर मोडून खाल्ली.

प्रेमचंदांना मुंबईचे वातावरण आवडले नाही. सिनेसृष्टीतील पोकळ डामडौल करणारी माणसे आवडली नाहीत. निष्प्रेम कृत्रिम जीवन आवडले

नाही. भांडवलदारांची व्यापारी मने त्यांच्या अस्मितेला बोचू लागली. त्यांनी लिहिलेले संवाद दिग्दर्शक ज्या तऱ्हेने बदलत होता ते सहन करणे त्यांना जड जात होते. ‘मजदूर’ पिक्चर बनत होते. कथा फारच नाटकी होती. मुंशीजींनी संवाद अतिशय उत्तम लिहिले होते. दिग्दर्शक भवनानींच्या आग्रहावरून प्रेमचंदांनी स्वत: सरपंच म्हणून दीड दोन मिनिटे कामही केले होते. फिलम मुंबईत सेन्सॉरने पास केली नाही पण लाहोरच्या ‘इम्पीरीयल’ थिएटरमध्ये ती दाखवली गेली. पहिल्या दिवशी सुमारे साठ हजार मजूर ती पाहण्यासाठी फाटकाबाहेर उभे होते. ७–८ दिवस गर्दीवर नियंत्रण ठेवण्यासाठी पोलिसांना बोलवावे लागले शेवटी पंजाब सरकारने घाबरून त्याबर बंदी आणली. दिल्लीत ती दाखवली गेली तेव्हा फिलममध्ये दाखविल्याप्रमाणे एक मजूर खरोखरच गिरणीमालकाच्या मोटारीपुढे आडवा आला. शेवटी दिल्लीतही बंदी घातली गेली १९३७ साली बंदी उठली पण तेव्हा सारी हवाच निघून गेली होती.

दैवदुर्विलासाचा एक तडाखा त्यांना याचवेळी बसला. मजुरांच्या हक्कांचे समर्थन करणाऱ्या मुंशीजींच्या सरस्वती प्रेसमधील मजुरांनी हरताळ केला. प्रेस चांगला चालत नव्हता. नियतकालिके तोटयात होती. तरीही तीस चाळीस कामगारांच्या आयुष्याचा विचार करून प्रेमचंदांनी ती बंद केली नाहीत. हे मजुरानाही पक्के ठाऊक होते. शिवाय मजुरांच्या वतीने एकमेव लिहिणारा प्रेस बंद करणेही मजुरांच्या दृष्टीने चूक होते. या समाजवादी विचाराना प्रेस-संघाच्या लेखी काहीच किंमत नव्हती. त्यात ‘जागरण’ बंद झालेच पण मुंशीजींनाही खूप दु:ख झाले. ज्यांच्यासाठी स्वत:चे पोट मारून अविश्रांत श्रम करून जीवाचा आटापिटा केला त्यानीच प्रेमचंदांवर शोषक असल्याचा आरोप करावा!! प्रेस व ‘हंस’ विकण्याचा विचार ते करू लागले. पण शेवटी हरताळ मागे घेण्यात आला. तीन महिन्यांच्या वेतनाचा आग्रह सोडून एक महिन्याच्या वेतनावर मजूर रुजू झाले. पण या सर्व घटनात प्रेमचंदांना जबर धक्का बसला होता.

मुंबईच्या मुक्कामात प्रेमचंदजीनी ‘गोदान’ कादंबरी लिहायला सुरुवात केली होती. मुंबईत त्याना फार एकटेपणा वाटे. त्यानी दोन्ही मुलांना अलाहाबाद येथील कायस्थ पाठ शाळेत अभ्यासासाठी ठेवले होते. पत्नीसह ते मुंबईला रहात होते. नियमाने स्टुडिओत जात. त्यांनी ऑफिसमध्ये यावे असे कोणतेच बंधन त्यांच्यावर नव्हते. पण घरी बसण्यापेक्षा कामाच्या जागी बसणे ते अधिक पसंत

करीत. त्यांना सर्व लोक मान देत पण एकूण त्यांची प्रकृती या वातावरणाशी विसंगत होती. इंद्रनाथ महाजनांना लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात : 'साहित्यिक माणसासाठी सिनेमा ही योग्य जागा नव्हे. आर्थिक दृष्टीने स्वतंत्र होण्याची शक्यता आहे असे वाटल्यामुळे मी इकडे आलो होतो पण तो माझा भ्रम होता. मी पुन: साहित्याकडे वळत आहे. खरे तर मी लिहिणे बंद केलेच नाही. ते तर माझ्या जीवनाचे ध्येय आहे. जशी वकिली तसा सिनेमा. मात्र सिनेमा वकिलीपेक्षा चांगला म्हणता येईल.'

सिनेमासृष्टीसंबंधी ते जैनेंद्रांना लिहितात, 'हे प्रोड्युसर ज्या तऱ्हेची कथा बनवीत आले आहेत त्यापासून जराही हटू इच्छित नाहीत. व्हल्गॅरिटी म्हणजे यांना एंटरटेनमेन्ट व्हॅल्यू वाटते. अद्‌भुतावर यांची मदार ! राजे राणी, त्यांच्या मंत्र्यांचे कट, नकली लढाया, चुंबने ही यांची साधने. मी सामाजिक कथा लिहिल्या आहेत व त्या सुशिक्षित समाजाला आवडतील पण त्यांचे फिल्मीकरण करण्यात यांना अशी भीती वाटते की फिल्म चालेल की नाही ! हे वर्ष कसेतरी पूर्ण करायचे आहे. कर्जदार झालो आहे. ते कर्ज फिटेल. कादंबरीची शेवटची पाने लिहायची आहेत पण तिकडे मन लागत नाही. इथून सुट्टी मिळाली की जुन्या अड्डयावर जाऊन बसेन. तेथे पैसा नाही पण संतोष निश्चित आहे. इथे तर असे वाटते की जीवन नष्ट करीत आहे.'

त्यांनी फिल्म लाईनचा विचार मनातून पार काढून टाकला. 'बॉम्बे टॉकिज' चे डायरेक्टर हिमांशु राय यांनी त्यांना निमंत्रण दिले पण प्रेमचंदांनी त्याना स्पष्ट पणे नकार दिला.

या अवधीत ते राष्ट्रभाषेच्या प्रश्नावर गंभीरपणे विचार करीत होते. मुंबई, मद्रास, म्हैसूर, बंगलोर इत्यादी ठिकाणी त्यांनी या विषयावर अनेक व्याख्याने दिली. ही शहरे पाहिली.

मुंबईतील वास्तव्याला ते फारच कंटाळले होते. करार संपण्याआधीच दोन हजार रुपयांवर पाणी सोडून त्यानी बनारसला परतण्याचा निर्णय घेतला. 'अजंता' कंपनीनेही गाशा गुंडाळायला सुरुवात केली होती, जैनेद्रांना लिहिलेल्या पत्रात त्यांनी फिल्म लाईन मध्ये मिळालेल्या पैशांचा जमाखर्च दिला आहे. परत येतांना त्यांच्या गाठीला होते चौदाशे रुपये आणि पदरी निराशाजनक अनुभव. हा अनुभव

त्यांच्या दृष्टीने तर महत्त्वाचा होताच पण फिल्म इंडस्ट्रीचे दरवाजे ठोठावणाऱ्या साहित्यिकांच्या दृष्टीनेही हा अनुभव मोलाचा होता. या अनुभवाचा निष्कर्ष हा की ज्याला साहित्यिक म्हणून कार्य करायचे आहे त्याने भलतेच भ्रम बाळगून या उद्योगात पडू नये.

प्रेमचंदांच्या आयुष्याची संध्याकाळ जवळ आली होती. त्यांच्या अविरत तपस्येचा काहीसा मोबदला कीर्तीच्या आणि सन्मानाच्या रुपाने त्यांना मिळाला. बराचसा देश त्यांनी पाहिला. अलाहाबादला हिंदुस्थानी अकादमीच्या बैठकीला ते उपस्थित राहिले. अनेक लेखकांना भेटले. त्यांच्या मनातील आपल्याबद्दचे प्रेम, व आदर यांचा प्रेमचंदांना प्रत्यक्ष अनुभव आला. हिंदी व उर्दू या दोन भाषांमधला ताण दूर करून लेखकांना जवळ आणण्याच्या दृष्टीने त्यांना प्रयत्न करायचे होतें. या हेतूने त्यांनी ‘ हिंदुस्थानी सभा ’ या संस्थेच्या दोन शाखा दिल्ली व लाहोर येथे स्थापन केल्या. लखनौमध्ये आयोजित केलेल्या ‘ प्रगतिशील लेखक संघ ’ या संस्थेच्या अधिवेशनाचे अध्यक्षपद त्यांना देण्यात आलें ९–१० एप्रिल १९३९ रोजीं हे अधिवेशन संपन्न झाले. प्रेमचंदाचें अध्यक्षीय भाषण म्हणजे त्यांच्या परिपक्व व सखोल विचाराचे प्रतिबिंबच होते. आपली साहित्याकडे पहाण्याचीं दृष्टी त्यांनी निस्संदिग्धपणे, आणि साध्या भाषेत स्पष्ट केली. कला, सौंदर्य, लेखकाचे दायित्व. साहित्याचे मानवी जीवनातील स्थान इत्यादि विषयांवर त्यांनी स्पष्टपणे आपले विचार व्यक्त केले. त्यांच्या सर्व विचारांचे मुख्य सूत्र असे होते. लेखकाने आपल्याला मिळालेल्या प्रतिभा शक्तीचा उपयोग मानवजातीच्या सेवेसाठी जागरूकपणे करावा.

हिंदू मुसलमानाच्या ऐक्याचा आदर्श प्रेमचंदानी मनात सदोदित जपला होता. उर्दू व हिंदी भाषांतील वैमनस्य कमी व्हावे असेही त्यांना मनापासून वाटत असे. लाहोरला आर्यसमाजाच्या सभेत त्यांनी हे विचार व्यक्त केले. या विषयांवर ते ‘ हंस ’ मधून सातत्याने लिहितच होते. हिंदी साहित्य समेलनासाठी व भारतीय साहित्य परिषदेच्या अधिवेशनासाठीं उपस्थित राहण्यासाठी ते नागपूरला आले, परिषदेचे कामकाज हिंदीत चालावे की हिंदुस्थानीमध्ये हा वाद सुरू झाला व तो इतका शिगेला गेला की अधिवेशनच बरखास्त करावे लागेल की काय अशी भीती निर्माण झाली. महात्मा गांधींनी आपल्या अध्यक्षीय भाषणात या विषयाला तोंड फोडले होते. हिंदी व उर्दू असे सरळ दोन तट पडले होते. प्रेमचंदांनी, हिंदुस्थानी-मधून परिषदेची कार्यवाही व्हावी असे जोरदार भाषण करून प्रतिपादन केलें.

मे. १९३६ च्या शेवटी ‘गोदान’ प्रकाशित झाले. प्रेमचंदांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा हा कळस होता. पण याच सुमारास प्रेमचंदाना विश्रांती घेण्याची फार आवश्यकता वाटू लागली. शिवरानीजी त्यांच्या कार्यक्रमावर सक्त नजर ठेवून होत्या. प्रेमचंदांचा पोटदुखीचा विकारही बळावला होता. वांत्या सुरू झाल्या होत्या. प्रेमचंद शारीरिक पीडांनी फार टेकीस आले होते.

गोर्कीच्या मृत्यूची बातमी आली. ‘आज’ च्या कार्यालयात शोकसभा होती. प्रेमचंदजींचा आवडता लेखक गेला होता. प्रेमचंदानी आजारी असताना रात्री उठून भाषण लिहून काढले. जिना चढणे उतरणेही फार कठीण होते पण तरीही ते सभेला गेले. भाषण वाचण्याची शक्तीच नव्हती. त्यामुळे त्यांचे भाषण दुसऱ्यानेच वाचले.

२५ जून प्रेमचंदांना रक्ताच्या उलटचा होऊ लागल्या त्यावेळचा पती-पत्नीचा संवाद :

मुंशीजी हळूच पुटपुटले, ‘रानी मी आता चाललो.’ रानीनी आपल्या हुकमी स्वरात म्हटले—‘गप्प बसा. मला सोडून तुम्ही जाऊ शकत नाही.’

पसरलेल्या रक्ताकडे इशारा करून मुंशीजी बोलले, ‘ज्याच्या तोंडातून इतके रक्त पडले त्याच्या जगण्याची तू आशा करतेस ?’

रानीजीनी म्हटले -‘का करू नको ? मी कुणाचे काही वाईट केले नाही.’

मुंशीजीनी तोंड फिरवले.

त्या दिवसानंतर त्यांची निद्रा नाहीशी झाली. सर्व काही झरून गेल्याची जाणीव होत होती. पोटात पाणी वाढत होते. भयानक वेदना होत होत्या. उठणें वा पडून राहणें, सर्व काही कठीण झाले होते.

या स्थितीतही मुंशीजी कधी तरी बिछाना सोडून जमिनीवर येत. अपूर्ण राहिलेले ‘मंगलसूत्र’ हाती घेत. या कादंबरीचा नायक हे प्रेमचंद स्वतःच होते. ख्यातनाम, सच्चा, ईमानदार, स्वाभिमानी आणि गरीब—’

‘मंगलसूत्र’ च्या नायकाविषयी (देवकुमार) प्रेमचंद लिहितात : साहित्य सेवेशिवाय अन्य कुठल्याच कामात त्याला रुची नसे. इथे धन कुठचे मिळणार ? यश भरपूर मिळाले. त्याच्या आत्मसंतोषासाठी तेवढे पुरेसे होते. संचय करण्यावर त्याचा विश्वास नव्हता आणि कदाचित परिस्थितीने हा विश्वास पक्का करण्यात भर घातली असावी.

देवकुमारची व्यथा होती– या जगात कुव्यवस्था का? कर्म संस्कार, सर्वात्मवाद इत्यादि उत्तरांनी त्याचें समाधान होत नव्हते. ही सर्व प्रेमचंदांची स्वत:ची जिज्ञासा होती. 'मंगलसूत्र' कादंबरीत प्रेमचंदानी स्वत:ची जीवन-विषयक एकूण भूमिका प्रस्तुत होत होती.– होत होती, झाली नाही कारण ही कादंबरी ते पूर्ण करु शकले नाहीत.

२५ जुलै! रक्ताची पहिल्यांदा उलटी झाल्याला एक महिना पुर्ण झाला होता. आणि पुन्हा रक्ताची उलटी झाली. शिवरानीजी त्यांच्या डोक्याला, पायाला मालिश करत होत्या. प्रेमचंदांनी त्यांना झोपायला सांगितले. रात्री ते संडासाकडे जायला निघाले आणि पुन्हा रक्ताची उलटी झाली. शिवरानीजीनी मुलाला डॉक्ट-रला बोलवायला सांगितले. प्रेमचंदांनी थांबविले. त्यांनी कागद लेखणी मागितली. शिवरानीजींनी विचारले, 'क्या होगा?' 'तुमको बैठने का ठिकाना तो करता जाऊँ।' ते रडू लागले. मृत्युचे भय नव्हते– हे मुलांना असुरक्षित ठेऊन जाण्याचे दुःख होते. पुढे चार दिवस बनारसला इलाज करण्यात आले. एक्स–रे–साठी लखनौला जाण्याचे ठरवले.

लखनौला त्यांचा एक्स–रे काढण्यात आला. सर्व परीक्षा घेण्यांत आल्या. निदान– जलोदर आणि हृदय कडक होत जाणे– सिरोसिस ऑफ लिव्हर. इलाज चालले होते. पण कुठच्याही दोन डॉक्टरांची मते जुळत नव्हती. पैसा पाण्यासारखा वाहून चालला होता. जवळचा पैसा संपला आणि निगमसाहेबांकडे मागणी करण्यात आली. सूर्या हॉटेलमध्ये राहत होते. आर्टिस्ट अब्दुल हकीमसाहेब त्यांना जबर-दस्तीने आपल्या छोटयाशा घरी घेऊन आले. सख्या भावासारखी त्यांनी मुंशीजींची सेवा केली. तरुण लेखक गंगाप्रसाद मिश्र जवळ होते. त्या अवस्थेंतही मुंशीजींनी त्यांची कथा ऐकून त्यांची प्रशंसा केली.

प्रेमचंद बनारसला परतले. शरीराचा सापळा झाला होता. चेहरा पिवळा पडला होता. डोळे खोल गेले होते. आपण आता वाचत नाही याची मनोमन खात्री झाली होती. डॉक्टरांनी अधिक हवेशीर घरात राहण्याचा सल्ला दिला. सुदैवाने भारतेंदु हरिश्चंद्रांचे घर रिकामे होते, तिथे रहायला गेले.

२५ ऑगस्ट पुन: रक्ताची उलटी होईल अशी भीती. याच सुमारास जैनेंद्र तिथे आले. त्यांनी नमूद केले आहे. प्रेमचंद खाटेवर पहुडले होते. आजार वाढला होता.

उठणे चालणे शक्य नव्हते. देह पिवळा पडला होता. पोट वाढलें होते पण चेहऱ्यावर शांती होती. त्यांच्या खाटेलगत मी खूप वेळपर्यंत बसलो आहे. त्यांच्या मनात कसलींच चीड कटुता किंवा कसल्याही प्रकारची मलिनता दिसली नाही.

जे सांगायचे झाले ते सांगून झाले होते. मनात कुठल्याही प्रकारची अपराध भावना नव्हती, आत्मग्लानी नव्हती, अतृप्ती नव्हती. प्रत्येक क्षण सोर्थकी लागला ोता. स्वकर्तव्यात कोणत्याही प्रकारची कुचराई त्यांनी कधीं केली नव्हती. शांत आणि निर्विकार मनाने मृत्यूची वाट पहात होते.

जैनेंद्रना ते म्हणाले, 'जैनेंद्र अशा वेळी लोक ईश्वराचे स्मरण करतात· मलासुद्धा त्याची आठवण करून देतात. पण अजूनतरी ईश्वराला कष्ट देण्याची गरज मला भासली नाही.'

यावर जैनेंद्राची अतिशय मार्मिक आणि काव्यात्मक अशी टिप्पणी पहा.

'शब्द हळूहळू स्थिरतापूर्वक उच्चारले गेले होते. आणि मी त्या अत्यंत शांत, नास्तिक संताच्या शक्तीवर विस्मयचकित झालो होतो.

श्या अस्वस्थेतही त्यांनी ब्रुसेलसमध्ये होणाऱ्या विश्वशांती समेलनाच्या घोषणापत्रावर हस्ताक्षर केले होते.

शेवटच्या अवस्थेतही प्रेमचंद आपली विनोद बुद्धी आणि प्रसन्न हास्य विसरले नव्हते. हकीमसाहेबांना औषधोपचार पुरे असे सांगत होते. आणि हकीमसाहेब आत्मविश्वासाने आपल्या औषधांची तारीफ करीत होते ! प्रेमचंद तिमजली हास्य करीत होते !!

मृत्यूच्या पंधरा दिवस आधी त्यांनी आपल्या जिवलग मित्राला बोलावून घेतले, निगम नारायण यांना. मित्रापासून अलग होण्याचे दुःख प्रेमचंदाना सहन होईना. या जगात माणसांविषयी अनुभवलेले स्नेहाचे भावबंध सोडून जावे लागणार याचे दुःख होते. ते मुलासारखे रडले.

एकीकडे तरुण लेखकांना आशीर्वादपर, प्रोत्साहन देणारी छोटी पत्रे लिहित होते, साहित्यिक मित्रांशी गप्पा करीत होते. नंददुलारे वाजपेयी, निराला. प्रसाद आणखी कितीतरी साहित्यिक येऊन जात होते. एकदा निरालांना ते नमस्कार करून म्हणाले,– 'आतां तर शेवटचा निरोप आहे !' ज्या व्यक्तीबद्दल अतिशय

आदर व प्रम वाटत होते. ज्या व्यक्तिमत्वाबद्दल कुठचीही हीन भावना मनात येणे सुद्धा शक्य नव्हते अशा पूजनीय व्यक्तित्वाला मृत्यूकाळ फास टाकून ओढून नेत होता आणि सर्व प्रतिभावंत मित्र अगतिक होऊन दु:खावेगाने ते फक्त निमूटपणे पहाण्यापलिकडे काहीच करु शकत नव्हते.

८ ऑक्टोबर थंडीची सकाळ. साडेसातचा सुमार. दात घासण्यासाठी दातवण घेऊन शिवरानीजी आल्या. दातवण दातांना लावले पण दातच गच्च झाले. चूळ भरण्यासाठी तोंडच उघडेना. विवश नेत्रांनी त्यांनी पत्नीकडे पाहिले. आतल्या आवाजाने केवळ म्हटले– ‘ रानी–’ आणि सर्व काही संपले.

दुपारी अकरा वाजता शवयात्रा निघाली. फक्त २०–२५ माणसे रस्त्यात कुणीतरीं दुसऱ्याला विचारले– ‘ कोण गेले ?’ दुसऱ्याने उत्तर दिले, ‘ होता कोणी मास्तर !’

● ● ●

# वाङ्‌मयीन कर्तृत्वाचा एक आलेख

१९०८ साली प्रेमचंदांचा पहिला उर्दू कथा-संग्रह सरकारी रोषास बळी पडून जप्त झाला. प्रखर राष्ट्रीयता हा प्रेमचंदांच्या साहित्याचा एक महत्वाचा विशेष होता आणि राष्ट्रीय भावनेचे अनुभवाच्या आशयावर व अभिव्यक्तीवर जे बरेवाईट परिणाम होतात ते प्रेमचंदांच्या लेखनावर दिसून येतात. त्यांचा लेखाच्या ओघात प्रसंगपरत्वे विचार होईलच. पण एक गोष्ट महत्त्वाची वाटते. प्रेमचंदांचा कथा संग्रह जप्त व्हावा हे त्यांच्या लेखनशक्तीचे जसे निदर्शक आहे तसेच काळाबरोबर राहाण्याच्या व काळाची आव्हाने स्वीकारण्याच्या त्याच्या वृत्तीचे निदर्शक आहे. रंजन करणे व कीर्ती मिळवणे या त्यांच्या साहित्याच्या प्रेरणा कधीच नव्हत्या. लेखन समकालीन वास्तवाच्या भरभक्कम पायावर उभे असले पाहिजे, ते मनोरंजनापेक्षा अधिक गंभीर अशा जीवनदर्शनाच्या प्रेरणेने सहजपणे, (कलावंताच्या अंतर्यामीच्या ओढीने) आविष्कृत झाले पाहिजे. ते स्थळकाळाशी संबंद्ध होऊन जीवनशक्ती खेंचून घेणारे असले तरी त्यात स्थळ-काळाला अतिक्रमित करण्याची सर्जनात्मक क्षमता असली पाहिजे. वयपरत्वे प्रगल्भ झालेल्या या साहित्यिक जाणिवा आरंभापासून बीजरुपाने प्रेमचंदांच्या मनात होत्या यात संशय नाही. म्हणूनच १९०८ साली 'नबाबराय' या नावाने लिहिलेला त्यांचा कथासंग्रह जप्त व्हावा ही घटना बोलकी आहे. साहित्य आणि राजसत्ता यांच्यात सामान्यतः विरोधच असतो. आणि राजसत्तेला साहित्याच्या अहिंसक सत्याग्रहाची चांगलीच दखल घ्यावी लागते हे सत्य इतिहासाने अनेकदा सिद्ध केलेले आहे. राजे-रजवाडे असोत, हुकुमशाही असो, एकपक्ष सत्ता असो किंवा क्रांतीनंतरची राजकीय सत्ता असो लेखकालाही आपल्या सत्याग्रहाची किंमत द्यावी लागलेली आहे. प्रेमचंदांच्या लिखाणात तत्कालीन राजसत्तेविषयीचा सर्व-व्यापी निषेध व्यक्त झाला आहे आणि त्यात त्यांच्या लेखनाची शक्तीही प्रकट झाली आहे. पण इंग्रजाविरुद्ध कडवट विद्रोहभाव हा त्यांच्या साहित्यातला एक

भाग झाला. सत्ता हाती घेण्यासाठी व ती टिकविण्यासाठी जे भ्रष्टाचरण नेतृत्वाच्या रुपाने चालते त्यातले हीण ही प्रेमचंदांनी वेळोवेळी व्यक्त केले आहे. एवढेच नव्हे तर राष्ट्रभक्तीच्या नावावर जे न्यस्त स्वार्थाचे खेळ चाललेले असतात त्यातील ढोंगही प्रेमचंदांनी व्यक्त केले आहे.

## विरोधातून विकास :

प्रेमचंदाच्या सर्व लेखनकर्तृत्वाकडे पाहिले की विरोधातून विकास हे एक सूत्र दिसते आणि त्यांच्या विकासक्षम प्रतिभेचे आश्चर्यही वाटते.

त्यांनी उर्दूत लिहायला सुरवात केली पण परिश्रमपूर्वक हिंदीत लेखन करू लागले आणि हिंदी भाषेला व साहित्याला नवे वळण दिले. स्वत: शारीरिक परिश्रमाशी पाठ फिरवलेल्या कायस्थ जातीत जन्मले, सुखवस्तु, कुटुंबाच्या संस्कारात वाढले पण ' धन की दुश्मनी ' हा स्थायीभाव साहित्यात व्यक्त झाला आणि शारीरिक परिश्रमाला त्यांनी अत्यंत महत्त्व दिले, स्वत: लेखणीने श्रम करीत राहिले. टीकेची प्रखर नजर वरच्या वर्गातील शोषणप्रणालीवर ठेवली आणि हृदय मात्र सामान्य माणसाच्या जीवन व्यवहाराची अनंत रूपे न्याहाळण्यात व त्यांना सहानुभूती देण्यात गुंतवले. या धनपतरायच्या साहित्यानुभवाचा केंद्रीय भाग भूमिपुत्राच्या सुखदु:खाशी (दु:खाशीच अधिक) संबंध आहे. सवेदनशील मनाने जाणता वा अजाणता टिपलेले अनुभव पुढे प्रतिभेच्या प्रकाशात अधिक जोमाने, विस्ताराने, सखोलपणाने फुलायचे होते. विकसित व्हायचे होते त्यांनी स्वत: शेती केली नाही, पण ज्या गावात बालपण गेले त्या गावातल्या शेतमजुरांच्या अनन्वित छळाचे, हलाखीचे, व शोषणाचे जे विदारक आणि करुण दृश्य त्यांनी पाहिले त्याचा प्रत्ययकारी ठसा त्यांच्या सर्व लेखनात उमटलेला आहे. आत्मकेंद्रितपण विसरून प्रेंमचंदानी सभोवतालचे जग तन्मयतेने पाहिले. त्यांना ' गवई गांव का कलाकार ' म्हटले आहे ते अर्धसत्य आहे कारण संपूर्ण प्रेमचंद यापेक्षाही मोठे होते.

## उर्दू व हिंदी साहित्याला नवे वळण :

कार्यस्थांच्या पोटापाण्याच्या भाषेचे उर्दूचे बाळकडू त्यांना मिळाले. त्यांनी संस्कार घेतले त्यात उर्दू साहित्यिकांचे संस्कारही मोठे होते. मौलवी नजर अहमद, पंडित रतननाथ सरशार, अब्दुल हालीम, मिर्जा रुसवा, महमंद अली नियाजी

इत्यादी आख्यायिकाकाकारांचे. पण हिंदीप्रमाणे उर्दू साहित्यावरही प्रेमचंदाचा ठसा उमटला आहे. प्रेमचंदांनी साहित्यात केलेल्या युगांतराचे एका वाक्यात वर्णन करायचे तर असे म्हणता येईल. प्रेमचंदानी कथावाङ्मयाला वास्तवाकडे उन्मुख करून जीवन संवादी बनविले आणि जीवनवादी कलात्मक वाङ्मयाची श्रेष्ठ परंपरा निर्माण केली. हे कर्तृत्व जसे साहित्याला विकसित करणारे, उन्मेषशाली बनविणारे, विकासाच्या अकरा दिशा धुंडाळणारे आहे तसेच ते एका कलावंताला महान कलावंतांच्या पंक्तीत बसवून मानाचे पान देणारेही आहे. आश्चर्य असे की ही वास्तवाभिमुखता प्रेमचंदांनी स्वानुभवाने आणि स्व-चिंतनाने प्राप्त केलेली आहे. बालवयात जे साहित्य त्यांना वाचायला मिळाले ते अद्भुतता, चमत्कार, फॅटन्सी यांचा अतिरेक असलेले, कथेतील घटनांच्या शृंखलांत, गुंतागुंतीत अडकवून ठेवणारे क्षणाक्षणाला वाढत्या विस्मयाच्या आंदोलनात हिंदकळत ठेवून आजुबाजूच्या काटेरी जगाचे भान नाहीसे करणारे. वास्तवपराङ्मुख आणि रंजनातिरेकी साहित्याचे तन्मयतेने आस्वादन करूनही प्रेमचंदांनी नेमकी विरोधी वाट चोखाळली हे त्यांच्या कर्तृत्वाचे महत्वाचे गमक. प्रेमचंदांनी उर्दू व हिंदी साहित्याला दिलेले हे वळण एवढे मोठे आहे की हिंदीमध्ये कलावादी, रुपवादी, रंजनवादी विचार-सरणी कधीच रुजू शकली नाही. (अज्ञेयासारख्या कलेविषयी विरोध जागरुक असणाऱ्या लेखकावर कलावादी असण्याचा धादांत खोटा आरोप व प्रचार केला जातो. त्याला पुरावा नाही आणि अशा खोटया आरोपांना उत्तर देत बसण्याचेही कारण नाही.) या ठिकाणीं एक महत्वाची साहित्यिक घटना नमूद करायला हवी. प्रसाद प्रेमचंदांपेक्षा नऊ वर्षांनी लहान. ते छायावादी कवी व ऐतिहासिक नाटककार. त्यांच्या कथात, काव्यात, नाटकात स्वच्छंदतावाद (सौंदर्यवाद) एवढा प्रबळ आहे की प्रेमचंद व प्रसाद ही दोन वेगळी स्कूलस आहेत असे मानले जाते. पण प्रेमचंदांच्या वास्तववादी कादंबरी वाङ्मयाचा प्रसादांवर इतका प्रभाव पडला की त्यांनी ज्या दोन पूर्ण कादंबऱ्या (‘कंकाल’ व ‘तितली’) लिहिल्या त्यावर वास्तवाचा पूर्ण पगडा आहे. ‘कंकाल’ मधील वास्तववाद तर नॅचरॅ-लिझमला स्पर्श करतो असे वाटते. तो विदारक वास्तववाद आहे. या घटनेचा प्रेमचंदांना खूप आनंद झाला होता कारण प्रसादांच्या नाटकांसंबंधी प्रेमचंदांनी सहज टिपणी केली होती की ‘प्रसाद पुरलेले मुडदे उखडून काढतात–’ प्रसादांची जणू त्याना उत्तर दिले–‘ मी वास्तवतावादी कादंबऱ्याही लिहू शकतो ! !’

प्रेमचंदाना या कादंबऱ्या आवडल्या होत्या व त्यांनी म्हटले, माझ्या टोचणीने जर प्रसादजी असे लेखन करतील तर त्यांना टोचण्यात मला आनंदच वाटेल!' दोन भिन्न प्रवृत्ती असलेल्या पण हृदयात एकमेकांबद्दल नितांत प्रेम असलेल्या दोन मोठ्या साहित्यिकांचा हा उदार संवाद होता. ज्या काळात मराठी साहित्यात जीवनवाद कलावाद यावर तुंबळ रण माजले होते (आणि मोठ्या लेखकांच्या खाजगी जीवनांतही या विरोधाची कुंपणे निर्माण झाली होती) आणि जीवनवादी साहित्यिकही कलावादाला शरण जाऊन या तंत्राला अतिरेकी महत्त्व देत होते त्या काळात हिंदी साहित्यात शक्तिशाली, सौंदर्यवाद वा स्वच्छंदतावाद ('कामायनी' सारख्या कलाकृती व छायावादी काव्य) वास्तववादाने प्रभावित होत होता. या घटनेत प्रेमचंदाचा वाटा सिंहाचा आहे.

## भाषेचे सामर्थ्य वाढविणारा लेखक :

प्रेमचंद उर्दूकडून हिंदीकडे वळले आणि त्यानंतर उर्दू, पंजाबी इत्यादी भाषांकडून हिंदी भाषेकडे वळणाऱ्या लेखकांची एक मोठी परंपराच हिंदीमध्ये निर्माण झाली. प्रेमचंदाची आरंभीची भाषा व नंतर 'गोदान,' 'कफन,' 'पूसकी रात' मधील भाषा यांचा तुलनात्मक अभ्यास केला तर भाषा आत्मसात करून घेण्यात व तिच्यावर हुकमत गाजवण्यात जे अभूतपूर्व यश प्रेमचंदानी मिळवले ते त्यांच्या विकासशील प्रजेचे उत्तम उदाहरण ठरतेच पण त्याही पेक्षा महत्त्वाची बाब ही की त्यांनी हिंदीला एक नवा 'मुहावरा' मिळवून दिला. तत्कालीन प्रसादांची संस्कृत–प्रचुर भाषा व द्विवेदी युगातली गरिष्ठ ग्रांथिक भाषा यांच्या संदर्भात प्रेमचंदाच्या भाषेचा विचार केला तर असे म्हणता येते की प्रेमचंदानी व्यवहारिक जीवनातील सामान्यांची जनभाषा व साहित्यिक ललित भाषा यांच्यातले अंतर फार कमी केले. प्रेमचंदानी संस्कृतप्रचुर हिंदी व अरबी फारसी-युक्त उर्दू या दोन टोकाना न जाता 'आम भाषेचा उपयोग केला आणि खऱ्या अर्थाने राष्ट्रभाषेला तिचे स्वतःचे स्वरूप मिळवून दिले. त्याच भाषेला नवे स्वरूप देणे फक्त शब्दसंचयाच्या वैशिष्टयापुरते मर्यादित नव्हते. जीवनांतल्या घटनांची शब्दचित्रें रेखाटून त्यांनी भाषेला जीवनाचा एक ठसका दिला, बोली भाषेचा जीवंत स्पर्श, हरघडीच्या वापरातील म्हणींचा व उक्तींचा ठसकेबाज वापर आणि प्रचुर अर्थ सहजपणे व्यक्त करण्याच्या लकबी या वैशिष्टयांनी प्रेमचंदांची भाषाही

मोठी समृद्ध झाली आहे. एखाद्या लेखकाने भाषेला वेगळेपण द्यावा, शक्ती द्यावी, विकासातील महत्वाचा टप्पा गाठून द्यावा हे त्या लेखकाच्या महनीयतेचे लक्षण मानले तर प्रेमचंदांना हिंदीचे मोठे लेखक मानणे भागच आहे. हिंदी भाषेला अनेक लेखकांनी नवनवी सामर्थ्य प्राप्त करून दिली (महावीर प्रसाद द्विवेदी, पंत, निराला, अज्ञेय) त्या हिंदी लेखकांमध्ये प्रेमचंदांचे स्थान फार महत्वाचे आहे. प्रेमचंदांना भाषेचा विकास करता आला त्यांच्या अनेक कारणांपैकी एक महत्वाचे कारण ते उर्दूतील रवानी (प्रवाह) घेऊन हिंदीत आले. दुसरे कारण म्हणजे प्रेमचंदांचे सर्व व्यक्तित्वच जनवादी लेखकाचे होते. सामान्य माणसाच्या सुखदुःखाशी एकरुप होऊन त्याचे चित्रण करणारे ते लेखक होते. व्यावहारिक सर्व प्रकारचा जीवनानुभव त्यांनी व्यक्त केला. अर्थातच त्याला साजावी अशी भाषा त्यांनी सहजपणे वापरली. हिंदी भाषेवरच्या सर्व अभिजात्याच्या खुणा पुसून त्या भाषेला प्रेमचंदांनी अधिक जनाभिमुख केले. त्यांच्या भाषासेवेचे हे एक महत्वाचे रहस्य आहे.

प्रेमचंदांनी सर्व प्रकारचे लेखन केले. नाटके लिहिली, बालवाङ्मय रचले, निबंध लिहिले, अनुवाद केले पण त्यांचे खरे कर्तृत्व कथावाङ्मयातलेच. त्यांनी लिहिलेल्या १२ कादंबऱ्या व २९९ कथा त्यांच्या साहित्यिक कार्याची महत्वाची ठेव आहे. यातील काही निवडक कादंबऱ्या व कथांचा समीक्षात्मक अभ्यास या ग्रंथात पुढे येईलच.

## वाङ्मयीन दृष्टी :

प्रेमचंद एका व्यापक अर्थाने उपयुक्ततावादी लेखक होते. लेखकाला जी प्रतिभा, संवेदनशीलता लाभलेली असते ती जनतेच्या सेवेसाठी असते अशी त्यांची निष्ठा होती. स्थूल रंजनवादाचे कट्टर विरोधक ते होतेच पण कलावादासंबंधीची त्यांची भूमिका मोठी गंमतीदार होती. कला स्वायत्त असावी, कलावंताने कुणाचे जाबेदार असू नये व परिणामांची क्षिती बाळगू नये असे त्यांना वाटे. पण त्यांचे म्हणणे असे होते की ज्या देशात जीवन समस्यात्मक आहे, देश अविकसित आहे समाज विषमतेवर आधारलेला आहे त्या देशात, त्या समाजात कलावादाचा आग्रह हानिकारक आहे. याचाच अर्थ असा की ते तत्वतः कलावंतावर बंधने असू नयेत या मताचे असले तरी कलावंताने समाजाशी व काही मूल्यांशी बांधिलकी ठेवलीच

पाहिजे. असा त्यांचा आग्रह होता. प्रेमचंदांच्या मूल्य विषयक विचारात सर्वात अधिक स्थान नीति-मूल्यांचे होते, शिव-तत्वाचे होते. साहित्य नेहमी सत्य व शिव याकडे उन्मुख व गतिमान असले पाहिजे. सौंदर्य व रुप शेवटी एक साधन आहे अशी त्यांची धारणा होती. याचा परिणाम त्यांच्या साहित्यावर झालेला आहे. ते मोठे कलाकार होते आणि सहाजिकच त्यांच्या काही लघुकथा सौंदर्य व रुप-सौष्ठवाच्या दृष्टीने खूप दर्जेदार झाल्या आहेत. मात्र त्यांच्या कादंबऱ्यात आशयाच्या विस्तारामुळे कधी कधी आकाराची शिथिलता आलेली आहे. जन जीवनाबद्दल असलेली आत्मीयता लोककल्याणाची दृष्टी, भौतिक प्रश्नांविषयींची आस्था यामुळे प्रेमचंदांनी अनेक व्यापक प्रश्नांना व समाज-जीवनाच्या चित्रणाला हात घातला. तसेच समाज व व्यक्ती यांच्या जीवनातील गाभ्याच्या प्रश्नांना हात घातल्यामुळे मोठ्या लेखकाची जबाबदारी त्यांनी पार पाडली असे म्हणता येईल. याचे अधिक स्पष्टीकरण पुढे येईलच.

## प्रेमचंदांना मिळालेला वारसा आणि त्यांचे संचित :

प्रेमचंदांना हिंदीमध्ये जी साहित्यिक परंपरा लाभली ती तीन प्रकारची होती. वाचकांची उत्कंठा वाढविणाऱ्या घटनांची प्रचंड मालिका निर्माण करून त्याला अद्‌भुतरम्य वातावरणात गुंतवून ठेवण्याची तिलस्मी–ऐयारी परंपरा, दुसरी थोडी अधिक व्यावहारिक भूमीवरची घटनाप्रधान परंतु बौद्धिक कार्य-कारणभावांनी बांधलेली गुप्तहेर कथा, व तिसरी परंपरा उपदेशपर नीरस कादंबऱ्यांची. देवकीनंदन खत्रींच्या 'चंद्रकांता', 'चंद्रकांता संतति' इत्यादी जादूमयी अद्‌भुत कादंबऱ्यांनी लोकमानसाची विलक्षण पकड घेतली होती व कित्येक वाचक या कादंबऱ्या वाचण्यासाठी हिंदी शिकले असे म्हणतात. पण १९१९ साली प्रेमचंदांची 'सेवासदन' कादंबरी प्रकाशित झाली आणि हिंदी वाङ्मयाचे स्वरुप बदलून गेले. जीवन-दर्शनाची आंतरिक तळमळ, मानवी जीवनाच्या गुंतागुंतीच्या समस्यांबद्दल प्रचंड बौद्धिक व भावनात्मक कुतुहल, ही तळमळ व हे कुतुहल हाडामासांच्या मानवी स्वभावाच्या पात्राच्या माध्यमातून व्यक्त करण्याची कलात्मक उर्मी, सामान्य माणसाच्या मनातील वृत्ती-प्रवृत्तींची व मानसिक खळबळीची प्रचंड जाण, गंभीर व समंजस वाचकाला आकर्षून घेईल इतक्या रोचकतेने आशयाला आकार देण्याचे शिल्पकौशल्य या वैशिष्टयांनी

युक्त प्रेमचंदांची 'सेवासदन' कादंबरी प्रकाशित झाली आणि हिंदी-मधले रहस्यमय, अद्‌भुतरम्य, काल्पनिक उत्कंठावर्धन करणारे घटनाबदल व नीरस उपदेश परतेचे वाङ्‌मयीन कार्य आपल्या दर्जावरून फार खाली घसरले. जीवन व कला यांच्या संवादी प्रेरणेने हिंदी कादंबरी वाटचाल करू लागली. याआधी सुमारे १९१३ पासून प्रेमचंदांचे कथा वाङ्‌मय हिंदीत प्रकाशित होत होते. हिंदी कादंबरी वाङ्‌मयाला वास्तववादी भूमीवरून चालायला लावण्याचे श्रेय प्रेमचंदाना सामान्यत: निरपवादपणे दिले गेले आहे प्रेमचंदांच्या महनीयतेचे तें आणखी एक गमक आहे.

## आदर्शोन्मुख यथार्थवाद :

प्रेमचंदांच्या सर्व कथावाङ्‌मयाचा विचार केला तर ते विविध पातळ्यांवर निरंतर विकासमान होणारे लेखक होते असे सहज म्हणता येते. कादंबरी किंवा कथावाङ्‌मयाचे प्राणभूत तत्त्व 'वास्तववाद' प्रेमचंदाच्या सर्वच साहित्यात वास्तववादाचे स्थान मोठे आहे. प्रेमचंदांचा हा वास्तववाद तपशीलात रमून जीवनाची फोटोग्राफिक अनुकरणात्मक आवृत्ती करणारा वास्तववाद नाही. सर्व साहित्याकडे त्यांनी उद्देशवादी दृष्टीने पाहिले. वाचकांवर सद्‌भावनेचे, सद्‌विचारांचे संस्कार करणे व त्यांची सवेदनशक्ती व जीवनविषक समज तीव्र व व्यापक करणे हे साहित्याचे उद्दिष्ट आहे असे त्यांनी मानले. खरा लेखक केवळ जीवनाचे वास्तवादी चित्रण करीत नसतो. त्या वास्तवातून आदर्शही सहजपणे प्रादुर्भूत झाला पाहिजे असा प्रेमचंदांचा आग्रह होता. म्हणूनच साहित्य केवळ वास्तववादी वा केवळ आदर्शवादी असू नये असे त्यांचे मत होते. केवळ आदर्शवाद हा पलायनवाद ठरतो. विश्वसनीयता आवश्यक असते आणि वाङ्‌मयीन प्रभाव या विश्वसनीयते-मुळेच अधिक गहन होतो. या विश्वसनीयतेसाठी वास्तवाची जाण भक्कमपणे लेखकाकडे असायला हवी. पण साहित्याने वास्तवबादी असावे हे आणखी एका अधिक गंभीर दृष्टीने म्हणता येते. एकूण जीवनाचा वेध घ्यायचा असेल तर कला-वंताने वास्तवाच्या भूमीवरच राहिले पाहिजे. मात्र आपली संस्कार करण्याची भूमिका ही त्याने सोडता कामा नये. म्हणूनच त्याने आदर्शवादाकडे झुकलेले राहिले पाहिजे असा त्यांचा विश्वास होता. त्यांनी नवीन शब्दावलीत हे मांडले. 'आदर्शो-न्मुख यथार्थवाद.'

प्रेमचंद निरंतर विकसित होत राहिले. विचार, आशय, अनुभवक्षमता, कलात्मक कौशल्य या सर्वंच बाबतीत 'गोदान' पर्यंत त्यांचा अद्‌भूत विकास झालेला आढळतो. त्यांच्या आदर्शोन्मुख यथार्थवाद या विचारातही तसा तो जाणवतो. त्यांची आरंभापासून शैली यथार्थवादीच होती, ती उत्तरोत्तर चित्रात्मक व व्यंजनक्षम होत गेली. पण आरंभी पात्रांच्या हृदयपरिवर्तनातून त्यांना भोगाव्या लागणाऱ्या सुखदु:खातून वा घटनांच्या विशिष्ट दिशेने केलेल्या परिणतीतून ते आदर्शवादी वळसे दाखवित. यातून एक प्रकारची स्थूलता, एक प्रकारची कृत्रिमता अवतरते. 'सेवासदन' मधल्या वाट चुकलेल्या सुमनला वेश्यागृहातून चांगल्या लोकांत ते आणतात व पतित स्त्रियांच्या आश्रयासाठी सेवासदन संस्थेची स्थापना करून त्या संस्थेचा चांगला उपयोग व विकास दाखवतात. वेश्याव्यवसायात पदार्पण करूनही सुमनची प्रतिज्ञा (गाऊँगी, नाचूँगी, पर अपने को भ्रष्ट न होने दुंगी) खंडित होत नाही वा वेश्याव्यवसायातला एकही तथाकथित 'रंगदार' प्रसंग ते चित्रित करीत नाहीत. एक तऱ्हेने वास्तवाला घातलेली ही आदर्शवादाची व नीतिवादाची मुरड काहीशी कृत्रिम वाटते. पण हा यांचा आदर्शवादाविषयीचा काहींसा स्थूल आग्रह नंतर राहात नाही. 'प्रेमाश्रम' मध्ये ते हा आग्रह जवळ जवळ शोषण विरहित, श्रममूलक समानतेवर आधारिलेल्या समाज व्यवस्थेच्या रामराज्याच्या चित्रणाच्या रुपाने अवतरतो. पण हा भाग शेवटी आलेला आहे. यातील शेतकऱ्यांच्या शोषणाचे व जमीनदारांनी केलेल्या पिळवणुकीचे तसेच सरकारी नोकरांच्या जाचाचे चित्रण विलक्षण विदारक आहे. मात्र 'निर्मला', 'रंगभूमि', 'कायाकल्प', 'गोदान', यात आदर्शवादाचा आग्रह उत्तरोत्तर क्षीण होत जातो. नायकनायिकांच्या गंभीर शोकांताने या कादंबऱ्यांचा शेवट व त्यांना द्यावी लागलेली किंमत यातून ही गोष्ट सिद्ध होतेच पण एकूण पात्रपरिणती व घटनांची मालिका वास्तवदर्शी राहिलेली आढळते. याचा अर्थ असा मात्र नव्हे की त्यांची आदर्शवादी दृष्टीच नष्ट झाली होती. असे म्हणता येईल की ती अधिक सूक्ष्म झाली होती. आदर्शवादी दृष्टी सूक्ष्म होते याचा अर्थ असा– अनुभव ज्या मनोभूमीत बीजरुपाने वाढू लागतो ती भूमिकाच मुळात आदर्शोन्मुख असते. समग्र साहित्यकृतीचा विकास वास्तवाच्या उग्र, कठोर, भीषण भूमीवर होत असला तरी त्याची प्रेरणा मुळातच मानवी मांगल्यातून उद्‌भूत झालेली असते. महान साहित्यिकाचा पिंड या अर्थाने आदर्शवादी असतो. मानवी जीवनाविषयी, मूल्यांविषयी, माणसाविषयी मूलभूत प्रचंड कळवळा (कंसर्न) असणे आणि त्यातून

माणसाला यातना देणाऱ्या, त्यांचे जीवन कुरतडून नष्ट करू पाहाणाऱ्या सर्व शक्तींशी मुकाबला करण्याची आकांक्षा असणे म्हणजे आदर्शोन्मुख असणे. अशा आदर्शोन्मुख कलावंताने जीवनाचे कितीही भेसूर व भयावह चित्रण केले तरी कुठेतरी हे चित्रण जीवनावरची श्रद्धा व आस्था बळकट करीत असते. या दृष्टीने प्रेमचंदांचा आदर्शवाद अधिक सूक्ष्म होत गेला, अधिक कलात्मक झाला व त्यांचा वास्तववादही अधिक डोळस, अधिक प्रगल्भ व अधिक भरीव होत गेला. 'रंगभूमि' चा नायक आंधळा सुरदास गांधीवादाचे प्रतीक मानले गेले आहे. प्रेमचंद गांधींच्या व्यक्तित्वाने आणि गांधीवादाने भारावून गेलेले असले तरी कलाकार म्हणून गांधीवादाच्या प्रभावावर विजय मिळवतात. सूरदास आपल्या जमिनीसाठी सत्याग्रह करतो. जनतेची प्रचंड सहानुभूती मिळवतो व विरोधी शक्तींना आपल्या आत्मिक बळाने जेरीस आणतो. पण तो आपली जमीन वाचवू शकत नाही. त्याच्या जमिनीवर सिगरेटचा कारखाना उभा करण्यात भांडवलदाराला यश येतेच. सत्याग्रहात घायाळ झालेल्या सूरदासला आपल्या मर्यादा जाणवतात. खिलाडूपणाने तो आपला पराभव मान्य करतो—मरतो. मेल्यावर त्याचा भव्य पुतळा उभारला जातो. लोक आपली श्रद्धा अशातऱ्हेने व्यक्त करून आपली अपराधित्वाची बोचक जाणीव बधिर करून टाकतात. एखाद्या महान माणसा-विषयी श्रद्धा—भाव व्यक्त करून त्याला वरच्या कोटीत नेऊन बसवले की भारतीय समाज आपल्या आपल्या संकुचित क्षेत्रातला स्वार्थ साधायला व सुखमय जीवन जगायला मोकळा होतो. सूरदासने ज्या महेंद्रकुमारशी सामना दिला तो धनी व यशलोलुप उच्च वर्गीय मनुष्य सूरदासचा पुतळा ईर्ष्येने पाडून टाकतो पण स्वतःच त्या पुतळ्याखाली चेंगरून मरतो. हा सर्व प्रसंग अनेक अंगानी प्रतिकात्मक बनतो. ही प्रतिकात्मकता केवळ बौद्धिक नसते. समग्र विराट अनुभव जणू घनीभूत होऊन व्यक्त होतो. शेवटी सूरदासाच्या मूर्तीचे प्रेमचंद वर्णन करतात— 'कारीगरोंने फिर मसालों से मूर्ति के पैर जोडे और उसे खडा किया लेकिन उस आघात के चिह्न अभी तक पैरों पर बने हुए है और मुख भी विकृत हो गया है।' जणू भांडवलदारी उद्योगप्रधान संस्कृतीशी झगडताना गांधीवादी शक्ती तर बाह्यतः पराभूत झालीच पण या संघर्षात उरली सुरली मानवताही विकृत झाली! प्रेमचंदांनी 'कायाकल्प' मध्येही धनतृष्णेचा अनेकांगी दुःखद शेवट रंगविला आहे. 'गबन' मध्ये जालपा काय किंवा वेश्या जोहरा काय आदर्शवादी

वळण घेतात. पुढे पुरात माणसांना वाचविण्यासाठी जौहरा प्राणार्पण करते पण मध्यम वर्गीय रमानाथ व त्याची सत्यप्रेमी पत्नी जालपा जौहराचा अंत निमूटपणे पहातात. भयामुळे व जगण्याच्या आसक्तीमुळे दोघेही प्रत्यक्ष कृती करू शकत नाहीत. ‘कर्मभूमी’तील सर्व राजकीय घटनांची परिणती पराजयात, जीवनहानीत व शेवटी बेगडी समझोत्यात होते. ‘गोदान’ मधला होरी शेवटी दारिद्र्य, पिळवणूक, अत्याचार व फसवणूक यांनी नाडला जाऊन शेतावरून उखडला जातो आणि रस्त्यावर मजुरी करीत असताना मरून जातो. एक गाय पाळण्याचे बिचाऱ्याचे स्वप्न पुरे होऊ शकत नाही. या सर्वच कादंबऱ्यांचे शेवटच दुःखांत आहेत असे नव्हे तर सर्व अनुभवविश्वच दुःखाने यातनेने, मानवी संबंधातील मत्सराने विदारक व करुण झालेले आहे.

## माणूस कलावंतावर मात करतो :

पण तरीही प्रेमचंदाची मानवी जीवनावर, मानवी मूल्यांवर व माणसा-माणसातील हृदबंधावर विलक्षण आस्था आहे. सेवा, त्याग, समर्पण, प्रेम, करुणा या शाश्वत मूल्यांना ते अपरंपार महत्त्व देतात, सर्व मानवी जीवनाची स्थिती व गती यावर आधारलेली आहे असे ते मानतात. हा त्यांच्यातला सूक्ष्म आदर्शवादच आहे. या मूल्यांच्या जिवंत आविष्कारासाठी ते पात्रांची व घटनांची कलात्मक गुंफण करतात व काही वेळा या आविष्कारप्रसंगी त्यांच्यातला माणूस त्यांच्यातल्या कलावंतावरही मात करतो असे वाटते. याचे कारण असे की अशा वेळीं प्रेमचंदाच्या लिखाणातला तटस्थपणा संपतो, संयम सुटतो. व्याख्यानबाजी व दीर्घ संवाद येतात, भावुकता येते, कृत्रिमता जाणवते, अतिशयोक्ती कुरघोडी करते. त्यांच्या पात्रांना सेवा करण्याचे सेवेसाठी सर्वस्वाचा त्याग करण्याचे जणू वेडच लागते. त्यांच्या वृत्ती व प्रवृत्ती बदलून गेल्यासारख्या वाटतात व या बदलाला पुरेशी मनोवैज्ञानिक बैठक लाभली आहे असे वाटत नाही. आपल्या हातून घडलेल्या अपराधाची तीव्र टोचणी त्याना असतेच आणि दूरान्वयाने संबंधित घटनांविषयी सुद्धा ही माणसे स्वतःला जबाबदार मानून तीव्र आत्मनिंदा करतात व प्रायश्चित्त म्हणून समर्पणाचे व त्यागाचे दुसरे टोक गाठतात. अत्याचार करणाऱ्या सत्ता गाजवण्याची नशा चढलेल्या पात्रांचे काही कारणाने घडलेले हृदयपरिवर्तन पाहिले व नंतरचे त्याचे बदललेले व्यक्तित्व पाहिले की कधी वाटते की प्रेमचंद स्वतःच

भावनेच्या प्रवाहात वाहात आहेत. 'प्रेमाश्रम' मध्ये गायत्री, राय कमलानंद, ज्वालासिंह प्रेमशंकर यांची मानसिक आंदोलने, 'रंगभूमि' मधील विनय व सोफिया यांचे काहीसे अतिरेक वागणे, जान्हवीचे सोफिया व विनयबद्दल चे मतपरिवर्तन, 'कायाकल्प' मधील चक्रधर, मनोरमा, ठाकूर विशालसिंह यांचे व्यवहार, 'गबन' मधील जालपाचे पतीच्या अपराधाचे व आपल्या आभूषण-आसक्तीचे परिमार्जन करण्यासाठी अंगिकारलेले खडतर व्रत व जौहराच्या हृदयपरिवर्तनानंतरचा सर्व भाग, 'कर्मभूमि' तील अमरकांतचे पश्चात्तापदग्ध रुप हे सर्व पाहताना कुठेतरी कलात्मक संयम सुटल्याचा, मानवी उदात्त प्रवृत्तींच्या प्रवाहात लेखक वाहून जात असल्याचा भास होतो. सामान्य वाचक या प्रवाहात सहज आत्मभान विसरतो पण प्रगल्भ वाचकाला हे सर्व काहीसे 'भावुक' वाटू लागते व खटकू लागते. याचे मूळ प्रेमचंदांच्या माणसावरच्या आस्थेत प्रेमात व आशावादात आहे हे खरे व म्हणून ते क्षम्यही वाटते. मात्र प्रेमचंदांनी अनुभव-विश्वाचा जो प्रचंड आवाका कवेंत घेतला आहे त्याचा व्याप पाहता हे प्रसंग संख्येने अल्प वाटतात. कधी कधी असेही वाटते की प्रेमचंदांचे कलात्मक दोष क्षम्य तर आहेतच पण ते हवेहवेसेही आहेत. कारण त्यात प्रेमचंदांची माणसाबद्दलची विलक्षण कळकळ जाणवते. आज कलात्मकतेसाठी थंडपणा वा तटस्थपणा आवश्यक मानला जातो. एक प्रकारची निर्मानुषीकरणाची प्रक्रिया साहित्याच्या दृष्टीने हानिकारक आहे कारण कलात्मक तटस्थता वा अलिप्तता व संवेदनांचा बधिरपणा यातले अंतर विसरले जाते आणि अनुभव घेण्यासाठी लागणारा माणसाबद्दलचा जिव्हाळा सुकून जातो.

या उलट प्रेमचंदामधील कलावंत माणसामाणसांतील प्रेमाचे भावात्मक संबंध विशेष तन्मयतेने चित्रित करतांना दिसतो. त्यांची माणसे जेव्हां एखाद्या-साठी त्याग करतात, समर्पण करतात त्या ठिकाणी त्यांची उदात्तता उफाळून येते. पश्चात्तापाची टोचणी तीव्र होते, गरजवंताला दान करण्याची उर्मी येते त्यावेळी भावोत्कट होऊन अशा प्रसंगाचे चित्रण प्रेमचंद करतात. प्रेमचंदांची भाषा भावनांचे विविधरगी कारंजे उडवीत असते. 'गोदान' मध्ये आश्रयार्थ आलेल्या गर्भवती विधवेला हाकलून देण्यासाठी होरी व त्याची पत्नी येतात पण तिच्याकडे पाहिल्यावर त्यांच्या नेणिवेत उत्पन्न झालेली प्रचंड शक्ती तिच्यावर मायेची पाखर घालतात हा प्रसंग वैश्विक साहित्यातला एक दीपस्तंभासारखा चिरकाल आवाहन करीत राहणारा प्रसंग आहे. तसाच प्रसंग 'गोदान' मध्ये गाईला

विष देऊन पळून गेलेल्या भावाच्या अनाथ पत्नीला मदत करण्यासंबंधीचा आहे. या सारख्या अनेक प्रसंगी प्रेमचंदांची मानवता उदात्ततेच्या पातळीवर जाऊन वाचकांच्या मनावरही सहजपणे संस्कार करीत जाते. 'गोदान' मध्ये मानवतेचे उद्रेक व कलावंतांचे शिल्प-मान यांच्यातले संतुलन कुठेच बिघडत नाही, हे ध्यानात घेण्यासारखे आहे.

## सर्वसमावेशी (इन्क्ल्यूझिव) लेखक :

प्रेमचंद एक सर्वसमावेशी लेखक होते. जीवनाचा एखादाच भाग, त्या भागाचा एखादाच कोपरा घेऊन कलाकुसर करणारे, व्यक्तीच्या एकांत क्षणांचे संज्ञाप्रवाही चित्रण करणारे, व्यक्तिमनाचे पापुद्रे उलगडत जाणारे म्हणजेच विशिष्टासाठी इतर सर्वांचा त्याग करणारे (एक्स्क्लूझिव) लेखक ते नव्हते त्यांची सहानुभूती अतिशय व्यापक होती.

प्रेमचंदांनी १९०० ते १९३६ पर्यंत भारतीय समाजातील सर्व महत्वाच्या राजकीय व सामाजिक घटनांचा आपल्या साहित्यनिर्मितीसाठी उपयोग करून घेतला. हा उपयोग त्यांनी साधनासारखा करून घेतला नाही. (ना. सी. फडके यांनी राजकीय घटना रोमँटिक वातावरणाचा भाग म्हणून वा उद्दीपक म्हणून साधनासारख्या वापरल्या हे मराठीं वाचकांना वेगळे सांगण्याचे कारण नाही.) म्हणजेच प्रेमचंदांच्या कथा वाङ्मयाच्या अनुभवविश्वाचा अपरिहार्य मार्ग म्हणून या घटना वा चळवळी आलेल्या आहेत. कारण प्रेमचंदांना समाजजीवनाबद्दल साकल्याने आंतरिक आत्मीयता होती. व्यक्ती व समाज यात अंतिम संवाद व परस्वरुपकताच त्यांनी मानली होता. यातील विसंवाद त्यांना प्रत्यही जाणवत असला व त्याचे विलक्षण प्रत्ययकारी चित्रण त्यांनी केले असले तरी हा विसंवाद सामाजिक व्यवस्थेच्या पोटी निर्माण झालेला आहे अशी त्यांची श्रद्धा होती. शिवाय व्यक्तीचा विकास समाजातच शक्य आहे आणि व्यक्तीने समाजासाठी त्याग केला पाहिजे, समर्पणाला सिद्ध असले पाहिजे असे त्यांना वाटत होते. ते सेवा या मूल्याला अपरंपार महत्व देत. मात्र समाजावरचा त्यांचा विश्वास डोळस होता. प्रचलित भांडवलदारी पद्धतीने संघटित झालेल्या समाजातील भयावह दोषांवर त्यांनी कडाडून प्रहार केले आहेत. महत्वाचा मुद्दा असा की प्रेमचंदांची सामाजिक आस्था बावनकशी असल्यामुळे समाजाला हालविणाऱ्या, हादरविणाऱ्या

गतिमान करणाऱ्या वा पतनाकडे नेणाऱ्या राजकीय, सामाजिक घटना समग्र जीवनाचा महत्त्वाचा भाग त्यांना वाटत होता. म्हणूनच त्यांच्या कादंबऱ्या वा कथा म्हणजे राजकीय व सामाजिक संदर्भात आकारलेले व्यापक जीवनानुभव होते.

## राजकीय कादंबऱ्यांचे जनक :

आरंभापासूनच प्रेमचंदांनी राष्ट्रीय भावनेने ओथंबलेल्या कथा लिहिल्या. 'सेवासदन' चा संबंध प्रत्यक्ष राजकारणाशी येत नाही पण 'प्रेमाश्रम' पासून 'गोदान' पर्यंत हा संबंध 'वरदान' व 'प्रतिज्ञा' या छोटया कादंबऱ्या वगळता दृढपणे दिसतो. 'रंगभूमि' व 'कर्मभूमि' यांना राजकीय कादंबऱ्याच म्हणावे लागेल. मात्र राजकारण म्हणजे प्रत्यक्ष ब्रिटिश सत्तेशी केलेला विरोध एवढाच मर्यादित अर्थ न घेता राजकारणाचा व समाजकारणाचा गुंतागुंतीचा संबंध लक्षात घेतला व राजकारणाचा व्यापक अर्थ लक्षात घेतला तर या कादंबऱ्या राजकीयच आहेत. इंग्रजांच्या राजवटीचे भारतीय शेतकरीवर्गावर, मध्यम वर्गावर, राजेरज-वाड्यांवर आणि नोकरदार व बुद्धिजीवी वर्गावर जे दूरगामी परिणाम झालेले आहेत त्याचे विशद चित्र या कलाकृतीतून साकार झालेले आहे. भारतीय जनते-वर नियंत्रण ठेवण्यासाठी व अप्रत्यक्षत: शासन करण्यासाठी जो जमीनदारवर्ग इंग्रजानी निर्माण केला आणि संस्थानिकांचा परोपजीवी वर्ग कायम ठेवला त्या वर्गांच्या पिळवणुकीच्या विविध मार्गांचे चित्रण करून प्रेमचंदांनी राजकीय स्वातंत्र्याची आवश्यकता तर प्रतिपादन केलीच पण या राजकीय स्वातंत्र्याची मर्यादाही दाखवली. 'प्रेमाश्रम' (१९२१) मधला शेतकरी मनोहर, त्याचा भडक माथ्याचा तरुण मुलगा बलराज व इतर शेतकरी यांच्या संवादात जमीनदार व सरकारी नोकरदारांच्या अत्याचाराचे दु:खमय वर्णन येते आणि त्याचवेळी मनोहर, बोल्शेविक राज्यक्रांतीची ऐकलेली माहिती सांगतो. पुढे अत्याचारी गौसखॉला ठार करण्याचा यशस्वी प्रयत्नही मनोहर करतो. खरेखुरे स्वराज्य अवतरले आहे असे तेव्हाच म्हणता येईल जेव्हा शेतकरी वर्ग आर्थिक दास्यांतून मुक्त होईल हे प्रेमचंदांचे मत होते आणि अनेक कादंबऱ्यांतून हा विचार व्यक्त होतो. जनतेतील वाढत्या असंतोषाचे प्रखर चित्रण प्रेमचंदांनी केले आहे. सरकारी कर्मचारी व ससकार यांच्या बरोबर होत असलेल्या जनतेच्या संघर्षाचे प्रभावी चित्रण त्यांनी केले आहे. स्वदेशी चळवळ, दारूबंदी, सत्याग्रह इत्यादी

आंदोलनाचे स्वरूप मोठ्या प्रभावीपणे त्यांनी केले आहे. मध्यम वर्ग, शेतकरी वर्ग संपन्न वर्ग– या सर्व वर्गात राष्ट्रीय चळवळीचे जे विविध प्रकारचे परस्परविरोधी तरंग उमटले त्यांचे विस्ताराने चित्रण त्यांनी कथावाङ्मयात केले आहे. विशेषत: भारतीय शिक्षित व अशिक्षित स्त्री ही राजकीय चळवळीकडे कशी ओढली जात आहे याचे हृदयगम चित्रण त्यांनी केले. 'रंगभूमि' तील जान्हवी तर पुत्राचे बलिदान करण्यात सिद्ध झालेली आधुनिक क्षत्राणी वाटते. सोफिया जिल्हाधिकारी मिस्टर क्लार्कच्या संगतीत असल्यामुळे अनेक राजकीय उग्र घटनांच्या मुळाशी असते. आज या राष्ट्रीय जळवळीतले ओज व तेज, शक्ती व स्फूर्ती इतिहासजमा झाल्या आहेत. पण १९३५–३६ पर्यंतच्या राष्ट्रीय भावनेचा जनमाणसावर झालेला मंत्र–प्रभाव अनुभवायचा असेल तर प्रेमचंदांच्या कथावाङ्मयासारखा दुसरा विश्वसनीय साथी मिळणार नाही यात शंका नाही.

प्रेमचंदांच्या वाङ्मयातल्या असंख्य घटना इंग्रजी राजवटीत वाढलेल्या नोकरशाहीच्या अत्याचारांची हृदयद्रावक कहाणी समर्थपणे सांगतात. पाच रुपये मिळणाऱ्या चपराश्यापासून तो मिस्टर क्लार्क सारख्या वा मिस्टर जिमसारख्या इग्रजी अधिकाऱ्यापर्यंत सामान्य जनतेवर अनन्वित अत्याचार करणाऱ्या नोकरशाहीचे स्वार्थी, कठोर, क्रूर, चित्र त्यांनी रंगविले, त्याचप्रमाणे एका सीमेपर्यंत अत्याचार सहन केल्यावर प्राण तळहातावर घेऊन विरोध करायला सिद्ध झालेल्या चांभार जातीच्या विद्रोहाची रोमहर्षक कथाही 'कायाकल्प' मध्ये येते. 'प्रेमाश्रम' पासून 'कर्मभूमि' पर्यंत जनतेचा उग्र असंतोष असंघटित विद्रोहाच्या रुपाने विस्फोटित होतो व काही ठिणग्या पडून नष्ट होतो. मनोहर एखाद्या गौसखाचा खून करतो पण जुलूम, जबरदस्ती, अत्याचार व अन्याय यांची चक्रे निर्घृणपणे फिरू लागतात. प्रेमचंदांच्या कादंबरीतील पात्रे पराजित होतात, मरतात, वा काही अन्य परिणतीच्या बिंदूवर त्यांना आणले जाते. पण सर्व सामाजिक राजकीय संदर्भ हा तसाच वहात राहातो. कारण प्रमुख प्रश्न सुटलेले नसतात .. प्रेमचंदांच्या कादंबऱ्या त्या प्रश्नाचे गांभीर्य व गुंतागुंत व्यक्त करतात इतकेच.

सरकारी शासनाचा भाग म्हणून पोलिस विभागाच्या कृष्णकृत्यांचेही विदारक चित्रण प्रेमचंदांनी केले आहे. पोलिसांच्या उद्दामपणाचे व अत्याचारांचे वर्णन तर आहेच पण एखाद्या निरपराध माणसाचा उपयोग साक्षीदार म्हणून करण्यासाठी व देशभक्तांना फासावर चढविण्यासाठी जो कट शिजविला जातो

त्याचे भीषण वर्णन 'गबन' कादंबरीत आढळते. इंग्रजांच्या राजवटीतल्या नोकरशाहीच्या भ्रष्टपणाचे, लाचलुचपतीचे आणि स्वार्थाचे मोठे वास्तव चित्र प्रेमचंदांच्या साहित्यात आलेले आहे.

## भारतीय समाजातील वर्गचित्रण :

प्रेमचंद मध्यवर्गात जन्मले व वाढले, पण त्यांची सहानुभूती इतकी व्यापक होती की त्यांनी भारतीय समाजातील जवळ जवळ सर्व वर्गाचे चित्रण केले. हे वर्ग-चित्रण स्थितिशील नसून गतिशील आहे. म्हणजे सामाजिक जीवनात जे फेरबदल या वर्गात होते गेले त्याची दखल प्रेमचंदांनी वेळोवेळी घेतली आहे.

प्रेमचंद जनवादी होते. सामान्य अकिंचन, निस्सहाय दुबळा माणूस हे त्यांचे श्रद्धास्थान होते. साहजिकच त्यांनी भारतीय समाजातील सर्वात खालच्या स्तरातील शेतकऱ्यांचा वा शेतमजुरांचा वर्ग 'प्रेमाश्रम', 'कायाकल्प', 'रंगभूमि' 'गोदान' मध्ये रंगविला. त्यांच्या इतके समग्र व प्रत्ययकारी चित्रण एखाद्याच भारतीय लेखकाने केले असेल. प्रेमचंदांच्या 'गोदान' कादंबरीला 'कृषक जीवनाचे महाकाव्य' म्हटले जाते ते अर्धसत्य आहे कारण 'गोदान' मध्ये नागरी जीवनातील उच्च वर्ग व मध्यम वर्ग ही प्रकर्षाने आले आहेत. शेतकऱ्यांच्या चरित्रातून प्रेमचंदांनी अतिशय बारकाव्यानिशी कृषकवर्गाच्या स्वभावाचे व शीलाचे मोठे वास्तववादी शब्दचित्र काढले आहे. देशात अनेक सामाजिक, राजकीय घटना घडल्या पण या वर्गाची आर्थिक स्थिती अधिकाधिक खालावत गेली. पाठीच्या कण्यासारखी असलेली परंपरागत नीतिमत्ता शेवटी दारिद्र्याच्या वणव्यात जळून खाक झाली. याच ताकदीने उभे केलेले चित्र 'गोदान' मध्ये दिसेल. प्रेमचंदांवर एक आरोप असा करण्यात येतो की प्रेमचंद पात्रांचे 'टाईप' निर्माण करतात. व्यक्ती निर्माण करीत नाहीत. मोठ्या लेखकाच्या नंतर त्याच्याबद्दल जी प्रतिक्रियेची लाट उत्पन्न होते त्यात त्या लेखकाच्या शक्तींचा अधिक्षेप केला जातो व मर्यादांचा अतिशयोक्त गाजावाजा होतो. एवढेच नव्हे तर समीक्षा विचारात एकांगीपणा येऊन लेखकावर अन्याय होतो. मूल्यमापनाच्या तत्कालीन कसोटयांवर पूर्वीच्या महान लेखकाचे मूल्यमापन काहीसे विकृत होऊ लागते. रवींद्रनाथांच्या काव्याविषयी अशीच प्रतिक्रिया झाली व त्यांची शक्ति-केंद्रे दुर्लक्षित झाली. काहीसा तसाच प्रकार प्रेमचंदांच्या बाबतीत झाला.

प्रेमचंदांनंतर व्यक्तिवादी व मनोविज्ञानवादी प्रवृत्ती कादंबरी वाङ्मयात व समीक्षा व्यवहारात प्रबल झाल्या त्याचा. परिणाम प्रेमचंदांच्या मूल्यमापनावर झाला. वरील आरोप निराधार असून तो जसा तत्कालीन समीक्षा व्यापाराच्या एकांगीपणातून आला आहे तसाच तो आणखी एका अपसमजातून प्रकट झाला आहे. टाईप-चरित्र व व्यक्ति-चरित्र यात विसंवादच असतो हा तो अपसमज वस्तुत: महान लेखक एकाच वेळी टाईप-चरित्र व व्यक्ति-चरित्र निर्माण करु शकतो. काव्यात ज्या प्रमाणे प्रतीक-प्रतिमा धर्मांने युक्त असू शकते किंवा प्रतिमा प्रतीकात्मक असू शकतात. तसाच प्रकार कादंबरीमध्ये ही असू शकतो. चरित्र चित्रणाच्या विविध प्रणालींच्या संदर्भात प्रेमचंदांच्या पात्रांचा विचार केला तरी असे आढळेल की त्यांची पात्रे एकाच वेळी टाईप आहेत व व्यक्ती ही आहेत. 'प्रेमाश्रम' मधील ज्ञानशंकर, प्रेमशंकर, कमलानंद, गायत्रीदेवी, 'रंगभूमि' तील सोफिया, विनय, जान्हवी, जॉन, सेवक, मिसेस जॉन सेवक, ईश्वर सेवक, सूरदास व गावांतील सर्वच पात्रे, 'कर्मभूमि' तील अमरकांत, समरकांत, सुखदा, 'गोदान' मधील धनिया, होरी, गोबर, झुनिया इत्यादी पात्रे व्यक्ती म्हणून ठसठशीतपणे उभ्या राहातात आणि त्यांच्यात वर्गीय प्रवृत्ती ही प्रकर्षाने आढळून येतात.

प्रेमचंदांनी मध्यमवर्गीय जीवनातील विविध प्रवृत्तींनी युक्त असलेल्या माणसांचे असंख्य नमुने उभे केले आहेत. त्यात शिक्षणाचे संस्कार घेऊन आदर्श जीवनमूल्ये जपणारे लोक आहेत आणि शिक्षणामुळे त्रिशंकू सारखे मध्येच लोंबकळणारे बुद्धिजीवीही आहेत. सरकारी नोकरीत राहून स्वार्थ साधणारे बुद्धिविके आहेत तर सरकारशी विद्रोह करणारे व जनतेच्या सेवेला वाहून घेणारे लोकही आहेत. दुबळे व कातडीबचावू लोक आहेत आणि सर्वस्व समर्पण करून हौतात्म्य पत्करणारे आहेत. वरच्या वर्गातील जीवनस्तरांचे अनुकरण करण्यासाठी नीतिअनीतीचा विधिनिषेध न बाळगता अर्थसंचय करणारे आहेत तर सामान्य जनतेच्या जीवनाशी तद्रूप होऊन जीवन सार्थक करणारे लोकही आहेत, भोगी आहेत, त्यागी आहेत खरे आहेत, दांभिकही आहेत, आणि प्रामाणिक व ढोंगीही आहेत. प्रेमचंदांच्या कादंबऱ्यांच्या व कथांच्या आधारे भारतीय मध्यमवर्गाचा गुंतागुंतीनी व विसंवादांनी भरलेला, नैतिक-सामाजिक मर्यादांखाली दबलेला, मूल्यप्रेमी व मूल्यभ्रष्ट असा विविध प्रकारचा जटिल आलेख काढणे शक्य आहे. या वर्गावर कालक्रमानुसार होणाऱ्या

वैचारिक व भावनात्मक प्रभावांची नोंद घेत राहिल्यामुळे या वर्गाचें गतिशील व प्रवाही चित्र रेखाटण्यात प्रेमचंदाना चांगलेच यश मिळाले आहे.

एक असा प्रवाद आहे की प्रेमचंदाना उच्चवर्गाचें चित्रण करणे तितकेसे जमले नाही. हा प्रवादही तितकासा बरोबर नाही. या वर्गात मोडणाऱ्या संस्थानिकांचे व त्यांच्या नातेवाइकाचे, कुटुंबाचे चित्रण प्रेमचंदानी केले आहे. 'कायाकल्प' आणि 'रंगभूमि' या दोन कादंबऱ्यातले हे चित्रण फारच मार्मिक आहे. जनसेवकासारखा नव्याने उद्योग क्षेत्रात प्रवेश करणारा उद्योगपती, महेंद्रकुमारसारखा यशलोलुप धनिक, म्युनिसिपल चेअरमन, शहरात राहणारा जमीनदार रावसाहेब, खेड्यात राहाणारा जमीनदार ज्ञानशंकर ही विराट चरित्र चित्रणे पाहिली तर वरील आरोप अस्थानी वाटतो. स्वतःच्या अभिमानासाठी वाटेल त्या थराला जाणारी इंदू व आपल्या श्रीमंती अभिमानाचा आणि पिढीजात मोठेपणाचा कुठेतरी अभिमान असणारी आणि प्रखर राष्ट्रभक्तीने प्रेरित झालेली माता जान्हवी यासारखी चित्रे पाहिली तर प्रेमचंदानी भारतातील उच्च वर्ग चांगलाच व समजावून घेतला होता असे वाटते. जमीनदार, कारखानदार, खेड्यात सावकारी करून विविध प्रकारे शेतकऱ्यांना छळणारे सावकार, धर्माच्या नावावर जनतेला पिळणारे महंत व मठाधीश ही सर्व चरित्रे पाहिली तर प्रेमचंदांच्यावर घेतल्या जाणाऱ्या आक्षेपाचे निरर्थकता कळून येते. या वर्गाच्या अंतर्मुखतेचे, पश्चात्तापाचे दुःखाचे व दुर्बलपणाचे विविध रंग दाखवून प्रेमचंदानी आपली वर्गीय सीमांना अतिक्रमित करणारी, ओलांडून जाणारी व्यापक सहानुभूती स्पष्ट केली आहे.

वरच्या वर्गाचे चित्रण प्रेमचंदाना फारसे जमले नाही असा आरोप करण्यात आणखी एक मुद्दा अनुस्यूत असावा. प्रेमचंदानी वरच्या वर्गाला बाह्य वेषभूषेचे, राहाण्याच्या पद्धतीचे, त्यांच्या वापरात येणाऱ्या वस्तूचे, पाटर्यांतील पदार्थांचे, मद्यपानादी व्यसनाचे बारकाईने वर्णन केले नाही हे खरे. पण त्यांनी त्यांच्या स्वभावाचे व चारित्र्याचे मूलगामी विश्लेषण आले आहे. हेही तितकेच खरे आहे.

## समाजातील परिवर्तने :

प्रेमचंदानी विविध वर्गाची गतिशील चित्रे काढली आहेत. त्याचा एक वेगळा अर्थही आहे. इंग्रजांच्या आगमनानंतर झालेल्या आर्थिक, सामाजिक फेरबदलांचा या वर्गावर खूप परिणाम झाला. स्थूल मानाने असे म्हणता येईल की जाती व

वर्णभेद यात विभाजित असलेला भारतीय समाज हळू हळू वर्ग-भेदात रुपांतरित होऊ लागला. यामुळे अनेक अंतर्विरोध (जे इतर समाजात नव्हते) भारतीय समाजात उत्पन्न झाले. शेतकरी वर्ग होताच. मध्यम वर्ग व जमीनदार वर्ग निर्माण होऊन बाळसे धरू लागला. पुढे औद्योगिकरण आले. भांडवलदारी समाजव्यवस्थे-कडे समाज वाटचाल करू लागला. खेडी विघटीत झाली. शहराकडे शेतमजुरांचा ओघ जाऊ लागला. खेडी व शहरे यांचे संबंध शोषणावर आधारलें गेले. शहरातील कारखाने खेड्यातील माणसांना व कच्च्या मालाला ओढून नेऊ लागले. औद्योगि-करणाबरोबर समाजातील जुन्या परंपरा व नैतिक मूल्ये नष्ट होऊ लागली. संयुक्त कुटुंबव्यवस्था उखडून विभक्त कुटुंबव्यवस्था पाय रोवू लागली. या सर्व स्थित्यंतरांचे डोळसपणे काढलेले आलेख प्रेमचंदांच्या कथासाहित्यात आहेत. कृषि संस्कृती व औद्योगिक सभ्यता यातील रस्सीखेच पाहायची असेल व त्यातून निर्माण होणाऱ्या मामाजिक, राजकीय व नैतिक समस्या अनुभवायच्या असतील तर ' रंगभूमि ' सारखी एखादी कादंबरीही पुरेशी आहे. शेतकरी वर्गाचा ऱ्हास, जमीनदारवर्गाचे पतन, संस्थानिकांचे दुर्बलीकरण, मध्यमवर्गाचा नैतिक अधःपात या सर्वांचे मोठे विदारक दर्शन प्रेमचंदांचे साहित्य घडवते.

आणि अशा व्यापकपणे संवेदनशील पातळीवर घडवलेले समग्र समाजदर्शन प्रेमचंदांना जागतिक दर्जाच्या साहित्यिकांमध्ये मानाचे स्थान देण्यासाठी पुरेसे आहे. नगेंद्रांनी म्हटले आहे की तीन दशकांच्या जीवनाच्या सर्व रुपांचा इतिहास रेखाटायचा असेल तर प्रेमचंदांच्या कादंबऱ्या हे उत्तम साधन आहे. जरी पुढे प्रेमचंदांची थोर साहित्यिक म्हणून गणना करण्यात नगेंद्र संकोच करू लागले (त्याची मीमांसा पुढे करू) तरी माझ्या मते एवढी शक्ती प्रेमचंदांना थोर सांहित्यिक म्हणून प्रतिष्ठित करावयास पुरेशी आहे.

## विविध सामाजिक विचारप्रवाह व प्रेमचंदांची गतिमानता :

प्रेमचंद समकालिन जीवनाचा वेध घेत राहिले आणि काळाबरोवर सतत स्वतःला बदलू शकले. विसाव्या शतकाच्या आरंभी त्यांच्या लेखनावर प्रखर राष्ट्री-यता व सामाजिक क्षेत्रात उदार सुधारणावाद यांचा पगडा होता. प्रेमचंद जन्मजात नव्हते. भारतीय शेतकऱ्यांप्रमाणे तेही समन्वयवादी होते. परंपराशी त्यांचे नाते दृढ होते. ते नीति–मूल्यांना महत्व देणारे लेखक होते. सामाजिकतेला महत्व देणारा

नीतिवाद लेखकाचे सुधारणावादाशी सूत जमावे हे स्वाभाविकच होते. सुधारणा-वादात परंपरा व प्रगती याची सांधेजोड करण्याचा प्रयत्न अनुस्यूत असतो. भारतीय माणसाच्या मनात विद्रोह व क्रांतिकारकता एकूण कमीच असते. सुधारणावादी विचारांचा प्रभाव आमसमाजाच्या वैचारिक प्रणालीमधून प्रेमचंदांनी स्वीकारला. एकूण उत्तर हिंदुस्थानातील बुद्धिवादी वर्गांवर आर्यसमाजाचा वैचारिक प्रभाव खूप पडला होता. प्रेमचंदांचे मनही याच वातावरणात घडत होते. पण प्रेमचंदांना सुधारणावादाच्या मर्यादा कळल्या होत्या. 'सेवासदन' मधल्या मध्यम वर्गीय पात्रांच्या निष्क्रियेतेतून व त्यांच्या उदासीनतेतूनच हे स्पष्ट होते. पुढे ते गांधीवादा-कडे वळले. 'प्रेमाश्रम' कादंबरी गांधीवादाने भारावून लिहिलेली दिसते. 'रंगभूमि' मध्ये गांधीवादाचा प्रभाव असला तरी प्रेमचंदांची डोळस समीक्षात्मक दृष्टी अतिशय जागरुक दिसते. कारण गांधीवादाला बाह्य भौतिक परिस्थितीवर मात करता येत नाही हे त्यांनी स्पष्टपणे त्यात दाखविले आहे. हौतात्म्याने सूरदास आपली जमीन व आपली झोपडी वाचवू शकला नाही, कृषि-संस्कृतीवर भांडवल-शाही संस्कृतीचे आक्रमण सत्याग्रहाच्या मार्गाने तो रोखू शकला नाही. औद्योगि-करणाचे परिणाम टाळू शकले नाहीत. एवढेच नव्हे तर लाडक्या पुतण्यालाही अध:पातापासून ते वाचवू शकत नाहीत. 'कर्मभूमि' मध्ये गांधीवादी नायक इतका दुबळा व कचखाऊ दाखविला आहे की स्वत: प्रेमचंदांनी त्याला आदर्श का म्हणावे हेच कळत नाही. (लेखकाने आपल्या सृजनकार्यांबद्दल फार बोलू नये हे खरे) कधी कधी कलावंत प्रतिभेच्या दिव्य क्षणी विचारवंतावर मात करतो हे खरे. बाल्जाक उच्च वर्गाचा सहप्रवासी होता पण त्याच्या वाङ्मयात त्या वर्गाच्या अध:पतनाचे विदारक चित्र आले आहे. तसेच प्रेमचंदांचे झाले. निर्णायक प्रसंगी आदर्शाच्या नावाखाली प्रेमचंदांची मध्यम वर्गीय पात्रे काहीसे कचखाऊ धोरण स्वीकारतात ('प्रेमाश्रम' मधला प्रेमशंकर, 'कायाकल्प' मधला चक्रधर, 'कर्मभूमि' तला अमरकांत– त्यांच्यातला कचखाऊपणा अनायास उघड होतो.) हा मध्यम वर्गीय नेतृत्वाचा परिणाम आहे. 'गोदान' मध्ये ते गांधीवादाच्या आकर्षण–कक्षेबाहेर पूर्णपणे पडलेले दिसतात.

काही समीक्षक त्यांच्या १९३२ नंतरच्या 'हंस' मधल्या लेखांवरून व 'गोदान' मधील शोषक–शोषितांच्या चित्रणावरून ते 'साम्यवादी' असल्याचे ठामपणे सांगतात. त्यांनी मधून मधून बोल्शेविक विचारसरणी पसंत असल्याच

सांगितले आहे. गोर्की हा त्यांचा आवडता लेखक होता. अखिल भारतीय प्रगतिशील साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते, 'महाजन सभ्यता' सारख्या लेखात त्यांचा समाजवादाकडचा कल स्पष्टच होता. या सर्वांवरून ते समाजवादाजवळ आले होते हे खरे आहे. पण तिथेच ते थांबले असते का ? त्यांच्यामध्ये वैचारिक सांधे तोडून पुढे जाण्याचे सामर्थ्य होते. १९३६ मध्ये ते वारले. समाजवादी देशांतले नोकरशाहीचे हुकूमशाही रूप त्यांच्या लक्षांत आले असते तर ते समाजवादाच्या पुढे गेले असते असे वाटते. त्यांची एकूण मानवतावादी कळकळ (कंसर्न) लक्षात, घेता ते कोणत्याही एका विचारसरणीला बांधून घेऊन राहिले असते असे वाटत नाही. त्यांची निष्ठा माणसावर होती, जिवंत मूल्यांवर होती, ती अमूर्त नव्हती तशीच ती साचेबंद होणारीही नव्हती. प्रेमचंदांच्या साहित्यात एक प्रकारचा विचारांचा चिंतनाचा खुलेपणा दिसतो. कोणत्याही विचारसरणीच्या साचेबंदपणाला त्यांनी विरोध केला असता. सामान्य माणसाचे दुःख कमी करण्याचे सामर्थ्य कोणत्या विचारात आहे व सुख वाढविण्याची शक्यता कोणत्या विचारात आहे, हे त्यांच्या विचारसरणीचे निकष होते. जीवनभर त्यांनी कथा व कादंबऱ्यातून सामान्य माणसांच्या सुखदुःखांचा विचार केला. प्रेमचंदांनी समकालीन वातावरणातील विचारांचा प्रभाव खुल्या अंतःकरणाने मान्य केला आणि ते निरंतर बदलत राहिले. त्यांची सामान्य जनतेविषयीची विलक्षण कळकळ हीच या बदलाची प्रेरणा होय.

## भारतीय समाजातील जातीयवाद : दलितांची दुःखे भोगणारा कलावंत :

प्रेमचंदासारख्या प्रखर समाजनिरीक्षकाने भारतीय जातिव्यवस्थेचे विदारक विश्लेषण करावे हे स्वाभाविकच होते. प्रेमचंदांनी ब्राम्हण वर्ग व ब्राम्हणांतील पुरोहित व भिक्षुकवर्ग याचे मोठे वास्तववादी चित्रण केले आहे. 'गोदान' मधील दातादीन हा या वर्गाचा खरा प्रतिनिधी. कायस्थ जातीचे बारकावे प्रेमचंदांनी टिपले आहेत. 'रंगभूमि' मध्ये भारतातील अठरापगड जाती व महत्त्वाचे धर्म आले आहेत. पण प्रेमचंदांनी अतिशय जिव्हाळ्याने कुणाचे समग्र वर्णन केले असेल तर ते शूद्र जातीचे चांभार जातीचे. उत्तर भारतात ही जात सर्वात खालच्या स्तराची व उच्च वर्गाच्या सर्व प्रकारच्या अत्याचारांना बळी पडलेली. आर्थिक व लैंगिक सर्व दृष्टींनी याचे शोषण चाललेले असते. या जातीत हळू हळू जागृती होऊ

लागली आहे. 'कायाकल्प' मध्ये गवत कापण्याचे काम या वेठबिगार म्हणून या जातीकडून घेतले जाते. हे वेठबिगार काम करतात पण पोटाला अन्नही दिले जात नाही तेव्हा चवताळतात, सामुहिक विरोध करतात. यातून संघर्ष होऊन गोळीबार होतो. पुढे 'गोदान' मध्ये एक प्रसंग मोठा मार्मिक आहे. ब्राह्मण दातादीनचा मुलगा मातादीन. सिलिया नावाच्या सुंदर नाजुक कोवळ्या तरुण मुलीशी त्याचे संबंध असतात. ती त्याच्याशी प्रामाणिक असते. कोणत्याही प्रकारची अपेक्षा न करता. मातादीन तिच्याशी संबंध ठेवतो पण तिच्या हातचे पाणी त्याला चालत नाही. सिलिया मातादीनच्या खळ्यावर धान्य पाखडण्याचे काम करीत असते. तिकडून दुलारी साहुआईन येते. दुलारीचे दोन पैसे सिलिया देणे लागते. दुलारीची कटकट सुरू होते. मातादीन तिथून हळूच निसटतो. कारण सिलियासाठी दोन पैसे त्याला खर्च करावे लागले असते. इकडे तिकडे पाहून सिलिया दोन पैशाऐवजी दोन शेर धान्य दुलारी साहुआईनच्या ओटचात टाकते. मातादीनचे लक्ष या गोष्टीकडे असते. तो तिला पकडतो. तिचा अपमान करतो आणि तिला घालवून देतो. पण ती समर्पिता त्याच्याशी सर्व निष्ठा अर्पण करून राहाते. तिला मातादीन पासून दिवस गेलेले असतात. चांभार जातीतले लोक तिला मातादीनचा नाद सोडावयास सांगतात. पण ती ऐकत नाही. शेवटी सर्व चांभार एक होऊन खळ्यावर येतात. मातादीनला पकडतात. दातादीनला सांगतात. 'आम्ही सर्व ब्राह्मण व्हायला तयार आहोत. आम्हाला ब्राह्मण बनवा नाहीतर मातादीनला आम्ही चांभार बनवतो.' नि खरोखरच त्याच्या तोंडात हाड घालून त्याला बाटवतात. पुढे मातादीन धर्म बुडाल्याच्या दुःखात खूप उद्विग्न होतो. चांभार जातीच्या जागृतीचा व विद्रोहाचा हा प्रसंग विलक्षण कलात्मकतेने प्रेमचंदांनी रंगविला आहे. जाति वैमनस्याचे व विशेषतः अस्पृश्य जातीतील समस्याचे चित्रण प्रेमचंदांच्या कितीतरी कथांत आले आहे. १९११ च्या सुमारास त्यांच्या 'दोनो तरफ' कथेमध्ये एक मध्यम वर्गीय वकील अस्पृश्यांची सुधारणा करण्याचा प्रयत्न करतो व समाजात लांछित होतो हे दाखवले आहे. 'ठाकुर का कुआ' सारखी छोटी पण श्रेष्ठ कथा—अस्पृश्याला ताजे पाणी मिळत नाही आणि त्याची पत्नी विहिरीवर पाणी चोरून आणायला संध्याकाळी जाते. तिला तिथून जीव घेऊन पळावे लागते. परतते व पहाते तो तिचा तापाने फणफणलेला जोखू नाक दाबून घाण येत असलेले पाणी पीत होता. छोटयाशा या कथेत त्यांनी जातीय वैमनस्याचे मोठे प्रभावी चित्रण केलेले आहे. याच्या एक वर्ष

आधी १९३१ मध्ये त्यांची ' सद्‌गति ' नावाची कथा प्रसिद्ध झाली होती. मुलीच्या लग्नासाठी मुहूर्त विचारायला गेलेल्या चांभाराकडून ब्राम्हण दिवसभर लाकडे फोडण्याचे काम करून घेतो आणि उपाशी चांभार त्यातच मरून जातो. दोरीच्या फासात प्रेताचे पाय अडकावून वेशीवर फरफटत आणून तो ब्राम्हण त्याला ' सद्‌गति ' देतो ! ' कफन ' कथा विलक्षण तोलामोलाची. प्रेमचंदांच्या सर्वश्रेष्ठ कथातील एक. हिच्यातले बापलेक अस्पृश्यच असतात. प्रेमचंदांच्या दलित जीवना-संबंधीच्या कथांतून दलिताचे विलक्षण प्रत्ययकारी व विदारक चित्रण आले आहे. त्याची प्रेरणा राजकीय वा तत्सम बाह्य नसून प्रेमचंदांतला मानवतावादी कलाकार तळमळून ही दुःखे अनुभवून त्यांना वाचा फोडतो आहे असे वाटते. त्यांच्या या कथा वाचताना वाटते की प्रेमचंद भारतीय साहित्यातील पहिले दलित कथाकार आहेत.

## समस्यात्मक जीवनाचे चित्रण :

प्रेमचंदांनी जे जीवन पाहिले ते समस्यात्मक होते. समस्यात्मक जीवन म्हणजे अनेक गतिरोधी शक्तींनी गुंतागुंतीचे करून टाकलेले व्यक्तीच्या व समाजाच्या विकासाला खीळ घालणारे जीवन. व्यक्तीच्या व समाजाच्या जीवनातील समस्या प्रेमचंदांना लेखनास आवाहन करीत होत्या. ' सेवासदन ' मध्ये त्यांनी स्त्रियांच्या वैवाहिक समस्यांचा विचार केला. भारतीय मध्यम वर्गाच्या जीवनात आक्रंदन उत्पन्न करणाऱ्या या समस्या आर्थिक व सामाजिक स्वरूपाच्या होत्या. धार्मिक समजुतींनी व अंध रूढीनीं या समस्यांना अधिक जटिलता प्रदान केली होती. असे जटिल जीवन प्रेमचंदांना आवाहन करी व या जटिल जीवनाच्या कर्तव्यातच त्यांच्या कलेचे पुष्प उमलत असे. एखादा साहित्यिक समस्यात्मक कथा लिहितो तेव्हा तो साहित्यबाह्य प्रेरणांनी वा काही कलाबाह्य उद्देश्याने लिहितो व त्यांचा परिणाम सामान्य दर्जाचे साहित्य निर्माण होण्यात होतो. असा एक अपसमज काही मराठी विचार-वंतात आहे. मुळात तो कलावादात आहे व नंतर तो इतरांनीही दत्तक घेतला आहे. खरे तर हा विचार बिनबुडाचा आहे. लेखक जितका संवेदनशील असेल तितका तो आसपासच्या प्रवाही जीवनातील गतींची, भोवऱ्यांची आवर्ताची प्रखर जाण येईल, त्याचप्रमाणात त्याच्या अनुभवविश्वाचा व्यापही वाढेल व जीवन-दर्शनाचा आवाकाही प्रेमचंदांच्या बाबतीत नेमके हेच घडले. मध्यम वर्गातील

स्त्रियांच्या समस्या (विधवा समस्या वैवाहिक समस्या, व्यक्तित्व–विकासाच्या समस्या इ.) मध्यम वर्गातील पुरुषांच्या आर्थिक व सांस्कृतिक समस्या, जमीनदाराच्या आर्थिक ऱ्हासाच्या व नैतिक अधःपाताच्या समस्या, (त्यांची दुःखेही व त्यांची कृष्णकृत्येही) हळूहळू भांडवलदारी समाजव्यवस्थेत उत्पन्न होणाऱ्या नैतिक व आर्थिक समस्या– भांडवलदारांच्याही व मजुरांच्याही–, भारतीय समाजातील धार्मिक वैमनस्याच्या व जातीय तेढीच्या समस्या, स्वातंत्र्य संग्रामातील जनतेच्या नेतृत्वाच्या समस्या, शेतकऱ्यांच्या यातनामय जीवनाच्या समस्या– प्रेमचंदांचे सारे साहित्य म्हणजे भारतीय समाजातील असंख्य गुंतागुंतीच्या समस्यांचे चित्रीकरण म्हणावे लागेल. या समस्या त्यांनी मांडल्या त्या समाजशास्त्राच्या भूमिकेतून नव्हे तर कलावंताच्या भूमिकेतून. असंख्य जिवंत पात्रे व वास्तववादी जीवनसंवादी अकृत्रिम घटनांच्या मालिका यांच्या कलात्मक संयोजनातून. त्यांच्यातला विलक्षण 'कॉमन सेन्स' लाभलेला समाजशास्त्रज्ञ कलावंताचे अनुभव–विश्वसंपन्न व समृद्ध बनवतो.

प्रेमचंदांच्या घटना बहुतांशी अकृत्रिम व जीवन-संवादी आहेत. त्यात योगायोगाचा, आकस्मिकतेचा व नियतीच्या आश्चर्यकारक क्रीडेचा भाग नाही असे नव्हे. त्यांच्या 'प्रेमाश्रम' कादंबरीत पुष्कळशा पात्रांचे मृत्यू दाखवले आहेत. त्यांच्या 'कायाकल्प' कादंबरीत तर जन्म-पुनर्जन्म या कल्पनांचा उपयोग करून चमत्कार दाखविले आहेत व अद्‌भुतरम्य वातावरण उत्पन्न केले आहे. 'सुधा-बिंदू'चे थेंब घेऊन म्हातारी देवप्रिया तरुण होते. देवप्रिया व तिचा नवरा इंद्रविक्रम सिंह अनेक जन्म घेतात व एकमेकांकडे पुनःपुनः आकर्षित होतात. वियोग व मीलनाच्या चक्रातून जात असतात. हा प्रेमचंदांच्या जुन्या साहित्यातील अद्‌भुतरम्य वातावरणाचा प्रभाव म्हणावा की भारतीय संस्कृतीचा त्यांच्यावर संस्कार प्रबळ झाला म्हणायचे हे एक कोडे आहे. पण 'कायाकल्प' कादंबरीत या कथेला थोडी जागा दिली आहे. मात्र अन्य कादंबऱ्यातून हे अद्‌भुताचे किंवा आकस्मिकतेचे मध्येच निर्माण झालेले आकर्षण जवळ जवळ संपलेले दिसते. 'गोदान' तर या दृष्टीने विलक्षण कलात्मक कादंबरी मानली पाहिजे.

## प्रेमचंदाचे जीवनविषयक तत्वज्ञान :

प्रेमचंद जनवादी होते आणि त्यांच्या सर्वच कादंबऱ्यांची व अधिकांश

कथांची प्रेरणा सामान्य माणसाच्या सुख दुःखाविषयी त्यांना वाटणारा जिव्हाळा, हे तर मागे सांगितलेच आहे. त्यांनी स्वीकारलेले सर्व विचार (सुधारणावाद, गांधीवाद, साम्यवाद इ.) या कसोटीवर कितपत टिकतात हे त्यांनी पाहिले. त्यांच्या उपयुक्ततावाद, नीतिवाद, शिवाय संकल्पनेला सर्वश्रेष्ठ मानण्याची प्रवृत्ती साहित्य हे लोकमांगल्याचे साधन आहे ही निस्संदिग्ध भूमिका, आणि लेखक समाजाचे काही देणे लागतो ही सामाजिक बांधिलकीची त्याची निष्ठा या सर्व गोष्टीचे मूळ पाहिले तर मनुष्यापेक्षा श्रेष्ठतर दुसरे काही नाही आणि माणूस म्हणजे कोणी आदर्शभूत अपवादात्मक तत्व नसून तुमच्या आमच्या सारखा सामान्य जीवन जगणारा, जीवनाच्या प्रवाहात वाहात जाणारा आवर्तात गटांगळ्या खाणारा, भरडला जाणारा, पिळला व नाडला जाणारा सामान्य अकिंचन माणूस ही त्यांची श्रद्धा होती. साहजिकच मानवतावाद ही त्यांच्या साहित्याची प्रेरक व निर्णायक शक्ती होती असे म्हणता येईल.

प्रेमचंदांनी साहजिकपणे खालच्या थरातील माणसाकडे सहानुभूतीने व आत्मीयतेने पाहिले. स्त्री व शूद्र, अस्पृश्य, शेतकरी, कामगार भिकारी इत्यादी अवमानित व पददलित वर्गाचे दुःख त्यांनी मोठ्या कळवळ्याने पाहिले. त्यांच्या शोषणाच्या, वेदनांच्या विविध तऱ्हा वेशीवर टांगल्या. ब्राह्मण, वैश्य, क्षत्रिय इत्यादी उच्च वर्णीय व्यक्तींच्या अहंकाराचा दंभस्फोट केला व त्यांच्या अपप्रवृत्ती-वर कुठाराघात केले. समाजसेवा हे त्यांनी मोठे मूल्य मानले. त्यांची अनेक पात्रे समाजसेवेत जीवनाची सार्थकता अनुभवतात. आज त्यांच्या कथा व कादंबऱ्या वाचताना समाजापासून तुटलेल्या आत्मकेंद्री माणसाला समाजसेवेच्या धुंदीने सार्थकता अनुभवणाऱ्या त्यांच्या पात्रांचे भाव–कल्लोळ 'भावुक' (सेंटीमेंटल) वाटण्याची शक्यता आहे पण हा कलावंताचा दोष नसून आपला परीघ उल्लंघू न करू शकणाऱ्या वाचकांचा आहे.

जीवन निरर्थक आहे. ते विसंगतीचे गाठोडे आहे. माणूस सत्व हरपून बसलेला सदा दुःखी प्राणी आहे, समुद्राच्या उसळत्या पाण्यावर तरंगणाऱ्या फळीवर तो बसलेला आहे. जीवनात न टाळता येण्यासारखा एकटेपणा आहे, कंटाळवाणेपणा आहे अशा प्रकारची भूमिका प्रेमचंद कधीच घेत नाहीत. या भूमिकांचा प्रादुर्भाव ज्या व्यक्तिवादी तत्वज्ञातून होतो ते प्रेमचंदांना कधीच विचारार्ह वाटले नाही.

व्यक्ती व समाज यांच्यात अंतीम दृष्टीने सौहार्द्राचे संबंध पहाणाऱ्या प्रेमचंदांना सेवा, त्याग, कर्मनिष्ठा, समर्पण, हौतात्म्य, संयम ही मूल्ये शाश्वत जीवनमूल्ये वाटली. त्यांच्या कादंबऱ्यातील अनेक पात्रे या जीवनमूल्यांसाठी जीव ओवाळून टाकताना दिसतात. प्रेमचंदांना, आपली पात्रे प्रथम हाडामांसाची माणसे आहेत. चुका करणारी, वासनांना बळी पडणारी, मत्सर करणारी, ईर्ष्या बाळगणारी, पश्चाताप करणारी, फसणारी व फसवणारी आहेत याचा विसर कधीच पडू दिला जात नाही.

प्रेमचंदांनी प्रेम या मूल्याला फारच महत्व दिले आहे. त्यांच्या कादंबऱ्यांतून प्रेम या संकल्पनेची विविध रूपे दिसतात. पति—पत्नी, पुरुष—स्त्री, प्रेमी—प्रेयसी यांच्यातल्या विविध प्रकारच्या नात्याचे त्यांनी चित्रण केले आहे. त्यातही झुनिया—गोबर यांच्यातल्या किशोर वयातील वासनात्मक प्रेमापासून ते होरी—धनिया, लौंगी ठकुराइन हरिसेवक ( ‘कायाकल्प’) यांच्यातील प्रगल्भ प्रेमा पर्यंतची अनेक रूपे प्रेमचंदांनी चितारली आहेत. यात प्रेमाचे त्रिकोणही आहेत-विवाहित भारतीय स्त्री मर्यादित राहून पर पुरूषाकडे आकर्षित होते त्या मर्याद-शील प्रेमाची चित्रे ही आहेत. प्रेमचंदांनी वासनेचे भडक रंग या चित्राना येऊ दिले नाहीत. हा त्या गांधीवादी युगाचा परिणाम आहेच पण प्रेमचंद खऱ्या अर्थाने गृहस्थधर्मी लेखक होते त्याचा ही परिणाम आहे. (ही अनुभवविश्वाची मर्यादाही मानता येईल) वासना नाकारणे शक्यच नव्हते पण तिचा अतिरेकही त्यांना मान्य नव्हता. प्रेमचंदांच्या कथा वाङ्मयातून प्रेमासंबंधीचा मूलाकार काढायचा झाला तर असे म्हणता येईल की माणसाने वासनेचे उदात्तीकरण करायला हवे व ते वासना दडपून नव्हे तर गृहस्थधर्मांच्या बंधनात राहून वासनेवर विजय मिळवायला हवा म्हणूनच प्रेमचंदांची पात्रे अनैतिक कार्य करू लागली तर प्रेमचंदांनी त्यांना या ना प्रकारे शिक्षा दिल्या आहेत. ( एका अर्थाने हा उपदेश-वादी प्रवृत्तीचा विजय आहे असेही म्हणता येईल.)

माणसामाणसातील प्रेमभावाच्या आविष्काराचे चित्रण करताना प्रेमचंद खूपच भावुक झालेले दिसतात. याची कित्येक उदाहरणे त्यांच्या कथा-वाङ्मयात आढळतात. माणूस सुष्ट व दुष्ट असतो हे त्यांनी तत्वतः मान्य केले असले तरी माणूस हा मुळात चांगला असतो, सत्प्रवृत्त असतो अशी आंतरिक श्रद्धा प्रेमचंदांच्या मनात दृढमूल होऊन बसलेली असते.

प्रेमचंदांनी जीवनभर 'धन से दुश्मनी' करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या कथाकादंबरी--विश्वातील हे एक दुसरे मूलभूत तत्त्व दिसते. व्यक्तिशः धनाच्या मोहात पडलेल्या माणसांची दुर्गती तर त्यांनी दाखवलीच पण समाजव्यवस्थेतही अर्थप्रेरणेने निर्माण केलेले प्रचंड अनर्थ त्यानी दाखवले. श्रीमंत वर्गातील विलासी-प्रियता व त्यांचा आत्मिक नैतिक ऱ्हास जसा त्यानी दाखवला तसाच जमीनदारी व सामंतशाही, औद्योगिक संस्कृती वा भांडवलदारी व्यवस्था यामुळे होणारा नैतिक ऱ्हासही त्यांनी दाखवला. 'प्रेमाश्रम', 'कायाकल्प', 'रंगभूमि' व 'गोदान' या कादंबऱ्यांचा अभ्यास या दृष्टीने करण्यासारखा आहे. मात्र गरिबी ही चांगली असते व गरीब माणूस नैतिकदृष्टया सुदृढ असतो असा भाबडा विचारही त्यांना मान्य नव्हता. दारिद्र्यातून निर्माण होणाऱ्या विकृतीचाही त्यांनी निर्देश केला आहे. पण एकूण श्रीमंत वर्गाकडे व श्रीमंत व्यक्तीकडे सहानुभूतीने पाहून सुद्धा धनामुळे निर्माण झालेले त्यांचे दोष त्यांनी वेशीवर टांगले.

व्यक्ती, कुटुंब समाज, जात धर्म, वर्ग यांतील विविध प्रकारच्या विसंवादा-वर प्रकाश झोत टाकून प्रेमचंदांनी शेवटी प्रेम व सेवा या मूल्यांना सर्वतोपरी महत्त्व दिले आहे.

## स्त्री-पुरुष संबंध :

प्रेमाचंदांनी स्त्री-पुरुष संबंधांकडे आरंभी फारशा विद्रोही दृष्टीने पाहिले नाही. अर्थात कोणत्याही तत्त्वाच्या वा धर्माच्या नावाखाली स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायांना त्यांनी विरोध केला. स्त्रीला पुरुषाची सहधर्मचारिणी मानले व दांपत्य-प्रेमाचा आदर्श स्वीकारला. सामान्यतः वैवाहिक जीवनाचे पावित्र्य जपले पाहिजे, असे त्यांचे मत होते. विवाहापूर्वी स्त्री-पुरुषाबाबत मोकळेपणा त्यांनी एका सीमेपर्यंत मान्य केला तरी विवाहबंधन मान्य केल्यावर त्याच्यासाठी सर्व प्रकारची किंमत दिली पाहिजे असेच त्यांचे मत होते. 'गोदान'मध्ये गोविंदी पतीच्या उत्शृंखल व अपमानकारक वर्तणुकीमुळे कंटाळून घर सोडून जाऊ इच्छिते पण मेहता तिला पुनः घरी पोचवितो. प्रेमचंदांचे हे पात्र त्यांच्या मताचे पुरस्कार करणारे मानले जाते (अर्थात हे तितकेसे खरे नाही) या कादंबरीत एक प्रसंग असा आहे की स्त्री–पुरुष संबंधाबद्दल काही क्रांतिकारी विचार त्यांच्या मनांत चालले असावेत असे वाटते. मालती व मेहता यांच्यामध्ये आकर्षण, स्नेह

व वैवाहिक बंधन स्वीकारून एकजीव व्हावें असे उत्कट प्रेम क्रमाक्रमाने उत्पन्न होते. मालतीचा स्वच्छंदा स्वभाव संयत होतो. मेहताने तिला विवाहाविषयी विचारताच मालती त्याला नकार देते. मेहतामध्ये परंपरागत पुरुष वर्चस्वाचे रूप तिला दिसते. मेहताशी विवाह करून आपण पुरुषाच्या बंधनात कायम अडकू व आपल्या व्यक्तित्व विकासाचा मार्ग अवरूद्ध होईल असे तिला वाटते. विवाहाला ती नकार देते पण आजीवन मैत्री ठेवण्याचा निर्धार व्यक्त करते. या मैत्रीत शारीरिक गरजांना स्थान आहे. का ? या प्रश्नाचे प्रत्यक्ष उत्तर त्यांनी दिले नाही पण त्यांनी 'प्लॅटॉनिक' प्रेमाचे जे खोटेपण 'रंगभूमि' कादंबरीत व्यक्त केले आहे ते लक्षात घेतले आणि मालती मेहताच्या खांद्यावर मान ठेवते हे पाहिले तर प्रेमचंदांचा अभिप्राय स्पष्टपणे व्यक्त होतो यात संशय नाही. स्त्री–पुरुषांच्या मैत्रीची–वासनेला न नाकारणाऱ्या मैत्रीची कल्पना १९३५ पूर्वी प्रेमचंदानी मान्य केलेली दिसते. या मैत्रीत लैंगिक संबंधाचे स्थान काय असा स्फोटक प्रश्न त्यांनी उपस्थित न करताच त्याचे उत्तर दिले आहे. प्रेमचंद आणखी काही वर्षे जगते तर या बाबतीत अधिक वास्तववादी व प्रखर भूमिका त्यांनी घेतली असती. 'कायाकल्प' मध्ये रखेलीबरोबरच्या प्रेमाच्या संबंधाना त्यांनी उदात्त पातळीवर रंगविले होते हेही या संदर्भात ध्यानात घेणे आवश्यक आहे. याचा अर्थ असा की प्रेमचंदांमधला प्रगतिशील कलावंत विवाह संस्थेचे अस्तित्व महत्त्वाचे मानूनही अपवादांचा विचार सहानुभूतीने करतो असे म्हणावे लागले.

## प्रेमचंदांची कलात्मक वैशिष्ट्ये :

प्रेमचंदांच्या कादंबऱ्या कथाप्रधान नाहीत. याचा अर्थ त्यात कथा नसेल असे नाही. त्यांच्या कादंबऱ्यांची कथानके थोडक्यात सांगता येणार नाहीत असेही नाही. कथेत वाटणारी उत्सुकता, उत्कंठा किंवा कथारस त्यांत नसतो असेही नव्हे. त्यांच्या कादंबऱ्या कथेच्या अंगानेही पकड घेणाऱ्या असतात. त्या सतत वाचाव्याशाही वाटतात. केवळ कथा वाचून आनंद घेणारा वाचक त्यात रमू शकेल. पण तरीही त्या कथाप्रधान नाहीत. कारण कथा सांगितल्यावर बरेचसे शिल्लक राहाते जे केवळ कथेत व्यक्त होत नाही. हे बरेचसे फार फार महत्त्वाचे असते. कथांपेक्षाही त्यांच्या कादंबऱ्या चरित्रप्रधान आहेत असे म्हणता येईल. पात्रे जिवंत होऊ लागली की ती कथांच्या भिंतींना हादरे देऊन खिळखिळी करू

लागतात. प्रेमचंदांनीही म्हटले होते, 'साहित्य म्हणजे मानव-जीवनाचे चित्र' हे मानव-जीवनाचे चित्र कथेचे बंदिस्त घटक उडवून देणारे असते, कारण ते हाडामांसाच्या माणसांनी बनवलेले असते. या माणसांचे परस्पर संबंध, त्यांचे स्वभाव, त्यांचा गुंतागुंतीचा व्यापार दाखवणे म्हणजेच जीवनचित्र रेखाटणे. पण प्रेमचंदांच्या पुढे आलेली माणसे एकेरी कधीच नव्हती. ती व्यक्ती म्हणून न येता अधिक व्यापक पार्श्वभूमी घेऊन अधिक व्यापक वर्गाचे प्रतिनिधित्व करणारी होती. म्हणजेच प्रेमचंदांनी केवळ मानवी स्वभावाचे वेगवेगळे नमुने दाखविण्यासाठी, माणसाच्या अप्रकट मनाचा खेळ दाखविण्यासाठी किंवा त्याच्या मनाच्या विकृती दर्शविण्यासाठी चरित्रांचे चित्रण केले नाही. कधी कधी माणसांचे सामाजिक संदर्भांपासून दूर केलेले नमुने काल्पनिक असतात व मानसशास्त्रीय सत्याच्या नावावर खपविले जातात. प्रेमचंदांनी या तथाकथित मानवी मनाच्या महनगूढतेचा वेध घेण्याची क्रीडा कधीच केली नाही. कारण त्यांना साहित्य म्हणजे क्रीडा वाटत नव्हती. प्रेमचंदांनी व्यावहारिक जीवनातले प्रश्न (सामान्य माणसाच्या जीवनाशी संबंध असलेले– त्या प्रश्नांच्या सामाजिक, आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक संदर्भासहित) महत्त्वाचे मानले म्हणून त्यांनी माणसे त्या प्रश्नांना भिडणारी, प्रश्नांशी प्रत्यक्षपणे संबंध असलेली अशी निवडली.

## सामान्य माणसांचे मानसशास्त्र :

या निवडीचा परिणाम प्रेमचंदांच्या पात्रांच्या मानसशास्त्रीय विश्लेषणाशी येतो. प्रेमचंदांची मर्यादा दाखविताना नगेंद्रांनी असा आरोप केला आहे की कामप्रवृत्तीच्या दमनामुळे निर्माण होणारी चारित्रिक वैशिष्ट्ये व त्यातून उत्पन्न होणारी तीव्र मानसिक आंदोलने प्रेमचंदांना दाखवता आली नाहीत. म्हणून त्यांच्या साहित्यात व्यापक सहानुभूती असली आणि सर्व भारताचा स्वातंत्र्याचा इतिहास त्यांच्या कादंबरीत उमटला असला तरी त्यात खोली नाही. तीव्रता नाही. खरे तर मानवी जीवनाकडे पहाण्याचा हा एकांगी दृष्टिकोण असून माणसाच्या जीवनात कामप्रवृत्ती मूलभूत असते व ती समग्रपणे व्याप्त असते या फ्रॉयडीयन सिद्धांतावरची अतिश्रद्धा या आरोपाच्या बुडाशी आहे. प्रेमचंदानी जे सामान्य भारतीय माणसाचे जग उभे केले त्यात कामभावेला केंद्रीय महत्त्व असणेच शक्य नव्हते. कारण भारतीय जीवनात काम पुरुषार्थ रूप मानला गेला

असला व त्याचे उचित महत्त्व स्वीकारले गेले असले तरी जनमानस धर्म या पुरुषार्थाने अनुशासित झालेले आहे. प्रश्न असा आहे की प्रेमचंदांनी जे जग उभे केले त्याचे मन त्यांनी सामर्थ्याने उभे केले की नाही. त्यांची पात्रे पाहिली तर त्याचे उत्तर होकारार्थीच द्यावे लागेल. सुमन, ज्ञानशंकर, निर्मला, सोफिया, विनय सुरदास, चक्रधर, राजा विशालसिंह, रमानाथ, जालपा, होरी, धनिया, दातादीन ही व अशी अनेक पात्रे प्रेमचंदांनी जिवंतपणे उभी केली. त्यांच्या मनाचे विश्वसनीय चित्र उभे केले. ' रंगभूमि ', ' कर्मभूमि ', ' निर्मला ' या कादंबऱ्यांचा मनोविश्लेषणाच्या अंगाने विचार केला तर प्रेमचंदांनी राजकीय–सामाजिक पार्श्वभूमीचा उपयोग करून मानवी मनाचे किती अतवर्य खेळ दाखवले आहेत याचा प्रत्यय येऊ शकेल. खरे तर त्यांच्या सामाजिक अंगावर जेवढा जोर दिला गेला तेवढा त्यांच्या मनोविश्लेषणात्मक पैलूचा विचार झालाच नाही. मात्र हे मनोविश्लेषण विकृत मनाचे नाही, या मनांत विकृती आहेत पण त्या प्रवाहात उत्पन्न होतात व विराम पावतात.

प्रेमचंदांनी केवळ कामवासनेमुळे निर्माण होणाऱ्या समस्यांचे चित्रण करण टाळले आहे असेही म्हणता येईल. ' कर्मभूमी चा नायक अमरकांत सुखदाच्या मानाने काहीसा पुरुषत्वात उणा पण त्यांच्या दोघांतल्या बेबनावाचा विचार करताना या वैशिष्टयाचे खोलात जाऊन विश्लेषण करण्याचे ते टाळतात. पण सुखदा–अमरकांत व अमरकांत सकीना यांच्या संबंधाचा विचार करताना किंवा अमरकांतची पुढची सर्व डळमळीत वृत्ती पहाता प्रेमचंदांच्या मनात त्याचा उणेपणा शेवटपर्यंत होता हे स्पष्ट दिसते. हजारो वर्षाच्या धार्मिक, नैतिक व सामाजिक ताणांनी संस्कारित झालेला भारतीय माणूस प्रेमचंदानी उभा केला–आवश्यक तेवढ्या मनाच्या आधाराने उभा केला. प्रेमचंदांना भारतीय माणसाच्या माणसाची उत्तम जाण होती यात शंका घेण्याचे कारण नाही बडे भाईसाहेब ', ' नशा ', ' पूस की रात ', ' गुल्ली डंडा ' कफन,' ' सुजान भगत ' सारख्या त्यांच्या कथा वाचल्या की मानवी मनाची यांची जाण केवढी मोठी होती याचा प्रत्यय येतो. हजारीप्रसाद द्विवेदी यांनी मार्मिकपणे म्हटले आहे की उत्तर भारताचा माणूस कसा असतो हे जाणून घ्यायचे असेल तर प्रेमचंद वाचावा. जो लेखक एका प्रचंड भूखंडाचे मानवी मन उभे करतो त्याच्या मोठेपणाची शंका घेण्याचे काही कारण दिसत नाही.

प्रेमचंदांच्या पात्रांचे वैशिष्टय असे की ही पात्रे आपल्या समस्त संदर्भानिशी येतात. एका बाजूने ती व्यक्ती म्हणून येतात तर दुसऱ्या बाजूने वर्गाचा, वर्णाचा, समाज व्यवस्थेचा एक प्रतिनिधी म्हणूनही येतात. ती पात्रे काहीशी प्रतीकात्मक असतात. पण प्रतीकात्मक असताना ती व्यक्तित्व हरवून बसलेली असतात असे मात्र नाही. 'प्रेमाश्रम' मध्ये ज्ञानशंकर नायक असतो असे म्हणण्यापेक्षा जमीनदारवर्गच नायक असतो, 'गबन' मध्ये मध्यम वर्गच नायक असतो. 'रंगभूमि' मध्ये कृषि संस्कृतीच सूरदासच्या रूपाने नायक म्हणून अवतरते. 'गोदान' मध्ये होरी म्हणजे भारतीय शेतकरी वर्गच असतो. चरित्र-चित्रण कलेत प्रेमचंदांचे हे मौलिक योगदान महत्त्वाचे आहे यामुळे कादंबरी विश्वाचे सर्व महत्त्वाचे घटक— घटना, चरित्र व देशकालपरिस्थिती किंवा वातावरण एकरूप होतात.

## प्रेमचंदांचे नायक : जुन्या संकल्पना धुडकावल्या :

प्रेमचंदाच्या चरित्रचित्रणाविषयी आणखी काही महत्त्वाच्या गोष्टी सांगता येतील. नायकत्वाविषयीच्या तथाकथित संकलपना प्रेमचंदानी धुडकावून लावल्या. 'प्रेमाश्रम' कादंबरीचा नायक ज्ञानशंकर (या विषयी मतभेद होईल अनेक समीक्षक नायकत्व प्रेमशंकरला देतात. व ज्ञानशंकराला प्रतिनायक मानतात. पण नायकत्वाच्या स्थानावर एका पेक्षा अधिक पात्रांचा हक्क प्रस्तुत व्हावा ही प्रेमचंदाची 'देन' मानावी लागेल. 'गोदान' चा नायक होरी की मेहता, 'रंगभूमी' चा नायक सूरदास की विनय इत्यादी प्रश्न निर्माण होऊ शकतात.) दुष्ट सुष्ट प्रवृत्तींनी युक्त संमिश्र चारित्र्याचा माणूस आहे. तो स्वार्थी, कुटिल व कपटी आहे. स्वार्थासाठी कुठलेही हिंसक कार्य करण्यापर्यंत त्याची मजल जाते. तो विद्वान असतो, बुद्धिमान असतो. त्याच्या लेखन शैलीत प्रभावोत्पादक गुण असतात. त्याच्या अंगी अभिनय असतो व संगीत प्रेमही असते. उत्तम वक्तृत्व तो करतो व प्रबंधपटु असतो. प्रेमाश्रम मध्येच प्रेमचंद एका ठिकाणी लिहितात .. मनुष्य काळा नसतो वा संपूर्ण गोरा नसतो. तो संमिश्र असतो. त्यांची माणसाविषयीची ही धारणा सर्व कादंबऱ्यातील पात्रसृष्टीत व नायक नायिका यांच्यामध्येही प्रचुरपणे आढळून येते. प्रेमचंदांनी नायकासंबंधी 'साहसे' ही केली आहेत. 'रंगभूमि' या प्रचंड कादंबरीचा नायक सूरदास आंधळा भिकारी असतो. वयाने प्रौढ, दिसायला कुरुप, फक्त भक्तिभावनेला योग्य असा आर्त आवाज

आणि परंपरागत मूल्यांचा विलक्षण संस्कार एवढ्या जमेच्या बाजू. सामान्यही नायक या संकल्पनेशी संबंध उच्चभ्रू कल्पनाना त्यांनी ठुकरावून दिले आहे. 'गोदान' चा नायक होरी .. एक सामान्य शेतमजूर. चाळिसाव्या वर्षीच म्हातारा झालेला. पण त्याच्या आधारे रचले आहे कृषकजीवनाचे महाकाव्य. पण याहीपेक्षा महत्वाची गोष्ट म्हणजे प्रेमचंदांचे नायक व्यक्ती असतात त्याच वेळी ते प्रतिनिधित्व करणारी प्रतीके असतात. खरे तर होरी नायक नाहीच– होरीचा शेतकरी वर्ग नायक. त्यांना पिळणारा सावकार, जमीनदार, नोकरशाही हा वर्ग प्रतिनायक. आंधळ्या भिकाऱ्याला व शेतमजुराला नायकत्व देऊन प्रेमचंदांनी खऱ्या अर्थाने साहित्यिक क्रांती केली आहे. हिंदीतच नव्हे तर भारतीय साहित्यात दलितांना नायकत्व– बृहत् कादंबऱ्यांचे नायकत्व प्रेमचंदांनी प्रथम बहाल केले ! तसेच ग्रामीण साहित्याचा पायाही त्यांनीच घातला. ग्रामीण साहित्याचा विचार करतांना सामान्यत: आपण ग्रामीण परिसराला (–निसर्ग, गुरेढोरे, जीवनाचा बाह्य व्यापार, बोली इ.)– महत्व देतो. खरे तर ग्रामीण जनतेच्या गंभीर समस्या व त्यांची करुण परिस्थिती हा जर ग्रामीण साहित्याचा प्राणभूत भाग मानला (साहित्याचा गंभीरपणे विचार करताना ते मानावे लागेल) तर प्रेमचंदांनी ग्रामीण साहित्याचा भरदार पाया घातला असे म्हणावे लागेल,

प्रेमचंदांच्या नायकासंबंधी वा एकूण चरित्रसृष्टीविषयी आणखी एक महत्वाची गोष्ट आवर्जून सांगायला हवी. मानवी जीवनात परिस्थिती व माणसाचे व्यक्तित्व यांचा संघर्ष चाललेला असतो सामान्यत: या संघर्षात अंतिम दृष्ट्या प्रभावी कोण या संबंधी दोन टोकाच्या भूमिका घेतल्या जातात. प्रेमचंदांनी परिस्थितीचे विकटपण मान्य केले होते पण त्याच बरोबर मानवी मनाच्या सामर्थ्यांचीही जाण त्यांना होती म्हणूनच त्यांच्या कादंबऱ्या परिस्थितीच्या जटिल चित्रणाबरोबर मानवी मनाचे यथासांग चित्रणही येते. यासंबंधी प्रेमचंदांची भूमिका समन्वयाची आहे आणि ती अधिक योग्य आहे. परिणामत: त्यांच्या साहित्यात परिवेश व मानवी मन यांचा सारखाच आविष्कार होत असतो. परिस्थितीपुढे दुबळी व विवश झालेली माणसे दिसतात. परिस्थितीपुढे न नमणारी व परिस्थितीला वाकवणारी माणसे दिसतात. एवढ्ढेच नव्हे तर एका क्षणी विवश वाटणारी माणसे दुसऱ्या क्षणी विवेकाने प्रखर झालेली आढळतात. हे सर्व विश्वसनीय वाटते हे त्याचबरोबर सांगायला हवे.

## जिवंतपणा व चैतन्य :

प्रेमाचंदांच्या कथातील-- विशेषत: बृहत्काय कादंबऱ्यांच्या कथांतील उपकथांचा, त्यांच्या परस्पर संबंधाचा व चरित्रसृष्टींचा तांत्रिकदृष्टचा विचार केला तर खूप दोष दाखविता येतील. पण काही महान लेखकांच्या कृतीत असा जिवंतपणा व चैतन्य भरलेले असते की तांत्रिक उणिवांचा व दोषांचा विचार करणेच हास्यास्पद वाटते. टॉलस्टॉयच्या 'वॉर अॅण्ड पीस' सारख्या महान कादंबरीत तंत्राचे व रचनेच्या सफाईचे अनेक दोष दाखवता येतील. डॉस्टोव्हस्की तर प्रसंग नाटचात्मक करण्यासाठी वास्तवाची चौकट वेळोवेळी उधळून लावतो शरदबाबूंच्या कादंबऱ्यात आकस्मिक संयोग व नायकाचे आजारीपण यांचा विशिष्ट तऱ्हेने घटना घडवून आणायला हुकमी पात्रासारखा उपयोग केला जातो, टागोरांच्या चरित्रसृष्टीत चमत्कृतीचा भाग कमी असतो असे नाही. पण या सर्व लेखकांच्या साहित्यात या दोषांना उणिवांना अतिक्रमित करून प्रगल्भ वाचकाला आपल्या जीवनानुभवाच्या प्रचंड डोहात डुंबत ठेवण्याचे सामर्थ्य असते. प्रेमचंद त्यापैकी एक लेखक आहेत. त्यांच्या कादंबऱ्यांतील स्वगते व्याख्यानासारखी आहेत. पात्रे वक्तृत्वाचा आवेश चढल्यावर प्रदीर्घ भाषणे करतात. पण हे सर्व, त्यांनी जो विसाव्या शतकातील १९३६ पर्यंतचा प्रचंड जीवनानुभव व्यक्त केला तो समग्रपणे पाहताना, दुर्लक्षित होते. एखादे भव्य लेणे पहाताना बारीक कला-कुसरीच्या दोषांकडे सहजपणे दुर्लक्ष होते. कधी कधी 'कायाकल्प'सारख्या कादंबरीत ज्या त्वरेने पात्रांचे स्वभाव व प्रवृत्ती बदलतात त्यावेळी प्रेमचंद घाईने काही घटना घडवित आहेत असे वाटते. पात्रे त्यांच्या हुकुमतीत कवायत करीत आहेत अशी जाणीव होते. पण अशी स्थळे तुलनेने अल्प आहेत. सामान्यत: प्रेमचंदांनी आपले लेखन कलात्मक संयम व धृती (Patience) बाळगून केले आहे.

## निवेदनाचा अतिरेक :

कथा निवेदनाच्या पद्धतीत प्रेमचंदांनी प्रयोग केले नाहीत. त्यांना जे जीवनदर्शन घडवायचे होते ते मुळात इतके विराट व व्यापक होते की तंत्राचा बडेजाव करण्याची त्यांना आवश्यकताच नव्हती. कथा खुलवून सांगण्याची त्यांची ही हातोटी उत्तम होती. प्रसंगाला अनुरूप भाषेचा ते सहजपणे वापर करीत. व्यावहारिक जीवनाला संवादी अशी त्यांची भाषा, भावोत्कट प्रसंगात वाचकाला

सहज गुंतवून टाकू शकणारी आहे. चिंतनाच्या क्षणी त्यांच्या भाषेत आवश्यक ती सूक्ष्मता व गांभीर्य येते. बारकाईने अभ्यासले तर प्रेमचंदांच्या भाषेचे वैविध्य जाणवते. पण त्यांची भाषा वेगळेपणाने ध्यान आकर्षून न घेता प्रसंगातले नाट्य व मनोवृत्तीतले बारकावे सहजपणे व्यंजित करते. प्रेमचंदांचे संवाद पाल्हाळिक झाले आहेत. काही समीक्षक प्रेमचंदांच्या कादंबऱ्या अनावश्यकपणे मोठ्या आकाराच्या झाल्या आहेत असा आरोप करतात. (प्रेमचंदांच्या नंतर जो व्यक्ति-वाद साहित्यात आला त्याचा एक परिणाम अनुभवच्या संकोच व परिणामी सर्वच संकोच असा झाला. भाषेतील फुलोरा टाळण्याकडे प्रवृत्ती अधिक झाली. स्पष्टी-करणापेक्षा व्यंजित करण्याकडे कल अधिक झाला. त्यातून प्रेमचंदांचा निवेदनाचा अतिरेक नको तितका खुपू लागला.) प्रेमचंद ज्या राष्ट्रीय वातावरणात वाढले त्या वातावरणात एकूण भावनोद्दीपक वक्तृत्व करण्याकडे व दुसऱ्याशी संवादाच्या भूमिकेवरून न बोलता निवेदन करण्याकडे प्रवृत्ती अधिक होती. त्याचा परिणाम प्रेमचंदांच्या संवादावर व निवेदन शैलीवर दिसतो. भाषेचा व निवेदनाचा अतिरेकी उपयोग हे त्या युगाचे वैशिष्ट्य होते. (मराठीतील गडकऱ्यांची नाटके या दृष्टीने पहावीत) प्रेमचंद पूर्णतः तो परिणाम टाळू शकले नाहीत. मात्र जितक्या अधि-क्षेपाने या संबंधी आरोप केला जातो तितका तो दोष गंभीर नाही. प्रेमचंदांच्या भाषेवर, निवेदनांवर व एकूण कलाकृतीच्या आकारावर संस्कार करण्याचे प्रयत्न करून पाहिल्यास पुष्कळसा जीवनानुभवच नष्ट होईल असे वाटते. पसरटपणा, पाल्हाळ इत्यादी दोष प्रेमचंदांनी चितारलेल्या उदंड मानवतेच्या प्रवाहात बुडबुड्या-सारखे उत्पन्न होऊन विरुन जातात. वाचक डुंबू लागतो यो या मानवतेच्या अजस्त्र प्रवाहात..

प्रेमचंदांची वातावरण निर्माण करण्याची शक्ती जबर होती. विचारांना व भावनांना शून्यात शब्दाकार न देता परिस्थितीच्या व वातावरणाच्या भक्कम पार्श्वभूमीवर उभारण्यात व मूर्त रुपात प्रस्तुत करण्यात त्यांचे मन रमते. शेवटी मन परिस्थितीच्या दबावात वावरत असते. संस्कारही प्रबळ असतात. अपवादात्मक माणसे परिस्थिती विरूद्ध ठाम उभी राहू शकतात. पण सामान्य माणूस व त्याचे मन घडत असते त्या परिस्थितीचा वाटा मोठा असतो. म्हणूनच ते मानवी मनात वातावरणाचा भक्कम आधार देतात. याचा परिणाम असा होतो की त्यांची माणसे विश्वसनीय बनतात व आपल्या पतनातही वाचकाची सहानुभूती प्राप्त करू शकतात.

## प्रेमचंदाचे ऋण :

हिंदी साहित्याला प्रेमचंदांनी खूप भरभरून दान दिले. समृद्ध भाषा दिली व्यावहारिक जीवन व साहित्य यातील भाषेचे अंतर जवळ जवळ नष्ट केले. त्यांचे साहित्य तीन चार दशकांच्या सामाजिक राजकीय सांस्कृतिक इतिहासाचे प्रतिबिंब तर दाखवतेच त्या इतिहासाशी संबद्ध मानवी मनाचे स्वरूपही दर्शविते. प्रेमचंदानी ज्या वास्तवाच्या राजरस्त्यावर हिंदी साहित्याला गतिमान केले त्या मार्गाने हिंदी कथासाहित्य आजही जोमाने वाटचाल करीत आहे. भारतीय समाजातील विविध वर्गाच्या वृत्ति-प्रवृत्तीचे प्रामाणिक रेखांकन करून त्यातील अंतर्विरोध, संघर्ष व ताण मोठ्या ताकदीने चित्रित केले. समाज व व्यक्ती यांच्या परस्पर संबंधात निर्माण झालेल्या गुंतागुंतीच्या व नानाविध समस्यांचा कलात्मक आलेख काढला. एक प्रकारे १९०० ते १९३६ पर्यंतच्या भारतीय समाजाच्या जीवनाचा प्रचंड प्रवाह शब्दांकित केला. भारतीय जनतेच्या जीवनाबद्दलच्या उत्कट कळकळीने त्यांनी तिच्या सुखदुःखाचा तन्मयतेनें विचार केला. या जनतेत अस्पृश्य आहेत. शेतकरी मजूर आहेत, भिकारी आहेत, भारतीय स्त्रिया आहेत, निम्नमध्यमवर्गीय लोक आहेत. त्यांनी बुद्धिजीवी वर्गाला आसपासच्या जमावाविषयी जागरूक तर केलेच पण अंतर्मुखही केले. कोंडलेल्या दबलेल्या अवरुद्ध झालेल्या जीवनाचा प्रवाह मुक्त कसा होईल याचा चुकतमाकत का होईना पण अहर्निश विचार केला. आंधळा भिकारी व अकिंचन श्रमजीवी याना साहित्याचे नायकत्व बहाल करून साहित्यातील प्रतिष्ठित कल्पनांवर आघात केले. भारतीय संस्कृतीतील मूल्यांचा व मूळ तत्त्वांचा समयोचित स्वीकार करून त्यांनी महान लेखकाची जबाबदारी पार पाडली. प्रेमचंद पहिले मोठे ग्रामीण साहित्यकार होते, पहिले मोठे दलितांचे कैवारी लेखक होते, भारतीय स्त्रियांचे मित्र व मार्गदर्शक होते.

प्रेमचंदांच्या साहित्यिक कृतीत तंत्राच्या उणिवा आहेत. विकृत मनाच्या प्रवृत्तीचा त्यानी मागोवा घेतला नाही. स्त्री-पुरुष संबंधातले काही 'कुशल' (Crucial) स्वरुपाचे प्रश्न त्यांनी उभे केले नाहीत. जीवनाच्या रहस्यमय आध्यात्मिय प्रेरणांबद्दल फारशी उत्सुकता त्यांनी दाखवली नाही. प्रगल्भ मानवी मनाला बोचणारे परात्मपणाचे, एकटेपणाचे, निरर्थकतेच्या, उद्वेगाचे, कंटाळवाणेपणाची चित्रण त्यांनी केले नाही. मृत्यू संबंधी त्यांनी तात्विक विज्ञानाची जिज्ञासा दाखवली

नाही. (त्यांच्या साहित्यात मृत्युचे खूप प्रसंग आले आहेत तरी) ते सामाजिक संदर्भात व्यक्तीचा विचार करणारे कलावंत होते. त्यांना उणेपुरे ५६ वर्षांचेच जीवन लाभले. ज्या वयात चिंतनशक्ती विलक्षण प्रगल्भ झाली. कलाप्रेरणा मुक्त व शक्तिशाली झाला (' गोदान ' हे त्यांचे परिपक्व फळ) कलात्मकतेचा उत्कर्षबिंदू त्यांनी गाठला त्याच वेळी त्यांचे देहावसान झाले. प्रेमचंदांना ' गोदान ' नंतर आणखी दहावर्षे जीवन मिळाले असते तर-

पण असा विचार करण्यात फारसा अर्थ नाही. जाणवते ती एक हुरहुर प्रेमचंदांनी जे दिले ते इतके मोठे आहे की त्यांचे संस्कार घेतले तरी जीवन कृतार्थ व्हावे.

●●●

प्रेमचंदांचे साहित्य विविध प्रकारचे आहे. त्यांनी कादंबऱ्या लिहिल्या, कथा लिहिल्या नाटके लिहिली, अनुवाद केलें, निबंध लिहिले. त्यांच्या सर्व साहित्याचा समीक्षात्मक परिचय देणे शक्य नाही. या ग्रंथांत त्यांच्या फक्त चार श्रेष्ठ कादंबऱ्यांचा व निवडक उत्कृष्ट कथांचा समीक्षात्मक परिचय द्यायचे ठरविले आहे. हे समीक्षात्मक लेखन हिंदी वाचकांसाठी केलेले नाही. मराठी वाचकां-साठी केलेंलें आहे. त्यामुळे काही मर्यादा येणे स्वाभाविक आहे. पण प्रेमचंदांच्या साहित्याचा मुळातून आस्वाद घ्यावा अशी आकांक्षा वाचकांमध्ये निर्माण झाली तरी या प्रयत्नाचे सार्थक होईल असे वाटते.

# (१) प्रेमाश्रम : जळते वास्तव आणि उमलते स्वप्न

प्रेमचंदांनी 'सेवासदन' (बाजारे हुस्न) लिहून संपवली आणि तीन महिन्यातच दुसरी कादंबरी प्रेमाश्रम (गोशए आफियत) लिहायला आरंभ केला. २ मे १९१८ ते २५ फेब्रुवारी १९२० या अवधीत कादंबरी पूर्ण झाली.

हा काळ राजकीय दडपशाहीचा होता. १९१४-१८ च्या युद्धात महात्मा गांधींनी ब्रिटिशांना बिनशर्त मदत केली होती. लोकमान्य टिळकांशी त्यांचे तात्विक विरोध होते. युद्ध संपल्यावर ब्रिटिशांनी भारतावर दडपशाहीची चक्रे जोराने फिरवायला सुरवात केली. १९१९ मध्ये रौलट ॲक्ट पास झाला. कोणत्याही तऱ्हेने ब्रिटिशांना प्रत्यक्ष विरोध करणे म्हणजे जेलमध्ये जाऊन पूर्णपणे मूक राहाणे होते. जालियनवाला बाग प्रकरणाच्या निमित्ताने ब्रिटिशांनी आपल्या कृतघ्नतेचे दर्शन घडविले होते. देशातील प्रत्येक जागरुक नागरिक कुढत होता, असंतोषाने पेटत होता. त्याचा हा असंतोष मोर्चाच्या रुपाने बाहेर पडत होता. हिंदू व मुसलमान दोन्ही जमातीत यावेळी ब्रिटिशांविरुद्ध विद्रोहाची व आपसांतील ऐक्याची भावना उत्पन्न झाली होती. प्रत्यक्ष राजकीय परिस्थितीबद्दल खुलेपणाने लिहिणे शक्य नव्हते तरीही या कादंबरीत शेतकऱ्यांमधला असंतोष, ज्वालासिंह सारख्या जिल्हा मॅजिस्ट्रेटमधली निराशा, जमीनदारांच्या अनन्वित छळाकडे तटस्थपणे पाहाणारे सरकार इत्यादी बाबींच्या माध्यमातून प्रेमचंदांनी तिरकसपण राजकीय भाष्यही केलेले आहे. एकीकडे प्रेमचंद पोटासाठी बी. ए. परीक्षेला बसत होते व दुसरीकडे कलाकाराच्या उर्मीने 'प्रेमाश्रम' सारखी मोठी कादंबरीही लिहित होते.

प्रेमचंदांच्या मनात राजकीय व सामाजिक परिस्थितीवर उपाय योजने-संबंधी एक द्वंद्व चाललेले होते. त्यांनी टॉलस्टायच्या वाङ्मयाचे संस्कार ग्रहण केले होते. महात्मा गांधींच्या सत्याग्रही मार्गाकडे ते आकर्षित झाले होते. जमीन ईश्वराने निर्माण केलेली आहे, ती कसणाऱ्याच्या मालकीची आहे, जमीनदार

अनावश्यक दलाल आहेत ही विचारसरणी त्यांनी मनापासून स्वीकारलेली होती. माणसाच्या मूळ सत्स्वरुपाबद्दल त्यांना विश्वास वाटे. 'प्रेमाश्रमी'च्या शेवटी शेवटी ते लिहितात, 'मानव-चरित्र एकदम काळे असत नाही की एकदम धवल असत नाही. त्यात दोन्ही रंगाचे विचित्र मिश्रण झालेले असते. स्थिती अनुकूल असेल तर माणूस ऋषितुल्य होतो, प्रतिकूल असेल तर नराधम' –असे असले तरी माणसाच्या विवेकावर व सत्प्रवृत्तींवर त्यांची अधिक श्रद्धा दिसते. हृदयपरिवर्तनावरची त्यांची निष्ठा सर्व कादंबरीत पसरलेली आहे. पण याचबरोबर रशियात झालेल्या राज्य-क्रांतीचा प्रभावही त्यांच्या मनावर पडलेला दिसतो. त्यांच्या मनोहर नावाच्या शेतकऱ्याचा मुलगा बलराज माथ्याने गरम असतो. तो वर्तमानपत्र वाचतो. तो म्हणतो, 'तुम्ही तर असे थट्टा उडवता आहात की शेतकरी म्हणजे कोणी नाहीच. जमीनदारांची वेठबिगार करण्यासाठीच तो जणू जन्मला आहे. पण माझ्याकडे जे वर्तमानपत्र येते त्यात लिहिले आहे की रशियात शेतकऱ्याचे राज्य आहे, त्याना जे वाटते ते ते करू शकतात. त्याजवळ बल्गारिया देश आहे. आताचीच बातमी अशी आहे की शेतकऱ्यांनी राजाला गादीवरून खेचले आणि तिथे आता मजूर व शेतकरी यांची पंचायत राज्य करते.' पुढे मनोहर आणि बलराज उन्मत्त गौसखाँचा खून करतात. हृदयपरिवर्तनाचा मार्ग आणि रक्तरंजित क्रांतीचा मार्ग या दोन्हीचे एक द्वंद्व प्रेमचंदांच्या मनात चालले होते असे दिसते. जरी रक्तरंजित क्रांतीचा मार्ग आजच्या समाज व्यवस्थेला अनेक दृष्टीनी अव्यवहार्य आहे असे त्यांनी दाखवले असले तरी ज्या तऱ्हेने त्यांनी जमीनदाराच्या छळाचे व शेतकऱ्यांच्या हालाचे जिवंत चित्र रेखाटले आहे त्यावरून या दोहोंत अलंघ्य दरी आहे आणि तिचा परिणाम विग्रहात होणार आहे असे कादंबरी वाचताना वाटत राहाते.

## शेतकरी वर्गाची स्थिती :

'प्रेमाश्रम' कादंबरीत शेतकरी आणि जमीनदार या दोन वर्गाचे स्वरुप आणि त्यांच्यातील संघर्षाची स्थिती यांचे मोठे विदारक चित्रण केले आहे.

कादंबरीच्या आरंभीच थकलेले शेतकरी शेकोटीभोवती बसून तंबाखू ओढत सुखदु:खाच्या गप्पा करताना दाखवले आहेत. नुकताच अधिकाऱ्याचा पाहणीसाठी दौरा झाला. गावातले बडे लोक त्यांच्या घोड्याच्या आगेमागे धावत होते. शेतकऱ्यांच्या दृष्टीने इंग्रज अधिकारी काय किंवा जमीनदाराचे अधिकारी काय

दोन्ही सारखेच. खरे तर इंग्रज नसते तर देशी अधिकाऱ्यांनी चांगलेच पिळून काढले असते. मनोहर म्हणतो, 'भाई, अधिकारी इंग्रज बरे, जर हे नसते तर या देशी अधिकाऱ्यांनी आम्हाला भरडून पिऊन टाकले असतें.' पुढे या गप्पांत प्रेमचंदांनी सहजपणे त्यांच्या दुःखाचा, हालअपेष्टांचा, आर्थिक शोषणाचा एक प्रभावी चित्रपट साकार केला आहे. तलाठी, मामलेदार, यांच्यापासून सरकारच्या चपराश्या-पर्यंत शेतकऱ्यांना नागविणाऱ्या लोकांच्या कृष्णकृत्यांचा पाढा वाचला आहे. जमीनदाराचे नेमलेले अधिकारी आपापल्यापरीने लुबाडतच असतात. हे सर्व चित्रण अशा दृष्टीने केले आहे, की शेतकऱ्याचे रक्तशोषण करणाऱ्या या जळवांना चिरडून मारण्याची दुर्दम्य इच्छा वाचकाच्या मनांत सहजपणे निर्माण व्हावी. जमीनदाराला तूप हवे असते. प्रत्येक शेतकऱ्याने तुपासाठी पैसे घ्यावे, (तुपाच्या चालू भावापेक्षा खूपच कमी दराने) आणि तूप पोचते करावे असा हुकूम निघतो. मनोहर व बलराज पैसे घेत नाहीत. इथून शेतकरी विरुद्ध जमीनदाराचे नोकर यांच्यात संघर्षांच्या ठिणग्या पडतात. काही शेतकरी उघडपणे जमीनदाराच्या बाजूने असतात, काही मनांतून विरुद्ध असले तरी संघर्ष टाळण्यासाठी मूक असतात. तर काही संघर्ष वाढू नये म्हणून समझौता करणारे असतात. पण एकूण आपली कातडी बचावण्यासाठी सर्वांचा प्रयत्न चाललेला असतो. देव व दैव यावर विश्वास ठेऊन जगणाऱ्या भारतीय समाजाच्या रक्तात विद्रोहाचा अंगार म्हणावा तसा फुलत नाही.

प्रेमचंदांनी शेतकऱ्यांच्या दयनीय झोपड्यांचे, त्यांच्या दरिद्री संसाराचे, अभावग्रस्ततेचे सर्वांगीण व्यापक वर्णन केले आहे आणि प्रसंगाच्या सहाय्याने चित्रणही. आपसांतील त्यांचे संबंध आत्मीयता व मत्सर यांनी कसे विचित्र बनलेले असतात त्याचेही चित्रण केले आहे. दुष्काळ, प्लेग, हगवण, देवी यांच्यासारखे रोग, अवर्षण, अतिवर्षण यामुळे उत्पन्न होणाऱ्या अनंत अडचणी, पिण्याच्या पाण्याच्या अभावामुळे होणारे हाल, या सर्व नैसर्गिक व मानवनिर्मित यातनांचे हृदय-विदारक चित्र तर प्रेमचंद काढतातच पण जमीनदार व त्याच्या नोकरशाही-मुळे निर्माण होणाऱ्या आपत्तीचे मोठे वास्तवदर्शी आणि प्रभावी असे चित्रमय जगत साकार करतात.

या शेतकरी वर्गात अनेक जातीचे लोक असतात व ते आपल्या जातीला चांगले चिकटून बसलेले असतात. मामलेदार जेव्हा आपल्या लव्याजम्यासह या गावात

आपले तंबू गाडतो तेव्हा सक्तीने वेठबिगार घेण्याचे आणि अन्य अनेक प्रकारच्या अत्याचारांचे सत्र सुरू होते. सख्खू चौधरी गवत कापणे आपल्या जातीचे काम नाही म्हणून विरोध करतो, दुखरन भगत शेणाने जमीन सारवणे आपले काम नाही, म्हणून विरोध करतो. कादिरमियाँ मात्र सर्व अत्याचार शेवटी अल्लाने दिलेली शिक्षा आहे असे समजून सर्व शेतकरी बंधूंना सर्व कामे करावयास लावतो. एका बाजूने विलक्षण दुःखी असलेले कादिरमियाँ विनोदी किस्से सांगून व सांगायला लावून दुःखाची धार कमी करण्याचा प्रयत्न करतात. पण सर्वानाच ही सहिष्णुता शेवटपर्यंत सांभाळता येत नाही. दुखरन भगत म्हणतो, 'तुला यावेळी भाकरी सुचते. मनात असे येते की डोके आपटून मरून जावे.' कादिरमियाँ सुद्धा बोलता बोलता रडू लागतात. 'जो हृदयातला ताप हास्य आणि विनोदाने ते दाबू पहात होते तो प्रज्वलित झाला. मनोहरने पाहिले तर त्याचे डोळे रक्तवर्ण झाले होते. पददलित अभिमानाच्या मूर्तीसारखे!' चाळीस वर्षे दुखरन भगताने देवाच्या मूर्तीची मनोभावे पूजा केली. पूजा केल्याशिवाय व नैवेद्य दाखविल्याशिवाय पाणी न घेणारा दुखरन भगत घरातून शाळीग्राम व पूजेची पेटी घेऊन येतो आणि फेकून देतो. तीस चाळीस वर्षांची निष्ठा या अपमानाने नष्ट झाली. धार्मिक आस्थेची मजबूत भिंत हलून विटा इकडे तिकडे इतस्ततः पसरल्या. सकाळपासून उपाशीपोटी गवत कापणारे, पाणी आणणारे आणि सर्व प्रकारची अंगमेहनतीची कामे करणारे चांभार मजुरीसाठी भांडू लागले. अत्याचार करणारे चपराशी व मामलेदार आणि शेतकरी, चांभार यांच्यातला संघर्ष पेट घेणार होता पण गांधी-वादी विचारांचे प्रेमशंकर मध्यस्ती करतात आणि तो संघर्ष थांबवतात. विसेसर शाहाकडून सर्व प्रकारचा माल आणून त्याची बिले न देताच चपराशी पळून जातात व २०० रुपयांपैकी फक्त ७० रुपये त्याच्या हाती लागतात. प्रेमशंकर मामलेदाराला याबद्दल जाब विचारतात तेव्हा तो निर्लज्जपणे म्हणतो, महाराज यावर तोडगा माझ्याकडे नाही. जोपर्यंत लोकांना तुम्ही संपूर्ण जागे करणार नाही तोपर्यंत अशा गोष्टी बंद होणे कठीण आहे. जिथे मनात स्वार्थ आहे, प्रजा इतकी कमजोर आहे, तिथे कोणतीच सुधारणा शक्य नाही. (हसून) आम्ही एक प्रकारे तुमचे मदतगार आहोत. प्रजेला सतावून भरडून मजबूत बनवीत आहोत आणि तुमच्यासारख्या समाज सेवकांसाठी भूई नांगरून ठेवीत आहोत.' या सर्व प्रसंगात प्रेमचंदांनी जात, वर्ग आणि एकूण समाज यातील सर्व घटकांवर मोठा प्रखर प्रकाशझोत टाकला आहे.

## शेतकरी वर्गातील जागृती :

सामान्यत: भारतीय शेतकरीवर्ग अशिक्षित असला तरी समंजस आहे. प्रेमशंकर अमेरिकेहून येतात आणि शेतकरी वर्गाची पाहाणी करतात. त्यांना असे दिसते की शेतकरी वर्ग शहाणा आहे आणि नवीन गोष्टी त्याला समजतात पण तो परिस्थितीच्या बंधनात पूर्णपणे जखडला गेला आहे. कमालीचा साहृष्णू शेतकरी वर्ग हा जमिनदार, जमिनदाराचे अधिकारी व नोकरवर्ग राज्यकर्त्यांचे नोकर व अधिकारी यांच्या जाचांत शेकडो वर्षे भरडला जात आहे. परंपरागत धार्मिक संस्कारामुळे–देव, देव व इतर रूढी– तो अगतिक झालेला आहे.

या वर्गात काही सुधारणेची बीजे रोवणारा सुशिक्षित मध्यम वर्ग आधुनिक शिक्षण पद्धतीमुळे स्वार्थी आपमतलबी आणि अन्यायात भागिदारी करणारा झाला आहे. अल्पसंख्यांक ध्येयवादी वर्ग या शेतकरी वर्गात कार्य करू लागला तर आर्थिक व राजकीय सर्व दृष्टया त्याला अनेक अडचणीशी मुकाबला करावा लागतो.

तरीही काही ध्येयवादी मध्यमवर्गीय लोक व्यक्तिगत प्रयत्न करीत आहेत व त्यामुळे शेतकरी वर्गात काहीशी परिवर्तने घडत आहेत. 'प्रेमाश्रम' मध्ये प्रेमचंदांनी हे सर्व वास्तव विविध चित्ताकर्षक प्रसंगातून व रेखीव व्यक्तिचित्रांतून स्पष्ट केले आहे. प्रेमशंकर आपली जमीनदारी सोडून या वर्गाच्या सुखदु:खाशी एकरुप होण्याचा प्रयत्न करीत आहेत. आरंभी सरकारी नोकरीत असलेले जिल्हा मॅजिस्ट्रेट ज्वालासिंह शेवटी प्रेमशंकराच्या ध्येयवादाने प्रभावित होऊन आणि विवेकाने व न्यायाने सरकारी अधिकाराच्या जागेवर असताना वावरणे अशक्य आहे हे जाणून त्यागपत्र देऊन प्रेमशंकरांच्या प्रयत्नात हातभार लावतात. आरंभी कोणत्याही मार्गाने पैसा व प्रतिष्ठा मिळवणारे डॉ. प्रियनाथ शेतकऱ्यांविरुद्ध खोटी साक्ष देतात पण प्रेमशंकरांच्या स्वार्थत्यागाने व बलिदान वृत्तीने प्रभावित होऊन तेही आपली खोटी साक्ष फिरवतात व जनसेवेच्या कार्याला वाहून घेतात. खोऱ्याने पैसा ओढणारे डॉ. ईर्फानअली आरंभी पैशासाठी जमीनदाराने फेकलेल्या मोहाच्या गळाला लागतात व शेतकऱ्यांची बाजू सोडून देतात पण जनतेत झालेल्या अप्रतिष्ठेमुळे त्यांनाही जाग येते आणि ते शेतकऱ्यांची बाजू मोठ्या कौशल्याने लढवतात. थोडक्यात ह्या ध्येयवादी मध्यम वर्गातील अप-प्रवृत्तींचा व दोषांचा

चांगला ऊहापोह करून त्यांच्यातला सुप्त संभावनाही प्रेमचंदांनी दाखवल्या व शेवटी सामान्य जनतेचा पक्ष मध्यम वर्गीय सुशिक्षितांनी उचलला पाहिजे अशी जाणीव करून दिली. शेतकरी वर्गाचे बरेचसे प्रश्न या दिशेने सुटू शकतील अशी शक्यता प्रेमचंद सूचित करतात.

मात्र अत्याचारांच्या व अन्यायाच्या दबावाखाली चिरडलेल्या या वर्गातही हळूहळू प्रतिक्रियेची व विद्रोहाची भावना उत्पन्न होते आहे याची जाणीव प्रेमचंद देतात. ज्ञानशंकरांचा नोकर गौसखाँ सर्व प्रकारे शेतकऱ्यांची छळवणूक करतो. चरण्याच्या जागांवर गुरांना चरण्यास बंदी करणे, सार्वजनिक तळ्यांतले पाणी एन उन्हाळ्यात शेतकऱ्यांना वापरु न देणे, झोपड्या जाळणे, खोट्या आरोपांचे कुभांड रचून त्यात शेतकऱ्यांना अडकविणे व जेलमध्ये धाडणे, धान्य व पैसे लुबाडून घेणे या सर्व गोष्टी जमीनदाराचे नोकर करतात. शेतकऱ्यांचा अपमान करणे हा तर त्यांचा नित्याचा धर्मच होऊन बसलेला असतो. मनोहरसारखा शेतकरी याविरुद्ध शब्द उच्चारतो म्हणून त्याला धडा शिकविण्याचा बेत गौसखाँ करतो. बलराज सारखा बलदंड तरुण तर त्याच्या डोळ्यांत सतत खुपत असतो. गौसखाँ व त्याचे सहकारी मनोहरच्या पत्नी–बलराजच्या आईला धक्का मारुन पाडतात. ही अपमानीत झालेली स्त्री आपल्या रक्षकांना सर्व प्रकार सांगते. मनोहरच्या मनांत आधीच गौसखाँ बद्दल प्रचंड चीड असते. या घटनेने तो गौसखाँला खतम करण्याचा निर्णय घेतो. त्याच्या वयामुळे त्याला आपल्या मुलाची मदत घ्यावी लागते. रात्री ते दोघे गौसखाँला जिवे मारतात. मनोहर बलराजला पळून झोपून जाण्यास सांगतो व स्वत: पोलिस ठाण्यावर जाऊन हजर होतो. हा सर्व प्रसंग त्यांतील सूक्ष्म भावछटांसह आणि संमिश्र अनुभूतींसह प्रेमचंदांनी इतक्या प्रभावीपणाने चित्रित केला आहे की 'प्रेमाश्रम' मधीलच नव्हे तर महान साहित्यातल्या काही उत्कृष्ट प्रसंगात याची गणना होईल.

यानंतर सरकारी नोकरवर्ग, जमीनदार व पैशासाठी बुद्धी विकणारे मध्यम वर्गीय लोक एका बाजूला आणि निर्धन, निरुपाय, लाचार शेतकरी दुसऱ्या बाजूला असा संघर्ष प्रेमचंदांनी दाखवला आहे. प्रेमशंकर, ज्वालासिंह यांच्या सारख्यांची मदत व संन्यासी झालेले सुबखू चौधरी यांच्यामुळे हा संघर्ष अधिक रंगत जातो. या संघर्षात कधी शेतकरी एकजुटीने उभे राहतात. कधी त्यांची एकजूट जमीनदाराच्या कुटिलपणामुळे ढासळते. कधी हृदयपरिवर्तनामुळे पुन:

सांधली जाते. एकूण हा संघर्ष खूपच जोमदारपण आणि वास्तवाशी विशेष फारकत न करता मोठ्या नाट्यमयतेने प्रेमचंदांनी प्रस्तुत केला आहे. या संघर्षात शेतकऱ्यांचे विविध स्वभाव आणि त्यांच्या वृत्तीतले बारकावे प्रकटले आहेत. गौसखाँच्या हत्ये प्रमाणेच मनोहरमुळे सर्व गावांतील शेतकऱ्यांवर आलेल्या संकटामुळे त्यांची आपसांतली कुरबूर, तेढ, क्रोध, क्षोभ, विलासीचे मनांतले दुःख, बाहेरच्या स्त्रियांचे तिला सतत टोचणे, सबखू चौधरींच्या प्रशसेनंतर पुनः स्वाभिमानाने गावात तोऱ्यात वागणे; आपल्या अविचारामुळे सर्व नांवावर आलेल्या संकटासाठी स्वतःला जबाबदार मानून पश्चात्तापाने होरपळणाऱ्या व शेवटी आत्महत्या करणाऱ्या मनोहरची करुण मनःस्थिती ज्ञानशंकरचे प्रेमशंकर बरोबर कुटिल डावपेच; न्यायालयात कामधंद्याच्या नावावर होत असलेली अमानुष अन्याय व पोलिस खात्याचा भयावह चेहरा; निर्दोष मुक्तता झाल्यावर गांवकऱ्यांनी व सामान्य जनतेने साजरा केलेला आनंदोत्सव या सर्व घटना त्यांतील मनोवैज्ञानिक तपशीलासह प्रेमचंदानी चित्रित केल्या आहेत व त्यामुळे हा सारा संघर्ष वास्तवाची पातळी न सोडता मोठा नाट्यमय झालेला आहे.

## शोषक वर्ग :

शेतकरी वर्गाशी विरोधी लयीने संबंधित असलेला शोषक वर्ग 'प्रेमाश्रम' कादंबरीतले एक फार मोठे वास्तव आहे. हा शोषक वर्ग एकसंध नाही, त्याचा चेहरा एकसारखा नाही. त्यांतही विभिन्न वर्ग वा श्रेण्या आहेत. त्यांची गरिबांशी वागण्याची पद्धत शोषणावर आधारलेली असली तरी त्यांच्या पद्धतीत खूप अंतर आहे. या शोषक वर्गात ज्ञानशंकरसारखा छोटा जमीनदार आहे. त्याची वार्षिक मिळकत दोन हजारच आहे. त्याचबरोबर वार्षिक उत्पन्न दोन लाखाच्या आसपास असणारे त्याचे सासरे राय कमलानंद आहेत. त्याहीपेक्षा अधिक उत्पन्न असणारी त्यांची विवाहित कन्या गायत्री आहे यांच्या आसपासचे छोटे बडे रियासतदार आहेत. श्रीमंत वर्गाचे नैनीतालसारख्या ठिकाणी असणारे क्लब आहेत. या सर्वांचे स्वभाव वेगळे आहेत, वृत्ती भिन्न आहेत. दृष्टिकोण व जीवनविषयक तत्वज्ञान वेगवेगळे आहे.

ज्ञानशंकर विलक्षण बुद्धिमान, वा पटु, शैलीदार लेखक उत्तम प्रबंधक, कुशल प्रशासक आहेत. त्यांना दुसऱ्यावर छाप मारण्याची कला अवगत आहे. पण या

गुणांबरोबर ते खूप महत्वाकांक्षी, कुटिल कारस्थाने करणारे आणि दुष्ट बुद्धीचे गृहस्थ आहेत. एकीकडे गायत्रीसारखा तरुण व श्रीमंत विधवेला आपल्या नादी लावून तिची संपत्ती बळकाविण्यासाठी नाना कारस्थाने करणारा हा माणूस भक्ति-भावाचे साधुत्वाचे उत्तम व यशस्वी नाटक करू शकतो. राय कमलानंदाचा मुलगा वारल्यावर त्यांच्या इस्टेटीचा वारस आपला मुलगा होणार या कल्पनेने मनात आनंदित होणारा हा निर्दय मनुष्य राय कमलानंदसारख्या प्रतिभाशाली माणसाच्या आदरास पात्र ठरतो आणि नंतर त्यांच्यावर विषप्रयोगही करतो. आपल्या भावाच्या आगमनाने क्षणभर आनंदित होणारा हा मनुष्य भाऊ इस्टेटीत वाटेकरी होणार या दुःखद विचाराने त्याला जाति-बहिष्कृत करण्याचे कारस्थान तर करतोच पण प्रेमशंकर व त्यांची पत्नी श्रद्धा यांच्यात मेळ होऊ नये असाही प्रयत्न करतो: शेतमजुरांकडचे पैसे वसूल करण्यासाठी आपल्या नोकरांना कोणत्याही प्रकारचे निर्घृण अत्याचार करण्यास मुभा तर देतोच पण गौसखाँचा खून झाल्यावर त्याच्याविषयी जराही न कळवणारा ज्ञानशंकर त्याच्या हत्येचा उपयोग शेतकऱ्यांसकट आपल्या भावालाही त्यात गोवण्याच्या दृष्टीने करून घेतो. आपल्या साध्वी पत्नीचे अप्रत्यक्षपणे हाल करतो. ती अकाली मृत्यु पावते. ज्ञानशंकर म्हणजे उलटणारी बाजू आपल्या फायद्यासाठी राबवणारा एक हुषार खलनायक ! काही क्षण त्यालाही दुःख वाटते, पश्चात्ताप होतो, बंधू व पत्नीबद्दल आंतरिक कळवळा वाटतो पण हे क्षण म्हणजे त्याच्या माणुसपणाचे काही क्षण-जीवी चमकणारे दवबिंदू. या माणसाची प्रमुख प्रेरणा अधिकाधिक धन मिळ-विण्याची व धन बरोबर येणारी सत्ता व प्रतिष्ठा भोगण्याची. शेवटी अनेक प्रकारची भौतिक सुखे त्याला प्राप्त होतात. पण सुखाचा सर्वोच्च क्षण आला की तो याच्या हातून सुटून जावा अशीच एकूण स्थिती. मायाशंकरच्या हाती रायकलानंद व गायत्री या दोघांची संपत्ती एकवटते. पण शेवटच्या समारंभात मायाशंकर सर्व संपत्ती ट्रस्टच्या मालकीची करून भूमी कसणाऱ्यांना वाटून टाकण्याचा मनोदय जाहीर करतो. ज्ञानशंकरच्या जगण्याचे प्रयोजन संपते. त्याने आतापर्यंत केलेल्या प्रचंड धडपडीचे उद्दिष्टच नष्ट होते. शेवटी शून्यतेच्या काठावर आलेला ज्ञानशंकर गंगेच्या प्रवाहात उडी मारून जीवित कार्य संपवितो.

प्रेमानंदांनी या अतिशय संमिश्र, गुंतागुंतीच्या व बहुरूपी खलपुरुषात 'प्रेमाश्रम' कादंबरीचे नायक केले आहे !

प्रेमचंदांनी आपल्या कथा–साहित्यात जी प्रचंड माणसे उभी केली त्यापैकी आणखी एक रायकमलानंद. हा एक रसिक माणूस. जीवन सुखाकरता आहे असे मानणारा. सर्व प्रकारच्या दैहिक सुखांचा प्रचुर उपभोग घेणारा हा महामानव जीवनाचा खरा उत्कटपणा, आवश्यक संयम करण्यावरही अवलंबून आहे असे मानतो. हा जेवढा भोगी तेवढाच योगीही आहे. म्हणूनच साठाव्या वर्षीही पंचवीस वर्षांच्या तरुणांना लाजवणारा, वीस पंचवीस माणसांना मारायला पुरेल एवढे विष योगबलाने पचवू शकणारा हा प्रचंड पुरुष संगीत व साहित्य यांचा मर्मज्ञ होता. राजकारणाची जाण असणारा होता. माणसाच्या मनाचा वेध घेण्याची त्यांची शक्ती अपूर्व होती. प्रेमचंद स्वतःच लिहितात– ‘जर स्वतः पाहिलेली व अनुभवलेली गोष्ट नसती तर एकाच व्यक्तीमध्ये इतक्या गुणांची चर्चा अविश्वसनीय वाटली असती.’ लाखो रुपये सहजपणे उधळणारा हा रसिक लाखो रुपये मिळविण्यासाठी शेतकऱ्यांवर कोणत्याही प्रकारचे जुलूम करायाला मागेपुढे पहात नसे. ज्ञानशंकरांनी केलेल्या विष प्रयोगाची घटना माहित असतानाही अहंकाराने व आत्मबळाच्या काहीशा अनाठायी विश्वासाने त्यांनी विष घातलेले अन्न खाल्ले योगबळाने ते आपला जीव वाचवू शकले पण त्यांची शारीरिक शक्ती नष्ट झाली. आणि प्रचंड शक्तींनी युक्त असलेला हा माणूस शेवटी आत्मिक उन्नतीच्या व आत्मसिद्धीच्या मार्गावर अग्रेसर होतो.

या कादंबरीतले एक महत्वाचे चरित्र म्हणजे गायत्री. कमलानंदांची कन्या. सुंदर, साध्वी ! लग्न झाल्यावर तीनच वर्षांनी विधवा झाली तरी मृत पतीबद्दल नितांत भक्ति बाळगून जीवन जगू इच्छिणारी. अफाट संपत्तीची स्वामिनी. ज्ञानशंकरचे वैशिष्टय हे की या स्त्रीवर काही काळ तो मोहिनी घालू शकला आरंभी आपल्यापेक्षा वयाने थोड्याशा छोट्या ज्ञानशंकर बरोबर आपुलकीने वागणारी ही तरुणी हळूहळू नकळत ज्ञानशंकराच्या जाळयात फसते. वासनारहित प्रेम करु पाहणारी ही प्रमदा हळू हळू ज्ञानशंकरच्या सान्निध्यासाठी लालचावते. तिच्या मनातल्या धार्मिक वृत्तीचा आपल्याकडे आकर्षून घेण्यासाठी वशीकरणासारखा उपयोग ज्ञानशंकर करुन घेतो. राधा–कृष्णाच्या रासलीलांतून हळू हळू दोघेही वासनेच्या काठावर येतात. पहिल्याच अलिंगनबद्ध स्थितीत ज्ञानशंकरची पत्नी विद्या (गायत्रीची छोटी बहिण) त्यांना पहाते व इथून गायत्री पुनः भानावर येते. ज्ञानशंकरचे खरे स्वरुप तिला विद्याकडून कळतेच व विद्याच्या अकाली मृत्युने

तिचे डोळे साफ उघडतात. प्रेमचंदांनी या प्रणयाच चित्रण मोठ्या ढंगदार पद्धतीने आणि प्रगल्भतेने केलेले आहे. शेवटी तिला ही अपराधाची तीव्र जाणीव बोचू लागते. ती तीर्थयात्रेला जाते आणि एक दिवस एका महान साधु पुरुषाचे दर्शन घेण्यासाठी जाताना तिला असा भास होतो की तो साधुपुरुष म्हणजे तिचे पिताजी (रायकमलानंद) असतात. आपल्या अपवित्र देहाची तिला लाज वाटते व ती उंच शिखरावरून स्वतःला खाली लोटून देते.

सुंदर, कोमल, ममताळू ही साध्वी स्त्री जेव्हा आपल्या जमीनदाराच्या कार्यांचा विचार करते तेव्हा फारच कठोर व अत्याचारी बनते !

शोषक वर्गांचे हे विभाजित व्यक्तित्व प्रेमचंदानी मोठ्या विस्ताराने व कौशल्याने व्यक्त केले आहे. वैयक्तिक जीवनांत असाधारण गुणांनी संपन्न माणसाचे वर्गीय दात मात्र विलक्षण हिंसक असतात.

राय कमलानंदाना शेवटी जीवन सार्थकतेचा मार्ग सांपडतो तो आत्मिक उन्नतीत किंवा आत्मशोधाच्या प्रयत्नांत ! ज्ञानशंकरांना आर्थिक व भौतिक ऐषणांच्या मागे लागून मिळते ती शून्यता निरर्थक जगण्याची दुःखमय जाणीव व त्यातून मिळालेली आत्महत्येची पळवाट. प्रेमचंदाच्या जीवनदर्शनातले महत्त्वाचे सूत्र स्पष्ट होते. ' धन की दुश्मनी.'

या धनिक वर्गांचे भवितव्य काय आहे याच उत्तर प्रेमचंदांनी सूचित केले. पण विनाशाशिवाय यातून काही मार्ग आहे काय ? आत्मिक आनंदाचा रस्ता एखादा कमलानंद चोखाळू शकतो. प्रेमचंदानी उत्तर दिले आहे ते मायाशंकर याच्या शेवटच्या भाषणाच्या रूपाने. ' ज्या ईश्वराने सृष्टी केली त्याची तरी ही भूमी आहे अथवा ईश्वरी इच्छेप्रमाणे जो हिचा उपयोग करतो त्या शेतकऱ्यांची आहे. राजा देशाचे रक्षण करतो म्हणून त्याला शेतकऱ्यांकडून कर घेण्याचा अधिकार आहे. मग तो प्रत्यक्ष घेवो वा अतिशय कमी आपत्तिजनक अशी व्यवस्था करून घेवो. जर कोणत्याही दुसऱ्या वर्गाला परंपरागत हक्क मिळकत, इस्टेट, अधिकार इत्यादी नावावर शेतकऱ्यांना आपली भोग्यवस्तू बनविण्याची उच्छृंखलता करायची असेल तर या प्रथेला प्रचलित समाज व्यवस्थेवरचा कलंकच मानले पाहिजे.'

## विरोधलयीचे सौन्दर्य :

ग्रामीण जीवनातले भीषण वास्तव आणि वरच्या वर्गातील ऐश्वर्यांचे व भोगविलासाचे नग्न रुप एकमेकासमोर ठेऊन प्रेमचंदांनी या **कादंबरीत ताण निर्माण केला आहे**. दैनंदिन प्राथमिक स्वरुपाच्या गरजाही न भागल्यामुळे जीवनांत उत्पन्न होणारे दुःख भोगणारा शेतकरी वर्ग आणि भोगविलासांसाठी संपत्तीचा पूर वाहू देणारा संपन्न वर्ग यांच्यातील प्रचंड अंतर दोन्ही प्रकारच्या चित्रणांची तीव्रता वाढवतेच पण वाचकाला जनवादी भूमिका उत्स्फूर्तपणे घ्यायला भाग पाडते. दमलेले व थकलेले शेतमजूर आपल्या दुःखांनाच काहीसे विनोदी रूप देऊन मनोरंजन करतात तेव्हा त्या विनोदाचे स्वरुप निर्भेळ न राहाता मनाला घरे पाडणारे होते. यातनांच्या उद्‌गारांची मीमांसा करू न पाहणारा निर्धन वर्ग देवावर आस्था ठेऊन भजनांत आपली दुःखे विसरून जाऊ पहातो. या निर्धन वर्गाजवळ न्याय मिळविण्यासाठी लागणारे पैसे नसतात म्हणून अन्यायाच्या कुऱ्हाडीखाली मान देण्या व्यतिरिक्त उपाय नसतो. याचवेळी धनी वर्ग संगीत सभेसाठी लाखो रुपये खर्च करतो, गायत्रीला उपाधी देण्यासाठी आयोजित केलेल्या समारंभावार हजारो रुपये उधळले जातात, वासनेच्या अतृप्तीतून रासलीला करण्याकडे झालेल्या प्रवृत्तीला अधिक भडक व सार्वजनिक रूप देऊन धनाचा अपव्यय केला जातो. कादिर मियाँ, दुखरन भगत, दपटसिंह इत्यादी गरिबांची लोक कला आणि गायत्री–ज्ञान–शंकर यांची रास–लीला यातलें अंतर पाहिले की प्रेमचंदांनी विरोधी घटनांचा, प्रसंगाचा, व्यक्तींचा कसा कलात्मक उपयोग करून घेतला आहे हे कळते. संक्रामक रोगांच्या बळी पडून पटापट मरणाऱ्यांकडे शवे जाळण्यासाठी पैंसे नसतात तर तर गायत्रीदेवी ज्ञानशंकरांच्या प्रबंधपटुत्वावर खुश होऊन हजारो रुपयांच्या देणग्या त्यांना देते. दपटसिंहाच्या घरातील मृत्यूचे व त्यानंतरच्या त्याच्या व गावकऱ्यांच्या मानसिक प्रतिक्रियाचे करुण भीषण चित्र प्रेमचंदांनी परिणामकारकतेने चितारले आहे.

प्रेमशंकराचा ऋजू व सरळ उमदेपणा व ज्ञानशंकराचा विलक्षण कुटिलपणा, ज्वालासिंहसारख्यांचा जीवन निरर्थक जात चालल्याचा अपराधबोध व रायकमलानंदाचा भोगेच्छू कर्मवाद, कर्तव्य भावनेतून व निश्छल प्रेमांतून स्वीकारलेली श्रद्धेची विरहव्यथा व गायत्रीची प्रणयपिपासा, विद्याची स्वाभिमानी कर्तव्य परायणता व गायत्रीचा अहंकार, बलराजचा भडकपणा व कादिरमियांची सौम्य

शालिनता, गौउखाँसारख्याचे अत्याचार व प्रेमशंकरसारख्यांचा सेवाभाव असे जीवनांतले असंख्य अंतविरोध या कलाकृतींत येतातच आणि या टोकाच्या अंत-विरोधातली विस्तृत भूमी दाखवणारी व कलाकृतीचे वास्तव अधिक विश्वसनीय व मांसल करणारी अनेक माणसे व प्रसंग या कादंबरीत ठासून भरले आहेत.

## आदर्शोन्मुखता :

या कलाकृतीच्या रचना-काळात प्रेमचंदावर गांधीवाद, आदर्शवाद आणि भारतीय अध्यात्म परंपरा यांचा पगडा होता.

यातील अनेक माणसे शेवटी हृदय परिवर्तनामुळे आपल्या जीवन प्रणाली बदलतात. प्रेमचंदांना माणूस चांगला असतो तसा दुष्ट असतो हे मान्य आहे. एकदा माणूस परिस्थितीप्रमाणे सृष्ट व दृष्ट प्रतिक्रिया करु शकतो हे ही त्यांनी दाखवले आहे. ज्ञानशंकर छोटे जमीनदार होते तेव्हा अतिशय कठोरपणे वागत होते. गायत्रीच्या प्रचंड मालमत्तेचे ते मॅनेजर झाले तेव्हा त्यांचे कठोरपण काहीसे निवळले. पुढे भक्तिमार्गाकडे कल झुकल्यावर त्यांच्या बाह्य आचरणात खूपच सौजन्य आले, उदारपणा वाढला. प्रतिष्ठा प्राप्त करण्याची इच्छा तीव्र झाली. प्रभाशंकरांच्या मुलीच्या विवाहप्रसंगी त्यांनी हात खूपच सैल केला होता. याचे एक कारण असे की त्यांच्या छोटया छोटया अतृप्त आकांक्षा पूर्ण झाल्या होत्या पण ज्ञानशंकरांचा मूळ पिंड हा स्वार्थी व स्वार्थासाठी सर्व वैध-अवैध मार्गाचा अवलंब करणाऱ्या कुटिल कारस्थानी माणसाचा होता हे शेवटपर्यंत प्रेमचंद विसरत नाहीत. माणसे एकाच वेळी दयाळू, ममता दाखवणारी असतात व त्याच वेळी ती प्रचंड कठोर व हिंस्त्रही बनतात हे ही राय कमलानंद, गायत्री यांच्या माध्यमातून त्यांनी दाखविले.

पण प्रेमचंदांचा माणसाच्या चांगुलपणावर विश्वास होता. दृष्ट माणसेही क्षणभर सृष्ट बनतात, त्यांच्यातील निखळ माणुसकीवर येते हे ही त्यांनी दाखविले आहे. प्रेमशंकरने अमेरिकेहून यावे याचे वाईट वाटणाऱ्या ज्ञानशंकरांच्या मनात मधूनच बंधुप्रेमाचे गहिवर येत. प्रेमचंदांच्या दुष्कृत्ये करणाऱ्या माणसाना पश्चात्तापाचे आवेग येतात व त्यावेळी ती माणसे जे आत्मपरीक्षण करतात त्यात भरपूर आत्मक्लेश असतात, अपराधीपणाची बोचक जाणीव असते. पण हा अवेग

ओसरतो. उज्ज्वलतेचा क्षण चमकतो व नष्ट होतो. माणसाचा मूळ स्वभाव पुन: त्याचीं पकड घेतो असेही ते दाखवतात.

हे सर्व जमेस धरुनही प्रेमचंदांनी अनेकांची हृदयपरिवर्तने दाखवली आहेत. मात्र ज्यांचे परिवर्तन स्थायी दाखवले आहे त्या माणसांचा मूळ पिंड हा ही सत्प्रवृत्तीचा आहे असे त्यानी सुचवले आहे. म्हणजेच परिस्थितीच्या चक्रांत गुरफटून अप–प्रवृत्तीकडे खेचली जाणारी माणसे जीवनात पुन: कोणत्या ना कोणत्या निमित्ताने मूळ सत्प्रवृत्तीकडे परततात असा त्यांचा विश्वास दिसतो. ज्ञानशंकर पूर्ण बदलत नाहीत, निराश होऊन ते आत्महत्या करतात. गौसखॉंचा तर खूनच होतो, फैजुल्लाहखांचे मन बदलत नाही. पण राय कमलानंदांची विष प्रयोगानंतर शारीरिक शक्ती क्षीण झाल्यावर ते आध्यात्मिक मार्गांकडे वळले व त्यातच त्यांना जीवनाची सार्थकता आढळली. ज्ञानशंकरांच्या आलिंगनात बद्ध असताना सांपडलेल्या गायत्रीमध्ये आत्मग्लानीची तीव्र भावना उत्पन्न होते. त्या भावनेने तिचा जीवनाचा मार्ग बदलतो आणि अपराधाची टोंचणी असह्य होऊन ती शेवटी आत्महत्या करते. ज्वालासिंह मनाचा उमदा व विवेकवान मनुष्य होता सरकारी नोकरीत त्यांचा आत्मा व्यथित झालेला होता. ते नोकरी सोडून प्रेमशंकरांच्या ‘ रामराज्य ’ बनविण्याच्या प्रयोगात सामिल होतात व जीवनातला खरा आनंद त्यांना सापडतो. डॉ. ईफनिअली, डॉ. प्रियनाथ यांच्यासारखी विचारी व सुशिक्षित माणसे पैशाच्या व प्रतिष्ठेच्या मोहाने अस्खलित झालेली असतात पण प्रेमशंकरांच्या व्यक्तित्वामुळे त्यांचे हृदयपरिवर्तन होते. दयाशंकरसारखा भ्रष्ट पोलीस इन्स्पेक्टर आपल्या आसपासच्या माणसांना देवतुल्य वाटतो तो सुद्धा या सेवाभावी तरुणांत सामिल होतो.

प्रेमचंदांच्या ‘ प्रेमाश्रम ’चा उत्तरभाग या हृदयपरिवर्तनांनी भरून राहिला आहे. त्यांच्यातली आदर्शोन्मुखता त्यांच्या कलावंतावर काहींशी मात करते असे वाटत राहाते. त्यांनी वास्तवाला दिलेले आदर्शवादी वळसे प्रगल्भ वाचकाला खटकतात. प्रेमशंकरांचे प्रयोग इतके यशस्वी होतात की एक ‘ रामराज्य ’ निर्माण होते. शेतकरी चोरी करणे सोडतात, दारू पिणे सोडतात, जुगार खेळणे टाकतात. त्यांच्या जीवनात समाधानच येते असे नाही, थोडाफार पैसाही ते जमा करतात. कादीर मियाँ, बलराज सर्वच सुखी होतात. प्रेमचंदांचाही आदर्शोन्मुखता त्यांच्यातल्या प्रचंड माणुसकीचा आविष्कार आहे. तो तितका कलात्मक नसला तरी सुखावह वाटतो.

मात्र या आदर्शोन्मुखतेत प्रेमचंदांनी काही प्रसंग फार तोलामोलाने प्रस्तुत केले आहेत. दुखरन भगत शाळिग्राम भिरकावतो पण दिवस चांगले आल्यावर पुन-देवभक्त होतो. त्याच्या मोहभंगाचा प्रसंग प्रेमचंदांनी खूप ताकदीने चितारला आहे हे वर सांगितलेच आहे. तसाच दुसरा मोठा प्रसंग बिसेसर साहू यांच्या हृदय-परिवर्तनाचा आहे बिसेसर लखनपूर गावचा एक दुकानदार. पै पै पकडून ठेवणारा सरकारी नोकरशाहीच्या छळाला हाही बळी पडतो. पण त्याच्या मनांत विद्रोहाची भावना कधींच उत्पन्न होत नाही. दुसऱ्यांदा पोलीस विभागाच्या कारवाईत तो खेचला जातो. गौसखाँच्या हत्येच्या निमित्ताने पोलिसांना गांवातल्या प्रमुख शेतकऱ्यांना गोवायचे असते. बिसेसर साहू पोलिसांनी पढवून ठेवली तशी तशी साक्ष देतो त्याच्या साक्षीमुळे निरपराध लोकांना सजा होते. पण त्याला आपल्या करणीचा पश्चात्ताप होतो. मनांस खोलवर रुतलेले कर्मवादाचे संस्कार जागे झाले. त्याच्या समोर आत्महत्या केलेला मनोहर सारखा येऊ लागला, त्याची पत्नी आजारी पडली. मुले भुकेने व्याकुळ होऊ लागली. प्रेमशंकरांच्या पत्नीने श्रद्धाने त्याला उपदेश केला. श्रद्धा त्याला साक्षात देवी वाटली. त्याचे हृदयपरिवर्तन झाले. हा प्रसंगही प्रेमचंदानी कलात्मकतेने चित्रित केला आहे. हृदयपरिवर्तनाला भारतीय संस्कारांची बैठक दिली आहे.

प्रेमचंदांची पात्रे आत्मावलोकन करू लागली की जरूरीपेक्षा अधिक मुखर बनतात. पापांची जबाबदारी घेताना त्यांना सारासार विवेक राहात नाही असे वाटते. प्रेमचंदांचे निवेदन कौशल्य विलक्षण प्रभावपूर्ण आहे. कधी ते अतिरेकी वाटते. सरकारी यंत्रणेवर टीका करताना प्रेमचंद खूपच उत्साही बनतात. वकिलाचे डाव–प्रतिडाव वा युक्त्या–प्रयुक्त्या तर प्रेमचंदाचा एक आवडीचा खेळ असावा. ते मोठ्या तार्किक कौशल्याने युक्तिवाद करवून आणतात.

प्रेमचंदांचे एक नाजुक स्थळ म्हणजे मृत्यू ! त्यांच्या कादंबऱ्यांत मृत्यूच्या अनेक घटना घडतात. त्यांची अनेक पात्रे आत्महत्या करतात किंवा अपघाती मरणाने मरतात. या कादंबरीत शेतकरी वर्गाची अनेक पोरे मरताना दाखवली आहेत व ते स्वाभाविक वाटते. पण प्रभाशंकराचे दोन्ही मुलगे सिद्धी प्राप्त करण्याच्या नादाने तलवारीने स्वतःच मारून घेतात. हा प्रसंग काहीसा दूरारूढ वाटतो. ज्ञानशंकरांच्या पत्नीच्या मृत्यूचा प्रसंग त्यांनी फार जोरदार पार्श्वभूमी निर्माण करून चित्रित केला आहे पण गायत्रीचे शिखरावरून उडी घेऊन मरणे

किंवा ज्ञानशंकरचे गंगेत उडी घेऊन मरून जाणं तेवढेसे परिणामकारक वाटत नाही. त्यांच्या मृत्यूच्या पाठीमागे मानसिक व्यथेची विश्वसनीय वाटावी अशी पार्श्वभूमी त्यांनी निर्माण केली नाही. या दोघांच्या आत्महत्या तार्किक आहेत पण कलात्मक अपरिहार्यता त्यांना लाभलेली नाही.

प्रेमचंदाच्या प्रतिभेची शक्ती फार मोठी होती. याचे आणखी एक कारण या ठिकाणी नोंदवावेसे वाटते. एका बाजूला ते जनवादी व प्रतिबद्ध साहित्यकार होते तर दुसऱ्या बाजूला आपल्या प्रतिभेला काहीसे स्वायत्त व मुक्तही ते ठेऊ शकत होते. गंभीर जीवनानुभवाबरोबर विनोद व हास्य यांचा प्रवाह त्यांच्या साहित्यात वाहताना दिसतो, (मराठीमध्ये वा. म. जोशी यांच्या साहित्यात तो दिसतो.) काही प्रसंगांचा वर उल्लेख केला आहे. त्यांचे ' प्रभाशंकर ' हे पात्र या दृष्टीने उल्लेखनीय आहे. संयुक्त कुटुंबांसाठी सर्वस्वाचा त्याग करु शकणारा व आपल्या आप्तस्वकीयांवर प्राणापेक्षाही प्रेम करणारा हा वृद्ध गृहस्थ. याला चांगले चुंगले खाण्याची फार आवड. उत्तम पदार्थ करावेत व ते दुसऱ्यांना खाऊ घालावेत, स्वत: खावेत यात यांना फार आनंद, त्यांच्या या जिभेच्या चोचल्यांचे मोठे मजेदार वर्णन प्रेमचंदांनी केले आहे. हे एकूण पात्रच त्यांनी फार वेगळ्या पद्धतीने रंगविले आहे.

या कादंबरीत काही दोष असले तरी महान कलाकृतीचे अनेक विशेष यात आहेत. ' सेवासदन ' मोठी कादंबरी असली आणि हिंदीत युगप्रवर्तन करण्याचे श्रेय तिला मिळाले तरी प्रेमचंदांच्या कलाकाराचे श्रेष्ठत्व या कादंबरीत प्रथम प्रकर्षाने दिसते. तिचा आवाका, संमिश्रता, जीवनाच्या जटिलपणाची जाण आणून देण्याचे सामर्थ्य, बहु आयामीपणा, जीवनातल्या मर्मस्पर्शी प्रसंगांची निर्मिती, विराट बहुरंगी व बहुढंगी चरित्रे व छोटी मोठी इतर जिवंत पात्रे निर्माण करण्याची कला, समकालीन जीवनाचे नानाविध प्रवाह प्रस्तुत करून त्यावर भाष्य करण्याची कलात्मक दृष्टी, आणि मोठ्या कलाकाराकडून अपेक्षित असे 'व्हिजन' (Vision) देण्याचा प्रयत्न इत्यादी निकषांवर ही कलाकृती एक श्रेष्ठ कलाकृती ठरते.

० ० ०

## (२) रंगभूमी : महान शोकात्मक नाट्याचा आविष्कार

प्रेमचंदांच्या कादंबरी वाङ्मयात एक अमर ठरणारी बृहत्काय कलाकृती ' रंगभूमी ' १९२२ ऑक्टोबर ते १९२४ एप्रिल या कालावधीत लिहिली गेली.

प्रेमचंदांच्या लिखाणाचा काळ आणि प्रेरणा महत्वाच्या गोष्टी मानाव्या लागतात ते समकालीन जगात वावरणारे कलाकार असल्यामुळे त्यांच्या संवेदशील मनावर आसपासच्या वातावरणाचा आणि घटनांचा खूपच प्रभाव पडत असे. लेखन समकालीन दबावातून लिहिले जाते आणि त्यातील शाश्वतही वास्तवातून निर्माण होत असते असे मानणाऱ्यापैकी ते एक होते. 'रंगभूमी' एका अर्थाने राजकीय कादंबरी आहे. पण तिच्या राजकीय अंगावरच समीक्षकांनी इतका भर दिला आहे की तिचे मनोवैज्ञानिक दृष्टचा मोठेपण आणि प्रणयानुभवाचे त्यातील वैविध्य या गोष्टींकडे फारसे लक्ष दिले गेले नाही.

महात्मा गांधीना सहा वर्षांची कारावासाची शिक्षा झाली होती आणि स्वातंत्र्य आंदोलन जवळ जवळ थंड झाले होते. हिंदु-मुसलमानांच्या दंगलींना उत आला होता. कांग्रेसचे दोन गट निर्माण झाले होते—कौंसिलमध्ये प्रवेश करून आतून स्वातंत्र्यलढा लढवावा असे म्हणणारे फेरवादी व बहिष्काराचे तंत्रच चालू ठेवावे असे म्हणणारे ना फेरवादी. मोतीलाल नेहरू, चित्तरंजनदास इत्यादी नेत्यांमुळे फेरवाद्यांचे पारडे जड झाले होते आणि महात्मा गांधी लवकर सुटल्यावर त्यांची सहानुभूती मिळविण्यात फेरवाद्यांना यशही लाभले होते. निदान फेरवाद्यांना कौंसिलात प्रवेश करून लढा तीव्र करण्याचा प्रयोग प्रामाणिकपणे करू द्यावा असे गांधींचे मत होते. या सर्व घटनांकडे प्रेमचंद पहात होते. राजकीय लढा हा फार काळ चालणार आहे व त्यांचे स्वरुप गुंतागुंतीचे राहाणार आहे ही प्रेमचंदांची खात्री होती. त्याचप्रमाणे या लढ्यांत भाग घेणाऱ्या व्यक्ती व समुदाय वेगवेगळ्या कारणांनी सामील झाले होते त्यांत स्वार्थ साधण्याच्या दृष्टीने आलेले लोकही सामिल होते हे प्रेमचंदांना दिसत होते. गांधींच्या व्यक्तित्वाचा त्यांच्यावर प्रभाव होताच, त्यांच्या विचारांतही त्यांना खूपच स्वारस्य वाटत होते. त्यांच्या सत्याग्रही मार्गाबद्दल त्यांना प्रचंड कुतूहल होते. अंतिम दृष्टचा हा मार्ग भौतिक उपलब्धींच्या दृष्टीने कितपत यशस्वी होईल याची त्यांच्या मनांत शंका होती. पण यातून आत्मिक बळ वाढेल आणि त्याचा प्रभाव जनमानसावर पडेल याविषयी त्यांच्या मनांत शंका नव्हती. या परिस्थितीत जनतेच्या सुखदु:खांशी, आशा आकांक्षांशी आणि ध्येयधोरणाशी मनाने एकरुप झालेल्या प्रेमचंदांना जनतेचे तेज व आत्मबळ वाढवावे असे निश्चितच वाटत होते. फार काळ चालणाऱ्या लढ्यात कधी यश येईल तर कधी अपयश ही येईल हे त्यांना दिसत होते यशाने हरखून जाणे व अपयशाने

हतोत्साह होणे या दोन्ही गोष्टी स्वातंत्र्य लढ्याच्या दृष्टीने हानिकारक होत्या. अंतिम यशापयशाविषयी काहीसे उदासीन राहून एखाद्या खेळाडूप्रमाणे खेळण्यांत रस घ्यावा, इमानदारीने आपली खेळी करावी आणि आलेल्या यशापयशाचा खिलाडूपणे स्वीकार करावा अशा तऱ्हेचा संस्कार ते जनतेच्या मनावर ठसवू पहात होते. शेवटी जग हे ही एक क्रीडाक्षेत्र आहे. हरण्यात कमीपणा मानता कामा नये. बेइमानीपणाने खेळणे कमीपणाचे आहे. खेळताना रडू नये, जिकण्याची शर्थ करावी पण हरल्यास त्या पराजयाचाही तटस्थपणे स्वीकार करावा असे ' रंगभूमि' सांगते. शेवटी जग ही एक ' रंगभूमि ' आहे. प्रत्येक व्यक्तीला मिळालेली भूमिका त्याने पार पाडण्याचा प्रयत्न करावा आणि पडद्याआड व्हावे असे ' रंगभूमि ' आवर्जून सांगते, मात्र हे सांगण्यासाठी वस्तुपाठ म्हणून ही कादंबरी लिहिली गेली नाही पात्रांच्या व्यवहारांतून आणि घटनांच्या परिणतीतून अगदी सहजपणे स्वाभाविकपणे हा जीवनाशय खुलत गेला आहे.

## जीवन–संघर्ष : जटिलता व व्यापकता :

प्रेमचंदांची प्रखर नजर समाजातल्या निरनिराळ्या प्रकारच्या शोषणाच्या तंत्रावर पक्की बसलेली होती. ' रंगभूमि ' च्या अगदी सुरवातीच्या या ओळी पहा. 'शहर श्रीमंतांच्या राहाण्याची आणि खरेदी विक्रीची जागा आहे. त्याच्या बाहेरची भूमी त्यांच्या मनोरंजनाची आणि आमोदप्रमोदाची जागा. त्यांच्या मध्यभागी त्यांच्या मुलांच्या पाठशाळा आणि त्यांचे फिर्यादीचे आखाडे. इथे न्यायाच्या रुपाने गरिबांचे गळे कापले जातात. शहराच्या जवळपास गरिबांच्या वस्त्या असतात, संबंध कादंबरीत शहर आणि गाव याचे शोषक--शोषण संबंध दाखवलेले आहेत खेड्यातल्या सूरदास नावाच्या आंधळ्याची वंशपरंपरागत जमीन उद्योगपती जॉन सेवक या उद्योगपतीला आवडते आणि ते तिच्यावर कब्जा करतात. सूरदास ही जमीन आपल्या पूर्वजांची एकमात्र निशाणी म्हणून विकू इच्छित नाही. तिथे एखादे देऊळ व विहीर बांधावी ही त्याची इच्छा. आपण मेल्यावर आपले नाव कुणी घ्यावे या अपेक्षेने तो भीक मागून मिळवलेली पैन पै या कामासाठी जमवून. ठेवत असतो. या जमिनीवर सध्या गावची गुरेढोरे चरतात. सूरदासचा धंदा भीक मागण्याचा: एक आंधळा, काहीसा कुरूप भिकारी आणि देशी उद्योगांचा विकास करण्याचे कंकण बांधले जॉन सेवक यांच्यातला हा लढा सर्व कादंबरीत रस्सीखेचीच्या

खळाप्रमाणे दाखवलेला आहे. खरेतर हा लढा दोन व्यक्तीतला नसून दोन संस्कृती-तला लढा आहे. सूरदास भारतीय परंपरागत मूल्यांना जपणारा, कृषि-संस्कृतीचा समर्थक आहे. त्याचे दैन्य व दारिद्र्य, अशिक्षितपणा व खेडवळपणा या सर्व गोष्टीचे पूर्ण कलात्मक भान राखून प्रेमचंदानी त्याला प्रतीकात्मक रूप दिले आहे. भारतातील संस्कृती मौखिक परंपरेने समाजातल्या खालच्या थरापर्यंत पोचलेली आहे हे निर्विवाद आहे. जॉन सेवक सूरदासच्या जमिनीवर सिगरेटचा कारखाना खोलू पहातात. सिगारेटचा कारखाना भांडवलदारी अर्थ व्यवस्थेतील अनैतिक उद्योग विकासाचे चणू प्रतीकच आहे. या कारखान्यामुळे मजूर वस्तो वाढणार. या मजुरांना गावाविषयी, गावच्या परंपराविषयी आपुलकी असणे शक्य नसते. स्वाभाविकपणे ते गावच्या स्त्रियांबरोबर अनादराने वागणार, त्यांची अब्रू घेणार, दारू पिणार व त्याचा परिणाम गावच्या मुलाबाळांवर होणार, सिगरेटच्या कारखान्याबरोबर तंबाखूचे उत्पादन करण्याचा प्रचार होणार, अन्नधान्याची जमीन तंबाखूसाठी वापरली जाणार, गावांतील काही माणसांचे उद्योग वाढले तरी त्यांच्या जीवनावर पैशाचा अनैतिक परिणाम होणार, गावची आपुलकी संपणार व धर्माविषयीचा आदर नष्ट होणार. सूरदासला आपल्या सहज बुद्धीने हे सर्व दिसत होते. जॉन सेवक सूरदासला साम, दाम, दंड, भेद कोणत्याही उपायाने जमीन विकायला भाग पाडू शकत नाहीत. तेव्हा ते आपल्या कुटिल नीतीने गांवकऱ्यांना कारखान्यापासून होणाऱ्या फायद्यांची रंगीत स्वप्ने दाखवतात व सूरदासच्या विरोधी उभे करण्यात यश मिळवतात. कारखान्यांच्या विकासात भारताचे भले आहे असे कुँवर भगतसिंगसारख्या संस्थानिकांना पटवून देतात व त्यांच्या मनातील राष्ट्रप्रेमाचा उपयोग करून त्यांच्या माथी कारखान्याचे शेअर्स मारतात. कारखान्याचे सुंदर चित्र रंगवून भरपूर फायदा असल्याचे सांगून अनेक श्रीमंताना आपल्या बाजूला ओढण्यात यश मिळवतात प्रसिद्धीच्या लोभाने सार्वजनिक काम करणाऱ्या महेंद्रकुमारांनाही तेही जमीन मिळवून देण्यात त्यांना मदत करण्यास भाग पाडतात. महेंद्रकुमार म्युनिसिपालटीचे अध्यक्ष बनतात. जिल्हाधिकारी क्लार्क यानाही ते सूरदासच्या विरुद्ध उभे करण्यात यश मिळवतात म्हणजे एका बाजूने सूरदाससारखा आंधळा लाचार भिकारी व त्याला मदत करणारी सोफिया, विनयसारखी काही मंडळी तर दुसऱ्या बाजूला गांवकरी, म्युनिसिपालटीचे अधिकारी, सरकारी नोकरशाही व श्रीमंत वर्ग !

यांच्यातला लढा भौतिकशक्तीच्या दृष्टीने एकतर्फी असला तरी सूरदासच्या आत्मिक शक्तीमुळे त्याला प्रचंड रूप येते. म्हणजे हा संघर्ष पुनः भौतिक शक्ती व आत्मिक शक्ती यांच्यातल्या द्वंद्वाचाही आहे. तसेच सूरदासच्या बाजूने सहानुभूतीने उभी राहाणारी जनता व जॉन सेवकांच्या बाजूने उभी राहणारी ब्रिटिश सरकारची सत्ता यांच्यातलाही हा लढा आहे. बौद्धिक कौशल्याने सूरदासचा व त्याच्या बाजूला असणाऱ्यांचा बुद्धिभेद करून त्याला शरण आणू पहाणारे बुद्धिजीवी लोक व आपल्या आत्म्याच्या व मनाच्या शक्तीवर विसंबून सत्याग्रही मार्गाने अहिंसक मार्गाने लढणारा सूरदास (व त्याच्याशी सहानुभूती ठेवणारी जनता) यांच्यातला हा लढा आहे. प्रेमचंदांनी एकाच वेळी संस्कृती जीवनमूल्ये, वर्गीय भावना, राजकीय सत्ता, आत्मिक भौतिक संघर्ष इत्यादि अनेक गुंतागुंतीच्या धाग्यांनी हा संघर्षाचा गोफ विणला आहे. इतका प्रचंड आशय केंद्रित करताना त्यात कुठेही अस्वाभाविकता, अविश्वासनीयता किंवा अकलात्मकता येऊ दिलेली नाही हे महत्वाचे आहे.

## राष्ट्रीय संघर्षाचे वास्तव :

'रंगभूमि' ही एक राजकीय कादंबरी आहे. भारतीय स्वाधीनतेच्या लढयात ब्रिटिश सत्तेचा विरोध अधिकाधिक तीव्र व जनाभिमुख होत गेला. डॉ. गांगुली कौंसिलचे राजकारण करणारे देशभक्त. त्यांच्या प्रभावाने संस्थानिक कुंवर भरतसिंह यांची पत्नी जान्हवी हिच्या मनात राष्ट्रभक्तीची भावना उत्पन्न होते. मूळचे रजपूत संस्कारात वाढलेले मन राष्ट्रीय कार्यासाठी बलिदान करण्याची आकांक्षा तिच्या मनांत उत्पन्न होते. राष्ट्रीय भावनेच्या प्रेरणेने भारतीय स्त्रीचे व्यक्तित्व कसे प्रगतिशील होत होते याचे दिग्दर्शन प्रेमचंदांनी जान्हवीच्या रुपाने केले आहे. जान्हवी आपल्या मुलावर राष्ट्रप्रेमाचे संस्कार करते. ऐश्वर्यात जन्म झाला असताना सुद्धा विनयला साधेपणाचे व्रत अंगिकारावे लागते. पुढे सोफिया म्हणते त्याचप्रमाणे जान्हवीने जणू राष्ट्रकार्यात द्यावयाचा बळी म्हणूनच विनयला वाढवलेले असते. विचित्र गोष्ट अशी की विनयच्या मूळ वृत्ती काहीशा बापासारख्या असतात. विनयचा बाप विलासी व सुखभोगेच्छू होता. विनयच्या साध्या आणि खडतर जीवनक्रमामुळे त्यांनीही साधेपणाने राहायला सुरवात केली होती. विनय व विनयचे वडील कुंवरभरतसिंह यांच्यावरून अनेक समीक्षकांनी विनयला जवाहरलाल नेहरू व वडिलांना मोतीलाल नेहरू मानले आहे.

पण ते तितकेसे बरोबर वाटत नाही. जान्हवीची मुलगी इंदू हिचा विवाह महेंद्रकुमार यांच्याशी झाला होता. जान्हवी राष्ट्रीय कार्यात पुरुषांबरोबर भाग घेऊ इच्छिणारी असली तरी पती हाच देव मानण्याचा जुना संस्कार तिच्या मनात पक्का रुजलेला होता. पुढे इंदू सूरदासला आर्थिक मदत करते, जनतेच्या लढ्यात फंडाला पैसे देते. महेंद्रकुमारांच्या मनाविरुद्ध वागते व घराबाहेरही पडते. अर्थात जान्हवीला तिचे हे करणे पटत नाही. पण जान्हवीच्या पुढच्या पिढीत वैवाहिक बंधने तोडणारी स्त्री निर्माण होत होती. स्त्रीच्या व्यक्तित्व विकासाचा हा दुसरा टप्पा होता.

याच सुमारास राष्ट्रीय सेवादलाची स्थापना झाली. ' रगभूमि 'मध्ये कुंवर भरतसिंह व डॉ. गांगुली यांनी एक युवकांची संघटना स्थापन केली. या सेवकांना राष्ट्रकार्याचे सर्वांगिण शिक्षण दिले जाई. विनय या संघटनेचे नेतृत्व करीत होता. पुढे जॉन सेवक यांचा मुलगा प्रभु सेवेकही नेतृत्व करू लागला. त्याच्या नेतृत्वाखाली संघटना अधिक उग्र होऊ लागली तेव्हा मवाळपंथी कुंवर भरतसिंह व डॉ. गांगुली यांचे धाबे दणाणले. विनयवरच्या सरकारी रोषामुळे भरतसिंह यानी आपली रियासत कोर्टाकडे सोपविली. पुढे डॉ. गांगुली यांना कौंसिलमधल्या कार्याबद्दल भ्रमनिरास झाला हे प्रेमचंदांनी दाखवून दिले आहे.

यावेळी राजकीय प्रवाहात जी अनेक प्रकारची मंडळी आली त्याचे खरे स्वरुप प्रेमचंदांनी दाखवून दिले आहे. हिंदुस्थानच्या आर्थिक विकासासाठीं उद्योग वाढविणारे व त्याच्या आड येणाऱ्या ब्रिटिशांना विरोध करणारे भारतीय उद्योगपती राष्ट्रभक्तीच्या त्यागमय भूमिकेतून'आले नव्हते. ते स्वार्थापोटीच आले होते याचे जॉन सेवकच्या रुपाने प्रेमचंदांनी मोठे मार्मिक चित्रण केलें आहे. ब्रिटिशांच्या कृपेवर जगणारे आत्माभिमानशून्य संस्थानिक आणि स्वार्थासाठी ब्रिटिशांची सर्वप्रकारे लाचारी करून तसेच जनतेचे शोषण व तिच्यावर अन्याय करून संपत्ती गोळा करू असे निर्लज्जपणे सांगणारे संस्थानिकांचे दिवाण यांचेही खरेखुरे चित्र प्रेमचंदांनी रंगविले आहे.

या संस्थानिकांच्या जुलमांना तोंड देण्यासाठी घातपाती मार्गाचा अवलंब करणाऱ्या संघटनांचाही प्रेमचंदांनी विस्तृत उल्लेख केला आहे.

इंग्रज नोकरशाहीचे रुप मिस्टर क्लार्क यांच्यारुपाने स्पष्ट केले आहे.

मिस्टर क्लार्क जॉन सेवकच्या मुलींवर–सोफियावर प्रेम करतात. एका क्षणी तिच्या संपूर्णपणे नादी लागून सूरदासची जमीन जॉन सेवकांना देण्याचा निर्णय फिरवतात पण त्याचे खरेखुरे अंतरंग साम्राज्यशाहीचे कोणत्याही प्रकारे व कोणतीही किंमत देऊन रक्षण करणाऱ्याचे असते. म्हणूनच ते सोफियाचे अंतरंग कळल्यावर तिच्याविषयी फार कठोर धोरण स्वीकारतात.

भारतीय स्वातंत्र्य लढ्यात काही इंद्रदत्तासारखे तरुण आंतरिक उर्मीने सामिल झालेले असतात. प्रभुसेवकसारखे सुखप्रिय व कलावादी तरुण कीर्तीच्या लालसेने काही काळपर्यंत येतात व पुढे तिथून दूर होतात. त्यांची सहानुभूती बौद्धिक असते, आर्थिक थोडीफार मदतही ते करतात पण प्रत्यक्ष सातत्याने कृती करण्याचे सामर्थ्य त्यांच्यात नसते. विनयसारख्या तरुणांमध्ये बलिदानाची वृत्ती असली तरी त्यांची उच्चवर्गीय प्रवृत्ती त्यांच्यात ठाम जनताभिमुखता उत्पन्न करू शकत नाही. विनय एकूण संथानिकांच्या जेलमधून मुक्त होण्याचे नाकारतो तर दुसऱ्या प्रसंगी जेव्हा जनता सोफियावर दगडफेक करते तेव्हा त्या जनतेवर पिस्तुल रोखायला मागेपुढे पाहात नाही. उच्चवर्गात जन्मलेल्या सुखासीन बापाच्या मुलामध्ये खरीखुरी जनाभिमुखता निर्माण होणे अशक्यच नसले तरी कठीण असते. याच वेळी जनवादाच्या नावाखाली शाब्दिक लढाया लढणाऱ्या उच्चवर्गीयांच्या तथा-कथित जन-प्रेमाचा दुटप्पीपणाही प्रेमचंद दाखवतात.

सूरदासची जमीन बळकावू पहाणारे जॉन सेवक, त्यास मदत करणारे श्रीमंत व संस्थानिक, ब्रिटिश अधिकारी या सर्वांविरुद्ध सूरदास उभा राहतो. सूरदासचा लढा सत्याग्रही व अहिंसक मार्गाने चालणारा लढा आहे. सर्व संघर्षात 'सत्याग्रह' हा शब्द कुठेही नाही. पण भारतीय परंपरातून सूरदासला प्राप्त झालेली मूल्ये व गांधींची मूल्ये यात फरक नव्हताच. सत्याबद्दलचा आग्रह, अन्याया-बद्दलची चीड, निःस्वार्थी सेवाभाव. भौतिक जीवनातील उपलब्धींबद्दल वाटणारी उदासीनता, आत्मिक आनंदासाठी भौतिक सुखांचा त्याग करण्याची सहर्ष तयारी या सर्व गोष्टी सूरदासमध्ये आहेत. प्रेमचंदजींचे कलात्मक वैशिष्ट्य हे की कुठेही सूरदास गांधीवादाचा मुखवटा लावून वावरतो आहे असे वाटत नाही. तो स्वभावाशी एकनिष्ठ आहे. या सत्याग्रहात सूरदासची जमीन जाते, तिचा मिळालेला मोबदला तो सार्वजनिक कार्यासाठी देऊन टाकतो. गांवकऱ्यांच्या

झोपड्या पाडून त्या ठिकाणी मजुरांसाठी चाळी बांधण्याची योजना आखली जाते. अक्षरशः गावकऱ्यांना फसविले जाते, नागवले जाते. या प्रसंगाचे मोठे प्रत्ययकारी चित्र प्रेमचंदांनी चितारले आहे. सूरदासविषयी अढी बाळगणारे सर्व गावकरी या प्रसंगी सूरदासची विनवणी करून त्याला मार्ग काढायला सांगतात. सूरदास कुणाही अधिकाऱ्याला भेटायला नकार देतो. पण आपली झोपडी आपण जिवंत असेपर्यंत सोडणार नाही असे तो सांगतो झोपडी उडवून देण्यासाठी पोलीस तयार असतात. सूरदासच्या बाजूने जनता सरकार विरोधी उभी राहाते. शेवटी गोळीबार होतो. याचवेळी पोलिसांच्या एका सशस्त्र तुकडीचा अधिकारी निरापराध लोकांवर गोळ्या झाडण्याचे नाकारतो (ही अतिशय रोमहर्षक घटना प्रेमचंद रंगवितात व पुढे प्रत्यक्ष राष्ट्रीय आंदोलनात अशीच घटना घडते– द्रष्टयाने ही आधीच पाहिलेली असते.) जनता क्रुद्ध होते. संयम सोडून पोलिसांशी सामना करायला सिद्ध होते. सूरदास खांद्यावर घ्यायला भैरीला सांगतो. त्याला जनतेला हिंसक मार्गांपासून परावृत्त करायचे असते. मिस्टर क्लार्क अन्यायाला कारण असणाऱ्या सूरदासवर गोळी झाडतो. सूरदास घायाळ होतो. सूरदासची झोपडी वाचत नाही. पण त्याच्या बलिदानाचा प्रचंड परिणाम जनतेवर व त्याच्या विरोधकावर होतो. हॉस्पिटलमध्ये जॉन सेवक, महेंद्र, क्लार्क सर्वच येऊन सूरदासची क्षमा मागतात. हा सर्वच प्रसंग प्रेमचंदांनी इतक्या कलात्मक तोलाने लिहिला आहे की जागतिक श्रेष्ठ वाङ्मयाच्या श्रेणीत हा विराट प्रसंग सहजपणे शोभून जावा. सूरदासच्या सत्याग्रही लढ्यामुळे त्याच्या शत्रूंची मने बदलतात. पण लेखकाला या हृदयपरिवर्तनाचे खरे स्वरुप निश्चितपणे ठाऊक असते. सूरदासला मोठेपणा देणारे जॉन सेवक आपले उद्योग वाढविण्याचे कार्य अविराम चालू ठेवतात. महेंद्रकुमार तर सूरदासचा जनतेने उभारलेला पुतळाच रात्री तोडून टाकतात व त्याच्याखाली चेंगरून मरतात. प्रतिष्ठा व कीर्ती यांना हपापलेल्या महेंद्रकुमारांना सूरदाससारख्या भिकाऱ्याचा सन्मान तर कधीच मिळाला नाही पण त्यांच्या अप्रतिष्ठेला कारण सूरदास झालेला असतो, त्याच्या पुतळ्यासाठी त्यांची पत्नी त्यांना न विचारता वर्गणी देते व त्याचा परिणाम भांडणात होऊन ती घर सोडून जाते ( यांच्यातील वैवाहिक विषमतेचे आरंभापासूनच चित्रण झाले आहे.) महेंद्रकुमार पुतळा तोडताना स्वतःच मरतात. भरतकुमार पुनः सुखविलासी जीवन जगू लागतात. फक्त

जान्हवी. इंदु आणि गांगुली राष्ट्रीय कार्यास अधिक जोमदारपणे प्रारंभ करतात. या सर्वांचा अर्थ असा की सूरदासच्या सत्याग्रहाला भौतिक दृष्ट्या फारसे यश लाभले नाही. महात्मा गांधींच्या प्रभावात राहूनही लेखक प्रेमचंदांनी सत्याग्रहाकडे किंवा गांधीवादी मार्गाकडे राष्ट्रीय समस्यांची गुरूकिल्ली म्हणून पाहिले नाही. त्याचा जनतेच्या मनात अस्मिता उत्पन्न करण्याकडे जो उपयोग झाला तो त्यांनी दाखवला. वैयक्तिक दृष्ट्या सूरदासला आपले जीवन कृतार्थ झाल्याचा उदात्त अनुभव मिळाला. एकूण प्रेमचंदांनी समकालीन राजकीय वातावरणाचे वास्तव प्रस्तुत करताना कलाकाराची अतिक्रमण करणारी सृजनशील दृष्टीच दाखवली.

## कुटुंबचित्रे :

या ५५० पृष्ठांच्या प्रचंड कादंबरीत प्रेमचंदांनी राजकीय वास्तवाबरोबर भारतीय कुटुंब जीवनाचे वास्तवही साक्षेपाने चित्रित केले आहे.

भारतीय कुटुंब व्यवस्था अनेक प्रकारच्या बाह्य व आंतरीक आघातानी विघटित होताना प्रेमचंद दाखवतात. कुंवर भरतसिंह व पत्नी जान्हवी यांच्या स्वभावांत व प्रवृत्तीत मूलतः फरक होता. पण जान्हवीवर रजपूत संस्कारांचा प्रभाव असल्यामुळे कुटुंब विघटित होत नाही. इंदूचा विवाह ही तिच्या स्वभावाशी विसंगत महेंद्रकुमारांशी झाला. पण ती आपल्या पतीचे घर सोडण्याचे धैर्य दाखवते. माता जान्हवीचा प्रचंड विरोध सहन करूनही ती पतीला सोडून देते. या हिंदू कुटुंबाबरोबर जॉन सेवक, मिसेस सेवक यांचे ख्रिश्चन कुटुंबही आहे. मिसेस सेवक अत्यंत धर्मवेडया व असहिष्णु तर जॉन सेवकांना धर्म ही फक्त प्रदर्शनाची बाब वा उपयोग करण्याची बाब वाटते. कुटुंबात सोफियाच्या धर्म-जिज्ञासेमुळे खूपच स्फोटक परिस्थिती उत्पन्न होते. बायबल व येशू यांच्यावर आंधळी भक्ती दाखवणे सोफियाला जमत नाही. तिच्या धार्मिक प्रश्नांना मिसेस सेवकांकडे त्रागा करण्यापलीकडे उत्तरे नसतात. तिचा भाऊ प्रभुसेवक हाही आईच्या असहिष्णुपणाला व वडिलांच्या सौदेबाज स्वभावाला कंटाळलेला असतो. एकूण या घरात आर्थिक विवंचना नसूनही असंतोष असतो व अनेक वेळा सोफियाच्या स्वतंत्र व्यक्तिमत्वामुळे स्फोटक प्रसंग उद्भवतात. या कादंबरीत ताहिर अल्ली नावाच्या मुसलमान व्यक्तीचे व त्याच्या कुटुंबाचे मोठे मार्मिक

आणि करुण गंभीर चित्रण केले गेले आहे. ताहिर अली अल्लाधरचा सुस्वभावी माणूस. आपल्या सावत्र भावाला शिकविण्यासाठी सर्व प्रकारचे हाल सहन करतो. आपल्या बायकोचे व मुलाचेही हाल होताना निमूटपणे पहातो. पण त्याच्या रक्तावर पोसलेला त्याचा सावत्र भाऊ आणि त्याच्या सावत्र आया ज्या कृतघ्न-पणे त्याच्याशी वागतात त्याचे हृदयद्रावी चित्र या कलाकृतीत रेखाटले आहे. या कुटुंबातल्या वेगवेगळ्या माणसांचे जे नमुने प्रेमचंदांनी प्रस्तुत केलेले आहेत ते मोठे मर्मस्पर्शी आहेत. भावावर सर्व प्रकारे माया करणारे आहिर अली, त्यांची निष्ठावान, सोशिक पत्नी, त्यांची निरागस मुले व ताहिरअलींना फसविणाऱ्या त्यांच्या कजाग व लुच्च्या सावत्र आया, त्यांचा कृतघ्न भाऊ आहिर अल्ली. या सर्वांचे चित्रण करताना प्रेमचंदांनी मानवी मनाची वेगवेगळी रुपेच प्रस्तुत केली आहेत. ताहिर अलींना चांभार ज्या तऱ्हेने मदत करतात व त्यांच्या हातून घडलेल्या अपराधांवर पांघरुण घालण्याचा प्रयत्न करतात ते पाहिले की मानवतेचा उदंड प्रवाह अभावग्रस्तांच्या मनांत कसा खळाळून वहात असतो याची प्रचीती येते. (स्वतःची झोपडी जाळणाऱ्या व पैसा पैसा शिल्लक टाकून पांचशे रुपये जमा करून ठेवलेली थैली, चोरून पळविणाऱ्या भैरोची झोपडी जाळली गेल्यावर त्याची झोपडी प्रथम बांधावी असा आग्रह धरणारा व आपल्यासाठी जनतेने जमविलेले पैसे त्याला देणारा सूरदास हाही जातीने चांभारच होता.)

या कादंबरीत आणखीही काही कुटुंबे आहेत. गावात बजरंगी गवळ्याचे कुटुंब आहे ताडी विकणाऱ्या पारशी जातीच्या भैरोचे कुटुंब आहे. या कुटुंबातील अनेक प्रकारचे संबंध प्रेमचंदांनी चित्रित केले आहेत.

## प्रणयाचे कारंजे :

प्रेमचंदांना प्रणयाचे चित्रण करता येत नाही असा एक आरोप आहे. वस्तुतः त्यांच्या सामाजिक–राजकीय समस्यात्मक चित्रणाचा एवढा प्रभाव पडला की त्यांनी आपल्या वाङ्मयात काढलेल्या विवध प्रणय रुपाकडे लक्षच दिले गेले नाही.

' रंगभूमि 'मध्ये विनय आणि सोफिया यांच्या प्रणयाचा मोठा चित्ताकर्षक आणि वास्तव असा पट त्यानी चित्रित्त केला आहे. या दोन्ही तरुण स्त्री-पुरुषांना एकमेकाविषयी विलक्षण आकर्षण वाटू लागते. हे आकर्षण काहीसे प्रथमदर्शनी

प्रेमासारखे आहे. या प्रेमाचे रंग अधिक गडद करण्याचे कार्य विनयसंबंधी कौतुकाचे उद्‌गार वारंवार काढणाऱ्या त्याच्या आईने अजाणता केले तर सोफियासंबंधी स्वतः प्रेमचंदांनीच लिहिले आहे, ' मिस सोफिया मोठ्या मोठ्या रसपूर्ण डोळ्यांची लज्जाशील युवती होती. देह अति कोमल जणू पंचभूतांच्या ऐवजी पुष्पांनीच तिची निर्मिती केली असावी. रुप अतिशय सौम्य, जणू लज्जा आणि विनय साकार झाले आहेत. डोक्यापासून पायापर्यंत चैतन्यच होते, जडाचा कुठे आभास होत नव्हता. ' अशा सुंदर व सुकोमल सोफियाविषयी ध्येयवादी, उदात्त विचारांच्या विनयला आकर्षण वाटावे हे अगदी स्वाभाविक होते. त्याची बहीण त्याला बजावते, ' तू स्वतःचीच मोठी वंचना करीत आहेस. जितका तू स्वतःला समजतोस त्यापेक्षा खोलवर पाण्यात तू बुडाला आहेस. तुझं पुष्कळ दिवस घरी न येणं, सेवा समितीच्या कामात स्वतःला गुंतवून घेण, मिस सोफिया-कडे डोळे वर करून न बघणं, तिच्या सावलीपासून दूर पळून जाणं या मार्गांनी तुझ्या हृदयात चाललेल्या त्या विकराळ रुप घेतलेल्या अंतर्द्वंद्वाला लपवणं तुला शक्य आहे असं का तुला वाटतं ? पण ध्यानांत ठेव. या द्वंद्वांचा एक झंकार सुद्धा ऐकायला येता कामा नये. नाहीतर अनर्थ होईल. इंदू दोघांच्या प्रबळ आकर्षणाचे स्वरुप ओळखते एवढेच नव्हे तर या दोघांनी मनावर संयम न केला तर अनर्थ होईल. असा इषाराही देते. सोफिया ख्रिस्ती असते व विनय हिंदू. धार्मिक अडथळा तर असतोस पण लग्न, सुखोपभोग इत्यादी गोष्टींसाठी विनयाचे अस्तित्व नसून राष्ट्रकार्यासाठी समर्पित व्यक्तित्व आहे. या दृष्टीनं जान्हवीने लहानपणापासून त्याला वाढविले आहे. पुढे त्या दोघांतले आकर्षण कसे सर्व बंधनाना झुगारून देत वाढते याचे चित्रण प्रेमचंद करतात. या प्रणयाचा शेवट दुःखद होणारा आहे अशी जाणीव त्या दोघानांच नव्हे तर वाचकालाही होत असते प्रारंभी अशरीरी व केवळ आत्मिक वाटणारे प्रेम एकमेकांच्या दर्शनासाठी, सहवासासाठी, स्पर्शासाठी किती अनिवार झाले त्याचेही प्रेमचंद मोठे हृदयंगमय चित्र रेखाटतात.

विनय व सोफिया यांच्यात निर्माण झालेल्या प्रणयभावनेचा सुगावा जान्हवीला लागतो आणि त्यामुळे पूरपीडितांची सेवा करायला जाणाऱ्या दलाबरोबर जायचे विनय पुढे ढकलतो हे जाहनवीच्या लक्षात येते व ती त्याला कठोरपणे तिकडे जायला भाग पाडते. विनयवरील प्रेमामुळे सोफियाकडे पहाण्याच्या

जान्हवीच्या दृष्टीत कसा बदल होतो त्याचे सूक्ष्म चित्रण प्रेमचंदांनी केले आहे. पुढे विनयच्या पत्रासाठी आसुसलेल्या सोफियाची मन:स्थिती मोठी विचित्र होते. एकीकडे ती जान्हवीला विनयबरोबर सर्व प्रेमसंबंध संपविण्याचे वचन देते तर दुसरीकडे प्रबल आकर्षणाने त्याची पत्रे चोरून आणून वाचण्याचा प्रयत्नही करते. सोफियाच्या या संमिश्र व अतिशय जटिल मनोवृत्तीचे प्रभावी चित्रण प्रेमचंद करतात.

विनय संस्थानिकाच्या जेलमध्ये जातो. सोफिया विनयची मुक्तता करण्यासाठी जिल्हाधिकारी मिस्टर क्लार्कच्या आपल्यावरील प्रेमभावनेचा चाणाक्षपणे उपयोग करून घेते. मिस्टर क्लार्कबरोबर ती दौऱ्यावर जाते. त्याच्या प्रशासन कार्यात भाग घेते पण सर्वांच्या मुळाशी विनय विषयीचा प्रणयभाव असतो.

पण हा प्रणय केवळ आत्मिक नसला व त्याला शारीर बाजू असली तरी विनयच्या ध्येयवादी, सेवाभिमुख आणि त्यागी स्वभावावर सोफिया भाळलेली असते. जेव्हा विनय सोफियाविरुद्ध खवळलेल्या जनतेवर गोळीबार करायला प्रेरणा देतो आणि नंतर क्रांतिकारकानी पळवून नेलेल्या सोफियाला शोधण्यासाठी निरापराध जनतेवर अत्याचाराचे चक्र चालवतो तेव्हा त्याच्या या स्खलनाबद्दल सोफियाला घृणाही वाटते.

प्रचंड ओढ, आकर्षण, घृणा, राग, उदासीनता, निराशा, उद्वेग, विवशता, संयतता, स्वच्छंदता इत्यादी असंख्य भावनानी प्रेमचंदांनी हा प्रणय कारंजासारखा थुई थुई उडताना दाखवला आहे. पण कारंजाचा प्रत्येक थेंब क्षणार्धात खाली येतो त्याचप्रमाणे ह्या प्रणयाचा शेवट दु:खातच होतो.

सोफिया व विनय योगायोगाने ट्रेनमध्ये भेटतात आणि मधल्याच स्टेशनवर उतरून एका भिल्लांच्या वस्तीत आश्रय घेतात. सोफिया आपल्याला शरीरासह सर्वार्थाने प्राप्त व्हावी म्हणून विनय भिल्लीणीच्या सांगण्यावरून तंत्रमंत्रही करतो. ‘ रंगभूमि ’तल्या अनेक घटनांच्या मुळाशी हा प्रणयभाव असतो. विनय जनतेमध्ये अप्रिय होतो तो या सोफियावरील प्रेमाने, त्याने केलेल्या प्रमादामुळेच शेवटी जनतेच्या अप्रिय वाग्बाणांनी व्यथित झालेला विनय स्वत:च्या पिस्तुलाने स्वत:चा बळी देतो... आपण मरणाला भीत नाही हे दाखविण्यासाठी ! विनयच्या मृत्यूनंतर सोफियाही गंगा नदीत आपले जीवन समर्पित करते.

(विनय आणि सोफिया यांच्यातल्या प्रणयाचे स्वरूप इतके प्रगाढ होते की जान्हवी त्या दोघांचा विवाह करण्याचा निर्णय घेते. त्यांना कळून चुकते की ज्या मार्गासाठी विनयला त्यानी घडविलें होते तो मार्ग विनयचा नाहीच.)

प्रेमचंदानी प्रणयाचे हे घडविलेले दर्शन पाहिले तर प्रेमचंदांचे शक्ति स्थान चांगले लक्षांत येते.

प्रेमचंद गृहस्थधर्मी होते. प्रणयाचे शरीर पातळीवरचे अनुभव वा व्यापार त्यानी विचित्र केले नाहीत. गृहस्थ प्रणयाचे महत्त्व जाणतो पण लोकसमुदायापुढे त्याचे शारीर प्रदर्शन करीत नाही. तसाच प्रकार प्रेमचंदांच्या बाबतीत म्हणता येईल.

## मनोविश्लेषण :

प्रेमचंद मानवी जीवनाचे भाष्यकार होते तसेच माणसाच्या मनाचे मोठे जाणकार होते. प्रत्येक माणसाच्या मनाच्या गाभ्याशी जी प्रेरणा बलवत्तर असते व जी त्याच्या जीवनाचे संचालन सामान्यत: करीत असते ती पकडण्यात व तिचे सर्व व्यापी आविष्करण करण्यात प्रेमचंद कुशल होते. सूरदासची न्यायनिष्ठा आणि अन्यायाविरुद्ध यथाशक्ती झगडण्याची वृत्ती. विनयच्या ध्येयवादित्वाच्या मुळाशी लपलेली जित्यापासून मिळालेली सुखलिप्सा आणि प्रेमातुरता, सोफियाच्या अंतर्मनातील पावित्र्याची ओढ, इंदुमधला गर्वाला स्पर्श करणारा अभिमान जान्हवीची आत्मगौरवाची ओढ, मिसेस सेवकांची गौर–प्रभुच्या वर्गात जाण्याची आकांक्षा, मिस्टर सेवकांची प्रचंड उद्योगप्रियता, ईश्वर सेवकांची मतलबी धर्मनिष्ठा कुंवर भरतसिहांची सुखलोलुपता, महेंद्रकुमारची कीर्तीलिप्सा जवळ जवळ सर्वच चरित्रांच्या मनोभावातील प्रबळ भाव हेरून प्रेमचंद पात्राचे चित्रण करतात. अर्थातच मानवी मनाच्या तळाशी काम वा अधिकार वा क्षतिपूर्तीची आकांक्षा एवढ्याच प्रेरणा असतात. असे ते मानीत नाहीत, त्याचप्रमाणे मानवी मनावर भोवतालची परिस्थिती (आर्थिक स्थिती विशेष महत्त्वाची) व त्याचे संस्कार यांचा प्रभावही ते दुर्लक्षित करीत नाहीत. त्यांच्या सर्वच पात्रांच्या मनोभावांत प्रत्येकाच्या काही स्थायी वृत्ती व त्यांचा परिस्थितीशी चाललेली कमी अधिक उत्कट संघर्ष दिसतो.

या ठिकाणी काही अगदी नेमकीच उदाहरणे देणे शक्य आहे.

सूरदास भैरोच्या पत्नीला सुभागीला आश्रय देतो. सुभागीला भैरो मारपटी करतो म्हणून ती पळून येते. आश्रयहीन स्त्री कुठे जाणार ? तिच्या अब्रूचे रक्षण कसे होणार ? या हेतूनेच सूरदास तिला झोपडीत घेतो. बाईचा स्पर्श घराला झाल्यावर सूरदासच्या चंद्रमौळी झोपड्याला एक वेगळीच तकाकी येते. सुभागी त्याच्यासाठी भाकऱ्या भाजते, त्याच्या स्नानासाठी, हातपाय धुण्यासाठी पाणी देते, त्याला भीक मागण्यासाठी रस्त्यावर सोडून येते, सूरदास सुखावतो. क्षणभर त्याच्या मनात विचार येतो की सुभागीला पत्नी म्हणून ठेऊन घ्यायला काय हरकत आहे ? पण सुभागीची काहीशी स्त्री–वृत्ती जोर धरते. ती मिठुवाला त्याच्या आळशी-पणाबद्दल रागावते, त्याने काम करून पोटाला आणावे असे सांगते. मिठुवा तिच्यावर रागावतो. यातून घरात संघर्ष निर्माण होतो. सूरदासला वाटते सांसारिक सुखा-बरोबर ही कटकटही आहेच. क्षणभर आलेला विचार नाहीसा होऊन जातो. या छोट्याशा प्रसंगात प्रेमचंदांनी सुभागी, मिठुवा, सूरदास, व त्याचे परस्पर संबंध यांचे जे गुंतागुंतीचे भावनात्मक जाळे रचले आहे ते मोठे रमणीय आहे !

सूरदासची थट्टा सगळे करतात. त्याला कुस्ती खेळायला सांगतात. पाच रुपयांची पैजही लागते. सूरदास दिसायला दुबळा, हाडके वर आलेला. पण तो जगधरला पकडून खाली पाडतो. या प्रसंगाचे चित्रण करताना सूरदासबरोबर गावातल्या समूहमनाचे मोठे बहारदार चित्रण त्यानी केले आहे. सूरदासची सुभागीवरून थट्टा करतात. तेव्हा मात्र सूरदास रडतो. आपल्यावर व सुभागीवर विनाकारण लावलेला कलंक त्याला सहन होत नाही. भैरो सूरदासची झोपडी मत्सराने जाळतो. सूरदासला झोपडी जळल्याचे दुःख नसते. सुभागी कुठे जाईल याचे दुःख असतें. आपल्या आंधळेपणावर तो प्रथम चिडतो मग स्वतःची कीव येऊन रडू लागतो. इतक्यात घिसू मिठुवा चिडवताना म्हणतो– 'खेळात रडतोस ?' या वाक्याचा प्रचंड परिणाम सूरदासच्या मनावर होतो आणि तो हजार वेळा उध्वस्त केलेली झोपडी हजार वेळा बांधण्याचा मनसूबा मिठुआला सांगून त्याच्याही मनात हिम्मत उत्पन्न करतो. मानवी मनाचे सूक्ष्म खेळ व विविधरंगी असंख्य छटा प्रेमचंदांनी दाखविल्या आहेत. खरेतर या छटा इतक्या असंख्य आहेत की त्यांची नुसती यादीच बनवली तर छोटीशी पुस्तिका व्हावी.

जान्हवी व मिसेस जॉन सेवक यांच्या भेटीचा अभिमान व मत्सर यानी युक्त प्रसंग, जॉन सेवकांची इतराचे स्वभाव ओळखून त्यांच्यावर तऱ्हेतऱ्हेने छाप

मारण्याची पद्धत, इंदू व सोफिया यांच्यातील प्रेम, ईर्ष्या व अभिमान यांनी गुंता-गुंतीचे केलेले संबंध, सूरदाससारख्या कुरुप आंधळ्या भिकाऱ्याकडे आपली पत्नी राहाते याचे भैरोला वाटणारे वैषम्य व सूड घेण्याची भावना, त्यातून निर्माण झालेली तात्पुरती रुग्ण मानसिकता, महेंद्रकुमारांची प्रतिष्ठेसाठी चाललेली केविल-वाणी धडपड, सेवक दलाचे नेतृत्व करताना प्रभुसेवकच्या मनांत यशामुळे आणि प्रशसेमुळे होणारी उन्मादक शिरशिरी, ईश्वरसेवकांच्या धर्मविषयक विचारांतला व स्वार्थातला दुटप्पीपणा व दांभिकपणा इत्यादी असंख्य गोष्टीत प्रेमचंदांनी मानवी मनाचे जे खेळ दाखविले आहेत ते त्यांची माणसाच्या मनाची जाण दाखवतातच पण ती जाण ज्या मार्मिक प्रसंगातूच त्यांनी व्यक्त केली आहे त्यात त्यांच्या कलात्मकतेची गुणवंताही केवढी मोठी आहे हे जाणवते.

## व्यक्तिचित्रे :

'रंगभूमी' मध्ये सुमारे शंभर पात्रे आहेत त्यांत शहरी पात्रे आहेत व गांवातील पात्रेही आहेत. शहरी पात्रांत श्रीमंत वर्गातील लोक आहेत, मध्यम वर्गातील व निम्नमध्यम वर्गातील माणसे आहेत. गांवातील वेगळ्या वेगळ्या जातीचे लोक आहेत. प्रेमचंदांनी जवळ जवळ सर्वच पात्राना त्यांच्या वैशिष्टयांसह इतका ठळक आकार दिला आहे की गावांतील जगधर, बजरंगीसारखी चरित्रे ही प्रत्यक्ष समोर उभी राहातात.

प्रेमचंदानी सूरदास, जॉन सेवक, विनय, सोफिया, महेंद्रकुमार यांच्या व्यक्ति रेखातर फारच प्रभावीपणे चितारल्या आहेत. नायकराम पांडे सारखे दुय्यम महत्वाचे पात्र ही फार जिवंत झाले आहे.

प्रेमचंदांनी सूरदासला एक सद्गुणी माणूस म्हणून उभे केले असले तरी त्याच्यातल्या काही दोषामुळे तो विलक्षण जिवंतपणे उभा राहातो. तो कुरुप असतो, हाडे वर आलेली असतात. मुले त्याची थट्टा उडवतात तेव्हा तो काही काळ सहन करतो पण नंतर चिडतो, आपल्या आंधळेपणामुळे यातना सहन कराव्या लागतात त्यामुळे तो कधी निराश होतो, रडतो. लोकांनी चारित्र्यावर घेतलेले आक्षेप सहन करणे त्याला कठीण जाते. स्वत:ला जमिनीचा उपयोग नसतो व जे तिचा उपयोग करीत आहेत ते सूरदासबद्दल उगाचच तेढ बाळगतात. तेव्हा ती जमीन विकून का टाकू नये असे विचारही त्याच्या मनात येतात. सूरदासचा गळा गोड असतो. त्यात अंतता

असते. त्याची जमीन कायदेशीरपणे कब्जांत घेतल्यावर म्हणजेच कायदेशीर-रीत्या त्याचा गळा कापल्यावर सूरदासपुढे एकच उपाय राहातो. तो आपल्या आर्त आवाजाने लोकांच्या समोर गाऱ्हाणे मांडतो. समाजात त्याच्यावर झालेल्या अन्यायाविरुद्ध असंतोष उत्पन्न होतो आणि समाजांतील प्रतिष्ठित धेंडांच्या कारवायामुळे त्यांची अप्रतिष्ठा होते. सुभागी व सूरदास यांच्यावर भैरो फिर्याद करतो. निकाल सूरदासच्या विरुद्ध लागतो. सूरदासला दंड केला जातो. निकाल ऐकल्यावर सूरदास जनता न्यायालयापुढे आपल्या करुण व आर्त आवाजाने आपले गाऱ्हाणे मांडतो, स्वतःची कैफियत सादर करतो. जनता त्याला निरपराध ठरवते. प्रसंग नाट्यमय आहे. प्रेमचंदांनी त्याला कुठेही नाटकी स्वरुप मात्र आणलेले नाही. त्याच्या दंडाची रक्कम जनताच जमवून देते मात्र जनतेवर आपल्या आत्मिक शक्तीचा प्रभाव टाकू शकणारा हा आंधळा त्याचा गैरवापर कुठेही कधीच करीत नाही. त्याची झोपडी वाचविण्याच्या प्रश्नावरुन जनता व पोलिस यांच्यात सामना होण्याची स्थिती येते. सूरदास तिथलाच एक मोठा दगड उचलून बजावतो की मी स्वतःच या दगडाने आपले डोके ठेचून प्राण देईन. त्याच्या या अनपेक्षित वागण्याने खवळलेली जनता शांत होते सूरदासमध्ये सोफियाला ‘ तत्वज्ञ ’ दिसतो खरे तर प्रेमचंदांनी मोठ्या कलात्मकतेने त्याच्यातला तत्वज्ञ उभा केला आहे. तो पढीक नसतो पण भारतीय परपरांचे बाळकडू घेऊन जीवन जगणारा विवेकी माणूस असतो. त्याच्यातली धार्मिक भावना इतकी विशाल असते की तेथे कोणत्याही संकुचितपणाला जागा नसते. सूरदास भौतिक दृष्टया पराजित होतो. इतका की त्याने मुलाप्रमाणे वाढवलेला त्याचा पुतण्या मिठुवा जखमी सूरदासला पहायलाही बरेच दिवस येत नाही. वंशपरंपरागत जमिनीचे मिळालेले पैसे दान केलें व झोपडीही शिल्लक ठेवली नाही म्हणून हाच मिठुवा त्याला दोष देतो. मेल्यानंतर त्याचे क्रियाकर्म ही करणे जमणार नाही असे स्वच्छ सांगतो. (सुभागीवर बलत्कार करणाऱ्या तरुणांमध्ये तो सामील असतो.) कारखाना जाळण्याची धमकी देतो (त्या आधी त्याने भैरोची झोपडी ताडी विकण्याचे दुकान– जाळलेली असतेच) तेव्हा मात्र सूरदास सर्व आपुलकी एका बाजूस ठेऊन मिठुवाबद्दल जॉन सेवकना सावधान राहण्यास सांगतो.

सूरदासचा शेवटचा प्रसंग तर प्रेमचंदांनी भव्योदात्त पातळीवर नेऊन रंगविला आहे. त्याचे सर्व विरोधक त्याची क्षमा मागतात. सूरदासच्या मनात कुणाबद्दल

आकस नसतो, किल्मिष नसते. मोठी माणसे आल्यावर तो त्यांना आदर देण्यासाठी जखमी अवस्थेतही उठू पाहातो. तोंडाला काळे फासून पळून जाण्याचा विचार बोलून दाखवणाऱ्या महेंद्रकुमारांना तो सांगतो. 'ना ना राजासाहेब, निराश होणे खेळगडयांच्या धर्माच्या विरुद्ध आहे. आज पराजय झाला तर पुढे कधी तरी विजय होईल.' जॉन सेवक त्याला म्हणतात, 'माझ्यामुळे तुझे फार नुकसान झाले. मला क्षमा कर.' त्यावर सूरदास म्हणतो, 'माझे कोणतेच अहित तुम्ही केले नाही. माझी तुमची दुश्मनी कुठे होती ? तुम्ही व मी समोरासमोर पाटीत खेळलो. तुम्ही जोर लावतात मी ही लावला. ज्याला जिकायचे होते तो जिंकला, हरायचे होते तो हरला. खेळगडयात वैर नसते. खेळताना रडण्यात मुलांना शरम वाटते. खेळात जखम होवो वा प्राणही जावो पण वैर-भाव येता कामा नये. माझी तुमच्याबद्दल काहीच तक्रार नाही.'

जॉन सेवक त्याला काही करण्यासारखे असेल तर विचारतात. तो ताहीर अलींना पुनः नोकरीवर ठेवण्याची विनंती करतो. अफरातफर करणाऱ्या माणसाला पुनः नोकरीवर ठेवणे जॉन सेवकांच्या तत्त्वाच्या विरुद्ध असते. पण ते त्याच्या कुटुंबाचे पालनपोषण करण्याची जबाबदारी स्वीकारतात--पुरी करतातही.

सूरदाससंबंधी स्वतः प्रेमचंदांची विस्तृत टिपणी आहे--त्याच्या मृत्यूनंतर केलेली. ही टिपणी वर्णनपर नाही-सर्व कलाकृतीत सूरदासचे जे चरित्र कलात्मक पातळीवरून त्यांनी चित्रित केले त्याचे हे निष्कर्षात्मक निरुपण.

'कुणी म्हणे तो सिद्ध होता, कोणी त्याला प्रेषित समजत. कुणाला तो देवता वाटे. पण खरोखर तो खेळगडी होता- असा खेळाडू की ज्याच्या माथ्यावर कधी आठी पडली नाही. त्याने कधी हिम्मत हारली नाही, पाऊल मागे घेतले नाही. जिंकला तेव्हा प्रसन्न राहिला. हरला तरीही प्रसन्न राहिला. हरला तरी जिंकणाऱ्याबद्दल मनात किल्मिष ठेवले नाही. जिंकला तर हरणाऱ्याविरुद्ध टाळ्या पिटल्या नाहीत. त्याने खेळात नेहमीच नीतीचे पालन केले, कधी खोटेपणा केला नाही. लपूनछपून विरोधकावर हल्ला केला नाही. भिकारी होता, अपंग व आंधळा होता, दीन होता. पोटभर खायला मिळाले नाही, शरीरावर वस्त्र मिळाले नाही पण त्याचे हृदय क्षमा, सत्य आणि साहस याचे अगाध भांडार होते. देहावर मांस नव्हते पण हृदयात विनयशील आणि सहानुभूती भरलेली होती.

'होय, तो साधू नव्हता, महात्मा नव्हता, देवता नव्हता वा फरिश्ताही नव्हता. एक क्षुद्र शक्ति हीन प्राणी होता, चिंता आणि अडचणींनी घेरलेला, त्याच्यात गुण होते तसे अवगुणही होते. गुण कमी होते अवगुण अधिक. क्रोध, लोभ, मोह, अहंकार हे सर्व दुर्गुण त्याच्या चरित्रात होतें, गुण एक होता पण त्या एका गुणाच्या संपर्काने जशी मिठाच्या खाणीतली प्रत्येक वस्तू खारट होते तसा प्रत्येक दुर्गुण देवगुण बनत असे. क्रोध सत्क्रोध होत असे, लोभ सदनुराग. मोह सदुत्साहाच्या रूपाने प्रगटत असे आणि अहंकार आत्माभिमानाच्या रूपाने ! आणि हा गुण कोणता होता ? न्याय, प्रेम, सत्य, भक्ति, परोपकार, दर्द वा कोणतेही नाव तुम्ही द्या. अन्याय पाहून त्याला राहावत नसे, अनीति त्याला असहाय्य व्हायची.

सूरदास प्रमाणेच जॉन सेवकाचे चरित्र चित्रणही मोठे कलात्मक आहे. ते बरेच संमिश्र व गुंतागुंतीचे आहे. त्यांच्याविषयी राग येणे शक्य आहे पण त्यांच्या भूमिकेतून पाहिले तर त्यांचे वर्तनही तसे चोख आहे. ही संमिश्र व्यक्तिरेखा संमिश्र प्रतिक्रिया उत्पन्न करते. ते भारतात निर्माण होऊ पहाणांऱ्या भांडवलदाराचे प्रतिनिधि आहेत. अहोरात्र त्यांचा विचार कारखाने खोलणे आणि संपत्ती वाढविणे यावर केंद्रित झालेला असतो. त्यांना धर्मात फारसे स्वारस्य वाटत नाही पण घरात शांती राहावी म्हणून वरकरणी धार्मिक बाबीत रस घेतल्याचे दाखवतात. मात्र यातून निर्माण होणाऱ्या संबंधाचा ते आपल्या कार्यासाठी जरूर उपयोग करून घेतात. ते एका बाजूने सरकारशी संबंध बिघडवू इच्छित नाहीत दुसऱ्या बाजूने श्रीमंत वर्गाशी हातमिळवणी करून असतात. त्यांचे मानवी स्वभावाचे ज्ञान विलक्षण भेदक असते व प्रत्येकाच्या मनात प्रवेश करण्यासाठी ते त्याच्या मर्मस्थानांचा उत्तम वेध घेत असतात. माणसाला विकत घेणे व आपला कार्यभाग साधून घेणे हे त्याचे मुख्य धोरण असते. पुढे ते पैसा मिळवण्याचे यंत्रच बनून जातात. वैयक्तिक सुख व दुःख पैशानेच मोजतात. विद्या व्यसनाप्रमाणेच धन कामना कधीच तृप्त होणारी नसते. पण या जॉन सेवकामध्ये सूरदासचे मोठेपण समजण्याची ताकद असतें, आपल्या बायकोचा मूर्खपणा समजण्याची कुवत असते. सोफियाचे मन त्यांनी जाणलेले असते.

प्रेमचंदांच्या इतर व्यक्तिरेखाचे वर्णन करण्याचे कारण नाही. पण प्रेमचंदानी या सर्व व्यक्तिरेखा इतक्या विश्वसनीयतेच्या व वास्तवाच्या पातळीवर रंगविल्या आहेत की त्यांची सर्व सृष्टी एक धडपडणाऱ्या माणसाची जिवंत सृष्टी वाटते.

### काही मर्यादा :

प्रेमचंदांच्या या विराट विश्वात रचनेच्या बांधेसूदपणाच्या दृष्टीने काही उणिवा राहिल्या आहेत. ताहेरअलीचे कुटुंब जितक्या चपखलपणे या विश्वात बसायला हवे तितके बसले नाही. विनया-सोफियांच्या प्रणय-कथेत कधी भावनांचे अतिरेकी निवेदन प्रदर्शनातल्या पातळीवर उतरते. प्रेमचंदांची पात्रे कधी खूप बोलतात असेही वाटते. विनयचे संस्थानिकाच्या जेलमधून बाहेर येणे काहीसे रोमांचकारी वाटते पण त्याचे सोफियाविरुद्ध जनतेच्या रोषाच्या वेळीच नेमके येणे व गोळी झाडणे काहीसे नाटकीपणाचे वाटते. नंतर संस्थानामध्ये त्याच्या जेलमधून बाहेर येण्यासंबंधी कसलीच चवकशी केली जात नाही याचेही आश्चर्य वाटते. पण हे सर्व बारीक सारीक दोष त्या जिवंत प्रवाहापुढे अगदीच सामान्य वाटतात. खरे तर रचनेच्या बांधेसूदपणाबद्दलचा जुना आग्रहही आता राहिला नाही. प्रश्न असंख्य घटना व चरित्रे जीवनाचा विशाल पट समृद्धपणे प्रस्तुत करतात की नाही हा आहे. आणि त्या दृष्टीने ही कादंबरी हिंदी व मराठी साहित्यात पहिल्या चार पाच कलाकृतीत नाव घ्यावे लागेल इतक्या तोलामोलाची वाटते.

० ० ०

## (३) कर्मभूमी : भारतीय जनमानसाचा चित्रात्मक आलेख

१६ एप्रिल १९३१ ला या कादंबरीचे लेखन सुरू लाले. ती १९३२ च्या ऑगस्टमध्ये प्रकाशित झाली.

या कादंबरीच्या आधी प्रेमचंदांनी 'निर्मला' ही छोटी कादंबरी लिहून प्रकाशित केली होती. ती मासिकातून क्रमशः प्रकाशित झाली होती व वाचकांना खूप आवडली होती. यानंतर 'गबन' कादंबरीही खूप लोकप्रिय झाली.

'कर्मभूमी' कादंबरीला लोकप्रियता तितकी लाभली नाही आणि समीक्षकांनीही फारसा गंभीरपणे तिचा विचार केला नाही. ज्यांनी विचार केला त्यांना 'कर्मभूमि'चे मर्म सापडले नाही असे म्हणावे लागेल. याचे कारण असे की प्रेमचंदांच्या साहित्याचा विचार करताना ते साहित्यकार सामाजिक दृष्टीने पहाणारे लेखक होते या पूर्वग्रहाचा काहीसा नको तितका भार वाचकांच्या व

समीक्षकांच्या मनावर पडलेला असतो असे दिसते. शिवाय कादंबरीचे नाव 'रंगभूमी' या चालीवर 'कर्मभूमी' असल्यामुळेही काहीसा वेगळा ग्रह होतो. प्रेमचंद माणसाच्या मनाला, त्याच्या संमिश्र चारित्र्याला, त्याच्या विवेकशक्तीला आव्हान देणाऱ्या मनोवैज्ञानिक तत्त्वांना महत्त्व देत. आपल्या कथांचा आधार कोणते तरी मनोवैज्ञानिक सत्य असते असेही त्यांनी म्हटले आहे. पण त्यांच्या सामाजिक दृष्टीमुळे, समस्यात्मक जीवनाचे चित्रण करण्याच्या वृत्तीमुळे या गोष्टीकडे फारसे लक्ष दिले गेले नाही. 'कर्मभूमि' कादंबरीच्या नावाची जरब जरा बाजूला ठेवली आणि 'कर्मभूमि'मध्ये आलेल्या राजकीय विचारांच्या व चळवळींच्या चित्रात्मक प्रस्तुतीकरणाचा भाग थोडा नजरेआड केला तर 'कर्मभूमि' ही माणसांच्या मनाचे विचित्र खेळ दाखवणारी एक कलाकृती आहे याचा प्रत्यय येतो. प्रेमचंद ज्या काळात लिहित होते त्या काळात राष्ट्रीय भावनेने सामान्य लोकांनाही भारून टाकले होते. सहाजिकच छोटया मोठ्या राष्ट्रीय घटनांना जनतेचा उत्स्फूर्त पाठिंबा मिळे आणि छोटया घटनात विराट रुप धारण करीत. पण या छोटया वा मोठ्या सामाजिक, राजकीय घटना माणसाच्या तर्कप्रणालीने आकार घेत होत्या काय, विवेकाने आयोजित केल्या जात होत्या काय किंवा बुद्धिवादाने तावून सुलाखून मगच स्वीकारल्या जात होत्या काय याचा विचार केला तर असे आढळेल की प्रेमचंदांना नेमके यापेक्षा वेगळेच सांगायचे होते. अनेक घटनांच्या मुळाशी अतार्किक, भावनात्मक अशा मानवी मनाच्या गहनगूढ प्रेरणा काम करीत असतात असेच प्रेमचंदांना सांगायचे आहे असे 'कर्मभूमि' या कादंबरीवरून तरी वाटते. या कादंबरीतील जवळ जवळ सर्वच माणसे सुष्ट व दुष्ट प्रवृत्तीनी युक्त आहेत. त्याच्या सुष्ट–दुष्टपणाचे प्रमाण कमी अधिक असते एवढेच. पण काही सामान्यतः सद्भावनायुक्त वाटणारी माणसे प्रसंगी घसरतात, स्खलित होतात तर दृष्ट वा दुर्गुणी समजली जाणारी माणसे परिस्थितिप्रमाणे फार सत्प्रवृतही होतात असेही प्रेमचंद दाखवतात. माणूस हा मुळात चांगलाच असतो अशी मात्र त्यांची मूलभूत श्रद्धा दिसते. या कादंबरीचे लेखन करताना गांधीवादी विचारसरणीतील माणसाच्या मूलभूत विशुद्ध, पवित्र आत्म्यावर आधारलेली हृदयपरिवर्तनाची संकल्पना प्रेमचंदांना खूपशी पटली होती असे दिसते.

## नायक अमरकांत : एक दुर्बळ मध्यमवर्गीय व्यक्तित्व

'कर्मभूमि' कादंबरीचा नायक अमरकांत हा एक दुर्बळ शरीराचा व दुर्बल

मनाचा मध्यमवर्गीय प्रवृत्तीनी युक्त असा माणूस. गरीबीतून स्वप्रयत्नाने व स्वकर्तृत्वाने लक्षावधी रुपयें मिळवणाऱ्या व्यापाऱ्याचा हा मुलगा शिक्षणासाठी बाप पैसे देऊ इच्छित नाही कारण अमरकांतने व्यापाराकडे लक्ष द्यावे अशी त्याची इच्छा. त्यांना पुत्रापेक्षा संपत्ती महत्वाची वाटे. अमरकांतची आई त्याच्या लहानपणीच वारली. दुसरी सावत्र आईही एक मुलगी पाठी ठेऊन गेली. ही मुलगी नैना. हिचे आपल्या भावावर विलक्षण प्रेम. अमरकांत दुबळा होता, बुद्धीने मंद होता. एकोणीसाव्या वर्षी जेमतेम आठवीपर्यंत गेला. त्याच वर्षी त्याचे लग्न एका श्रीमंत विधवेच्या मुलीशी होते ही मुलगी वृत्तीने विलासी व मनस्वी. अमरकांत व त्याची पत्नी सुखदा यांच्यात सर्वप्रकारे अंतर. प्रेमचंद वर्णन करतात. ' ही युवक स्वभावाची युवती, हिचे लग्न झाले ते युवती– स्वभावाच्या युवकाबरोबर. याच्यात पुरुषार्थाचा असा एक गुण नव्हता. जर दोघांचे कपडे बदलले असते तर एकाने दुसऱ्याची जागा घेतली असती ! दबलेले पुरुषत्व म्हणजेच स्त्रीत्व '– यांच्यात खटके उडत, अमरकांत दूर दूर राही. सुखदाला वाटे सासरे म्हणतात त्याप्रमाणे अमरकांतने शिक्षण सोडून व्यापारात लक्ष घालावे. निदान दोन तास तरी पतीने दुकानावर बसावे.

दोघांचा संसार कसाबसा चालला होता. अमरकांतला चरख्यावर सूत काढण्याची हौस. सुखदाला ते आवडत नसे. पण नवऱ्याला सोडून माहेरी गेले तर नवरा पूर्ण मोकाट सुटेल या भयाने ती त्याच्याजवळ राहाते. अमरकांतला घरांत बांधून ठेवणारी शक्ती एकच–त्याची सावत्र बहीण नैना. पण त्याच्या मातृसुखाला पारखं झालेल्या मनाला अचानक एक दिलासा मिळाला. सुखदाची आई रेणुका काशीला आली. मुलीचे कसे चालले आहे ते पहाण्यासाठी. रेणुका गर्भश्रीमंत व दानशील बाई होत्या. हळू हळू तिच्या वात्सल्यभावनेने अमरकांतला आपल्याकडे ओढून घेतले. सुखदा गर्भवती होती. हाही एक नवा बंध निर्माण होत होता.

अमरकांतची समाजसेवा आणि त्याग या गोष्टी बोलण्यापुरत्याच राहिल्या. त्याला सुखी व विलासी जीवनाची सवय लागली. सामाजिक कार्यांपासून तो काहीसा अलिप्त होऊ लागला.

गोऱ्यांचा अत्याचार वाढत होता. सामान्य गोरा शिपायी सुद्धा धाकदपटशा दाखवून हिंदी लोकांना छळत असे. पण त्याचा प्रतिकार करण्याची अमरकांतची

इच्छा मनांतच राहू लागली. प्रेमचंदानी दोन विरोधी प्रसंगाची योजना करून अमरकांतचा नकली ध्येयवाद स्पष्ट केला आहे. एक बलात्कारामुळे वेडी झालेली स्त्री गोऱ्यांचा खून करते. तिच्यावर खटला भरला जातो. त्या खटल्याला राजकीय रंग प्राप्त होतो. शांतीकुमार, सलीम वगैरे मंडळी त्या बाईच्या सुटकेसाठी लोकमत जागृत करून मदत मिळवतात व तिची मुक्तता करण्याचा प्रयत्न करतात. त्याच वेळी सुखदाचे दिवसही भरत असतात. अमरकांताचे सारे लक्ष घरात असते व बाहेरच्या सामाजिक राजकीय घटनांबद्दल तो बराचसा अनुत्साही होतो.

पण अमरकांत सुखदावर प्रेम करत होता आणि त्या प्रेमामुळे तो घरी अधिक लक्ष देत होता असे मात्र नाही. याच सुमारास एका म्हाताऱ्या पठाण स्त्रीशी व तिच्या सकीना नावाच्या मुलीशी अमरकांतची गांठ पडते. सकीना नम्र होती, लाजाळू होती. दिसायला सामान्य असली तरी अमरकांत सारख्या पुरुषापुढे ती सहज संकोचाने वावरत असल्यामुळे अमरकांत तिच्याकडे ओढला जातो. खरेतर सुखदासारखी आत्माभिमानी व प्रखर स्वभावाची स्त्री अमरकांतच्या अहंकारावर फुंकर घालून त्याला आपलेसे करू शकली नाही. अमरकांत सुखदाकडून जे प्राप्त करू शकत नाही ते सहजपणे त्यास सकीना कडून मिळाले. सकीना व सुखदा याच्या स्वभावातले अंतर व अमरकांतचे सकीनाकडे आकर्षण या गोष्टी प्रेमचंदानी मोठ्या कलात्मकतेने दाखवल्या आहेत. त्याला मनोवैज्ञानिक बैठक आहे अमरकांत आता धर्म, विवाह, प्रेम, क्रांती या विषयावर उत्हासाने बोलू लागला. या उत्साहांच्या व विचारांच्या दिशेच्या मुळाशी सकीनाविषयींचे आकर्षण होते.

सकीनाचा विवाह ठरतो. अमरकांतला हे कळल्यावर तो अतिशय विचलित होतो व सकीनाकडे जाऊन आपले प्रेम प्रकट करतो. सकीनाला अमरकांतसारख्या युवकाचे प्रेम प्राप्त होते म्हणजे एक दैवी खैरातच होती. ती अमरकांतला मन अर्पून आजीवन अविवाहित राहाण्याचा निश्चय करते. मात्र अमरकांतने विवाह करून आपला धर्म व आपली प्रतिष्ठा नष्ट करावी असे तिला कधीच वाटत नाही. एकदा अमरकांत व सकीना दोघांना आलिंगनबद्ध अवस्थेत पठाणिन पहाते आणि तिच्यावर वज्र कोसळल्यासारखे होते. अमरकांत तिथून जातो. आता बदनामी होणार, बापाला कळल्यावर तो कदाचित घरांतून घालवून देणार इत्यादी विचारांनी अमरकांत शहर सोडण्याचा विचार करतो. आपल्या दोस्ताला सर्व

हकीगत सांगतो. सलीम त्याला बोलण्याच्या नादात गुंतवून वडिलांना बोलावून घेतो. अमरकांतला ही घटना फारशी आपत्तिजनक वाटली नाही. पुरुषाकडून असा प्रमाद घडायचाच अशी त्यांची समजूत होती. पण अमरकांतने सकीनाला विवाहित पत्नी म्हणून आणावे हे त्यांनी मुळीच मान्य केले नाही.

अमरकांत शहर सोडतो. अनेक खेड्यांत भटकतो. एका गावांत चांभार वस्तीत राहातो. गांधीचा ग्रामसुधारांचा कार्यक्रम राबवतो– साक्षरता प्रसार, ढोराचे मांस न खाणे, स्वच्छता ठेवणे, श्रममहात्म्य, इत्यादी. अमरकांतच्या शरीरात बदल होतो. तो आता दुर्बल युवक राहिला नव्हता. तो श्रमांमुळे चिवट व ताकदवान झाला होता. त्याच्यात सहनशक्ती आली होती. तो चांभार जमातीत फार लोकप्रिय झाला होता.

इथे एक ठाकूर घराण्यातली स्त्री मुन्नो येऊन अस्पृश्य जातीत राहिलेली असते. एकीकडे सकीनाच्या प्रेमामुळे व्याकुळ होणारा अमरकांत दुसरीकडे मुन्नीच्या तारुण्यसुलभ वागण्याने व तिच्या आपुलकीने काहीसा तिच्याकडेही ओढला जातो पण ही ओढ फारच संयमित असते. मुन्नी ही दुसरी कोणी नसून जिच्यावर गोऱ्यांनी बलत्कार केला होता तीच स्त्री होती. आपल्या नवऱ्याला व मुलाला ती त्यावेळी सोडून आली होती, कारण आपण भ्रष्ट झालो आहोत ही वेदना तिला असह्य झाली होती. पण या गावात ती पुनः फुलू लागली होती. मुन्नी व अमरकांत यांच्यातलें निगूढ आकर्षण एका विशिष्ट पातळीवर ठेवण्यात प्रेमचंदांना चांगलेच यश आले आहे.

अमरकांतचे गावात येणे तत्कालीन राजकीय– सामाजिक आवाहनाचा भाग नसून ते त्याचे एक प्रकारचे पलायन होते. अमरकांत चांभार जातीवर चांगले संस्कार करतो. पण ढोरांचे मांस न खाण्याच्या प्रसंगावरुन जो संघर्ष निर्माण होतो त्यात अमरकांतपेक्षा मुन्नीच्या बलिदानाच्या भावनेचा हात अधिक होता हे प्रेमचंदांनी स्पष्ट केले आहे. मात्र मुन्नीच्या साहसाला, बलिदानाला आणि सक्रियतेला कारण अमरकांतवरचे तिचे पवित्र प्रेम, तिला तो नवरा म्हणून नको होता कारण त्याची पत्नी होण्याची आपली लायकी नव्हती असे तिलाच मनोमन वाटत होते· पण त्याच बरोबर ती त्याची रखेलही बनणार नव्हती. त्याचे आपल्यावर प्रेम आहे, निदान ओढा आहे एवढेच जगायला निमित्त तिला पुरे होते. मुन्नीचे हे सर्व वर्तन अत्यंत स्वाभाविक वाटते.

प्रेमचंदांनी गावातील दुष्काळी परिस्थितीचे व शेतकऱ्यांच्या हालाचे वर्णन केले आहे. शेतकऱ्यांचे शोषण करणाऱ्या महंताविरुद्ध लढा देण्याची तयारी गावांत होते. आत्मानंद त्यांचे नेतृत्व करतात. पण अमरकांतला मात्र महंताशी वाटाघाटी करून प्रश्न सुटतील अशी वेडी आशा वाटते. महंताला भेटण्यासाठी अमरकांत खेटे घालतो. गावांतून दुष्काळाची परिस्थिती असतांनाही महंताच्या दरबारात विलास व ऐश्वर्य यांची लयलूट असते. या सर्वांचे परिणामकारक वर्णन प्रेमचंदानी केले आहे. या संदर्भात सामंजस्याने प्रश्न सोडविण्याच्या अमरकांतच्या प्रयत्नांचे कसे हंसे होते हे प्रेमचंदांनी दाखवले आहे. आर्थिक सत्ता किती निर्घृण व प्रबळ असते हे ही दाखवले आहे.

सलीम आय. सी. एस. मध्ये शेवटच्या नंबराने उत्तीर्ण होतो व अमरकांत ज्या गावांत असतो त्याच ठिकाणी अधिकारी म्हणून येतो. महंताबरोबर समझौत्याने वागावे असे म्हणणारा अमरकांत एका सभेत अचानक फार क्रांतिकारी भाषण ठोकतो. याचे कारण नैनाच्या पत्रावरुन त्याला कळते की ज्या सुखदाला तो विलासिनी समजत होता ती सत्त्याग्रह करुन तुरुंगात गेली होती ! याचा अर्थ एवढाच की अमरकांतचे राजकीय वर्तन भावनेवर आधारलेले होते. व त्याला विवेकाची बैठक नव्हती. अमरकांतला पकडण्यात येते व लखनौच्या तुरुंगात पाठविण्यात येते.

प्रेमचंदानी या कादंबरीत जवळ जवळ सर्वच पात्रांना लखनौच्या सेंट्रल जेलमध्ये आणले आहे !

सुखदाला अमरकांताचे मोठेपण कळलेले असते, अमरकांतला सुखदाचे महात्म्य कळून येते. सकीनाशी विवाह करण्याचा निर्धार सलीम करतो व सकीना त्याला मान्यताही देते. कारण अमरकांत तिला पूज्य असतो पण विवाह करून त्याला आपलासा करावा अशी तिची आकांक्षा नसते. अमरकांताच्या व्यवहाराचा, विचारांचा, भावनांचा विचार केला तर अमरकांत सामान्य दुर्बळ माणूस वाटतो आणि इतरांना मात्र तो मोठा माणूस वाटत असतो. प्रेमचंदानी ही बाब मोठ्या कलात्मकतेने चित्रित केली आहे. प्रेमचंदांच्या अमरकांताच्या व्यक्तित्वाबद्दलच्या कल्पना स्पष्ट असतात. कादंबरीच्या शेवटी शेवटी प्रेमचंद स्पष्टपणे लिहितात, 'आतापर्यंत तो एका प्रकारे उपयुक्ततावादाचा उपासक होता. हाच सिद्धांत, अज्ञात रूपाने का होईना, मनांत ठेऊनच तो आपले कर्तव्य निश्चित करीत होता. तत्व-

चिंतनाला त्याच्या जीवनात कोणतेच स्थान नव्हते. प्रत्यक्षाच्या खाली जी अथाह खोली असते त्याचे त्याला विशेष महत्त्व वाटत नव्हते. त्याला वाटत होते की तिथे शून्याशिवाय आणखी काहीच नाही. का लेखांच्या मृत्यूने जणू त्याचा हात पकडून जबर्दस्तीने त्याला खोलपणात डुबविले आणि त्यात डुबल्यावर त्याला आपले जीवन तृणाप्रमाणे वर तरंगताना दिसले, कधी लाटांबरोबर पुढे जात होता, कधी हवेच्या झोक्यांबरोबर मागे सरत होता, कधी भोवऱ्यात सांपडून चक्कर खात होता. त्याच्यात स्थैर्य नव्हते, संयम नव्हता, इच्छा नव्हती. त्याच्या सेवेतही दंभ होता, प्रमाद होता, द्वेष होता. दंभाच्या पोटी त्याने सुखदाची उपेक्षा केली. त्या विलासिनीच्या जीवनात जे सत्य होते तिथपर्यंत जाण्याचा उद्योग न करता त्याने तिला सोडून दिले होते. उद्योग करणारच कसा ! त्यावेळ पावेतो त्या उद्योगाचे त्याला ज्ञानच नव्हते. प्रत्यक्षाने त्याच्या आंतल्या डोळ्यांवर पडदा टाकला होता. प्रमादांतच त्याने सकीनाबरोबर प्रेमाचे ढोंग केले होते.' प्रेमचंदानी स्वच्छपणे त्याचे हे ववर्णन केले आहे. त्याचा विचार केला तर अमरकांताच्या भावना, विचार, कृती व व्यवहार म्हणजे प्रेमचंदांना अभिप्रेत असलेले आदर्श असा भाबडा विचार कुणी करता नये.

या ठिकाणी प्रेमचंदांच्या कलात्मकतेबद्दल काही गोष्टी स्पष्ट होतात. त्यांचे नायक म्हणजे त्यांचे मुखपत्र नव्हते. ते नायकापासून विशिष्ट अंतरावर असत. नायकाचे वर्णन व चित्रण करताना ते जसे तटस्थ असत तसेच ते परिणामकारकता साधण्यासाठी त्याच्यात गुंतून गेल्याचेही दाखवतात. म्हणूनच समीक्षकांना प्रेमचंदांचे नायक त्यांचे मुखपत्र वाटत व स्वाभाविकपणे मूल्यांकन व्यापारातही चुका होत. सकीना, मुन्ना, सुखदा, नैना, सलीम, अमरकांत या सर्वांना अमरकांत वेगवेगळा वाटत असे व या सर्वांपासून दूर असलेल्या वाचकांना तो आणखी वेगळा वाटतो. कलाकाराचे हेच कौशल्य आहे. 'कर्मभूमि' कादंबरीत प्रेमचंद समझौतावादी झाले आहेत. अशा तऱ्हेची सर्वेक्षणी म्हणूनच हास्यास्पद वाटतात. वरकरणी सर्व पात्रे एकत्र येतात व सामान्यत: सुखी दिसतात हे खरे असले तरी ज्या प्रश्नांशी ही माणसे झुंजत असतात ते प्रश्न स्वातंत्र्याचे, शेतकरी वर्गाचे, नोकरशाहीचे, पिळवणुकीचे तसेच अनुत्तरित राहातात हे प्रेमचंदांनी सुचविले आहे. या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी जे प्रयत्नही विशिष्ट वर्गांतील माणसे करतात ते त्यांच्या वर्गीय वृत्ती-प्रवृत्तींशी सुसंगत असले तरी प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने अपुरे व असमाधानकार आहेत हे प्रेमचंद सुचवतात.

## स्त्रियांची शक्ती आणि मनोविज्ञान :

'कर्मभूमि' कादंबरीत प्रेमचंदांनी स्त्रियांच्या शक्तीचे अविष्कार दाखवले आहेत आणि ते सर्व मनोविज्ञानाच्या दृष्टीने विश्वसनीय आहेत. मात्र हे मनोविज्ञान फ्रॉयड, एडलर, युंग यां पाश्चात्य विचारवंताचे असून भागणार नाही. भारतीय मनाच्या दृष्टीने या विश्वसनीयतेची परीक्षा करावी लागेल व या परीक्षेला पूर्णपणे ते यशस्वी ठरेल.

सुखदा ही नायिका. त्यांच्या 'गबन' कादंबरीतल्या जालपाशी हिचे काहीसे साम्य आहे. दोघीही आरंभी विलासिनी पण पतीला सर्वस्व मानणाऱ्या आर्य स्त्रिया. जालपाच्या मानाने सुखदा अधिक तेजस्वी, अधिक स्वाभिमानी, अधिक व्यक्तित्व जागृत, सुखदा माहेरी जायची वारंवार. पण तिने जेव्हा पाहिले की तिचा पती तिच्या हातून सुटून जाईल तेव्हा ती सर्व त्राम भोगून सासरीच राहिली. पिता पुत्र यांच्या भांडणात ती विचाराने पित्याच्या बाजूची असली तरी आपला पती जेव्हा घर सोडतो तेव्हा ती ही त्याच्याबरोबर श्रीमंतीवर लाथ मारून त्याच्या साध्यासुध्या घरी येते. सासरा आजारी आहे हे समजल्याबर मात्र ही कर्तव्यतत्पर सून पुन: आपल्या सासऱ्याच्या सेवेसाठी घरी येते. सासऱ्याचा राग, अहंकार व अभिमान जवळ जवळ संपलेला असतो. तेव्हा ती सासरी राहाते.

सुखदाच्या अभिमानावर व अहंकारावर प्रचंड हल्ला होतो तो अमरकांत व सकीना यांच्या प्रणयाच्या वार्तेनें. अमरकांतबरोबर राहाताना तीं नोकरी करण्यासाठी घराबाहेर पडते एका श्रीमंत आईच्या मुलीने व धनाढ्य सासऱ्याच्या सुनेने नोकरी करणे हे फार साहसाचे. पण स्वाभिमानासाठी ती ते करते. पण सकीना–अमरकांतचा प्रणय तिला असहनीय वाटतो. अमरकांतचे नावही घ्यायलाही ती आता राजी नसते. एवढेच नव्हे तर मुलाबद्दलही ती काहीशी वितृषणा दाखवते. पण ती अंतर्मुख होते. तिची विलासिता समाप्त होते. तिला सकीना बद्दल मात्र यत्किंचितही द्वेष वाटत नाही. उलट सकीना आजारी असल्याचे कळल्यावर ती तिला भेटायला जाते. सकीनाला ती विचारते, 'एका विश्वासघातकी पुरुषाच्या भुलावणीला भुलून तू काय जीव देणार आहेस ?– त्यावर सकीनाचे उत्तर ऐकून सुखदा अधिक अंतर्मुख होते. ती सहानुभूती दाखवायला आलेली असते पण पराभूत होऊन परतते. ती मान्य करते, 'हिच्या विश्वासाने मला पराभूत करून टाकले.

या छोकरीत असे सर्व गुण आहेत जे पुरुषांना आकर्षित करतात अशाच स्त्रिया पुरुषांच्या हृदयावर राज्य करतात. माझ्या हृदयात कधी इतकी श्रद्धा निर्माण झालीच नाही. त्यांच्या बरोबर हंसणे, बोलणे, हास्यविनोद करणे, आपल्या रुपाचे आणि तारुण्याचे प्रदर्शन करणे यातच मी कर्तव्याची इतिश्री समजले ! कधी प्रेम केलं नाही, मी कित्येक वर्षात जे मिळवल नाही ते हिनं अगदी काही तासातच मिळवलं. आज मला थोडसं कळलं की माझ्यात काय उणिवा आहेत. या पोरीनं माझे डोळे उघडले.'

सकीनाची पुरुषाला आपलेसे करण्याची शक्ती वेगळी होती. सलीमसारख्या स्वच्छंदी व उडाणटप्पू माणसाला आपल्याकडे खेचून आणणारी सकीना स्त्रीच्या वेगळ्याच शक्तीच प्रदर्शन घडवते. ही स्त्रीधर्म पाळणारी स्त्री असते. सौजन्य, नम्रता, निरहंकार समर्पण सेवाभाव, पुरुषाच्या अहंकाराला जपण्याची क्षमता या गोष्टींनी तिचें व्यक्तित्व घडलेले होते.

सुखदाचे जीवन आता वेगाने बदलू लागते. शक्ती, श्रद्धा, सेवा, दया या मार्गावरून तिचे जीवन जाऊ लागते. सुखदाला आपल्या सामर्थ्याची जाणीव होते. ती हळू हळू नगराचे नेतृत्व करणारी स्त्री होते. गरीबांना घरासाठी जागा म्युनिसिपालटीने द्यावी यासाठी ती संघर्ष करते. मात्र यात केवळ निरपेक्ष सेवावृत्तीच असते असे नाही. म्युनिसिपालटीच्या सभासदांपैकी एकाच्या पुत्राने केलेल्या अपमानाचा बदला घेण्याची सूडभावना ही काही अंशी तिच्या कार्याला प्रेरणा देते. अमरकांतने दुकानावर बसून व्यापार करावा व संसार करावा असे म्हणणारी ही स्त्री आता जनतेचे नेतृत्व करणारी शक्तिशाली देवी बनली. भंगी, चांभार इत्यादी खालच्या वर्गातील लोकांना ती धनिकांविरुद्ध हरताळ करण्यास उत्तेजन देते. स्वतःच्या सासऱ्याच्या मंदिरात हरिजनांना प्रवेश मिळावा म्हणून सत्याग्रह करते. तिला पकडण्यात येते. जनतेचा मुजरा घेत ती गाडीतून जेलमध्ये जाते. तिच्या व्यक्तित्वातले अंतर पहा. 'सुखदाच्या हृदयात गर्व नव्हता, उल्लास नव्हता, द्वेष नव्हता, केवळ वेदना होती--जनतेची दयनीय दशा. ही अधोगती जी बुडत्या स्थितीत काडीचा आधार घेऊनही कृतार्थ होते त्या बद्दल तिच्या मनात वेदना होती.'

जीवनाच्या अंत समयी जसा प्रकाश मनांत उदय पावतो तसाच तिच्या

मनात प्रकाशाचा उदय झाला होता.— आज तिला आपल्या पराजयाचे ज्ञान झाले होते. ज्या सेवा व त्याग या भावनांसाठी तिची पतीबरोबर ताटातूट झाली होती त्याचे महत्व तिला कळले होते व आज पहिल्यांदा पतीविषयी तिला आत्मिक ओढ वाटली. तिला आपल्या पतीचे गुण दिसू लागताल. तो तिच्या लेखी तपस्वी, त्यागी व साधक असतो. तिला त्याचे महत्व कळले नव्हते हे ती मान्य करते. तो पतीला प्रेम देऊ शकली नाही म्हणून तो सकीनाकडे वळला ते तिला कळते.

ही सुखदा अपमानित झाल्यावर समानतेच्या भूमिकेवरून कांही खोचक प्रश्न उभे करते पत्नीने व्याभिचार केला तर मात्र तिचे स्वत:चे मन त्या मार्गाने कणभर ही जाऊ शकत नाही.

सुखदा म्हणजे भारतीय स्त्रीच्या व्यक्तित्वाला आलेली जाग, राष्ट्रीय कार्यात नेतृत्व समाजाचे करण्यापर्यंत तिने प्राप्त केलेली शक्ती, प्रेमचंदांची स्त्रीच्या सामर्थ्याविषयीची भव्य आकांक्षाच.

सुखदाचा स्वभाव विकसनशील आहे. आरंभीची विलासिनी बहिमुख आणि स्वकेंद्रित सुखदा आणि नंतरची त्यागीं, अंतर्मुख व कर्मयोगी सुखदा यातला विकास प्रेमचंदानी अतिशय स्वाभाविकपणे आणि प्रत्ययकारपणे दाखवला आहे. एकाच वेळी ती एक स्वतंत्र व्यक्तित्व म्हणून जाणवते व भारतीय स्त्रीचे प्रतिनिधित्वही करते.

या कादंबरीतील जवळ जवळ सर्वच स्त्रिया देशभक्तीच्या स्पर्शाने भारून गेलेल्या आहेत.

सुखदाची नणंद निष्कपट मनाची अमरकांतवर प्रेम करणारी त्याची सावत्र बहीण. हिचा विवाह होतो धनीराम या धनाढ्य माणसाच्या मणीराम नावाच्या मुलाशी. विवाहपूर्वी ती शांतिकुमारांकडे मनाने आकर्षित झालेली असते पण हे आकर्षण मनातच राहाते. मणीराम बरोबरचा संसार सुखाने करण्याची तिची इच्छा असते. पण श्रीमंत माणसाच्या लाडावलेल्या मुलाचे सर्व दुर्गुण मणीराममध्ये असतात. त्याला अत्याधुनिक फॅशनबेल तरुणीशी विवाह करायचा असतो आणि व्यापारासारख्या कार्यात तिच्या प्रभावाचा उपयोगही. पहिल्याच रात्री मणीराम हा एक असंस्कृत स्त्रीला भोगवस्तू मानणारा नराधम आहे हे नैनाला कळते पण ती परंपरागत भारतीय स्त्रीप्रमाणे सासरी दिवस काढू लागते. गरीबांना घरांसाठी

जमिनी मिळविण्याच्या लढ्यात सामान्य लोकांच्या बाजूने ती ही उभी राहाते. जनतेचे नेतृत्व करू लागते. सभेमध्ये मणीराम येऊन तिचा खून करतो. तिची भव्य प्रेतयात्रा निघते. या कादंबरीत प्रेमचंदांनी सर्वच स्त्रियांना दिव्यत्व बहाल केलेले दिसते !

सकीना एका म्हाताऱ्या पठाण बाईची सावळी व साध्वी तरुण मुलगी. तिच्यामध्ये सौंदर्य फारसे नव्हते. पण पुरुषाला आकर्षून घेईल असे व्यक्तित्व होते. लज्जाशीलता, नम्रता, समर्पण भाव व पुरुषी अहंकाराला थोपटून त्याच्यावर विजय मिळविण्याची हिकमत पण हे ते सर्व तिच्या निष्कपट स्वभावात मुळातच असते. तिच्यावर अमरकांत लट्टू होतो. तिलाही अमरकांतच्या मिषाने एका कल्पनातीत चांगल्या व मोठ्या पुरुषाचे प्रेम प्राप्त होते. ती अविवाहित राहायचा निश्चय करते. केवळ या प्रेमाच्या बळावर. कशिदा काढणें व शिवण टिपण करणे या कामांच्या जोरावर ती घराचे रंगरूप बदलते. सकीनाही जनतेच्या बाजूने लढ्यात उतरते. तिच्यावर अमरकांतचा मित्र सलीम जीव टाकत असतो. शेवटी ती सलीमशी विवाह करते. ती सुखदाला यासंबंधात स्पष्ट सांगते. ' मला कळले की तू रुसलेल्या देवाला वश करण्यात यश मिळवलंस. मी चिंतेतच होते. माझ्या-सारखी खेडूत मुलगी त्यांना प्रसन्न कशी ठेऊ शकेल. माझी स्थिती त्या गरिबासारखी झाली होती. जो खजिना मिळाल्यावर पागलच झाला होता. आपल्या झोपडीत आता तो कसा ठेवावा व त्याचे रक्षण कसे करावे असेच विचार येऊ लागले होते. त्यांची इच्छा मला समजली. देवाची पूजा करावी. तो घरी आलाच तर त्याला कुठे बसवायचे, कुठे झोपवायचे, काय खायला घालायचे— सलीमना मी संभाळू शकेन. याच दुनियतले आहेत, मी त्यांना समजू शकते. '

सकीनाच काय पण तिची म्हातारी आईही जनतेच्या लढ्यात उतरते आणि पकडली जाते. जनसंघर्षांत मुसलमान स्त्री-पुरुष योगदान करीत होते. हेही या निमित्ताने प्रेमचंदांनी दाखवले आहे. सलीम तर सरकारी मानाची व अधिकाराची नोकरी सोडून देशकार्यात सामिल होतो व पकडला जातो.

खेड्यात मुन्नीही अशीच कर्तृत्ववान बाई दाखवली आहे. हिच्यावर गोरे सोल्जर बलात्कार करतात. काही महिने पागल होऊन ती गोऱ्यांचा बदला घेण्याचा प्रयत्न करते व काही गोऱ्यांना भोसकून ठारही मारते. पुढे तिच्यावरच्या

खटल्याला जनसंघर्षाचे रूप येते. तिची निर्दोष सुटकाही होते. तिचा नवरा तिला घरी नेऊ इच्छितो. पण आपले पावित्र्य नष्ट झाले या दुःखाने मन कठोर करून ती नवऱ्याला व मुलाला सोडून जाते. एका गावात येते व एका चांभाराच्या मुखियाच्या घरी राहू लागते. त्याच गावी अमरकांत येतो. अमरकांतवर ही भक्तीमय प्रेम करू लागते. हे प्रेम अतिशय मर्यादाशील असते. तिला अमरकांतच्या स्नेहाची फक्त मानसिक गरज असते व तेवढ्यावर ती जीवन कंठायला तयार असते. स्त्रीच्या प्रेमाचे एक आगळे दर्शन या ठिकाणी प्रेमचंदांनी घडविले आहे. अमरकांत सुखदा, अमरकांत–सकीना व अमरकांत–मुन्नी यांचे संबंध तपासले तर प्रणयाची विविध रुपे दिसतात. अन्य रुपे सलीमा–सकीना व नैना- शांतिकुमार यांच्या मिषाने ही दाखविली आहेत. मुन्नी अमरकांतच्या सहवासात आल्यावर समाजसेवेचे व्रत हाती घेते व खेड्यातील अशिक्षित जनतेत सेवाकार्य करू लागते. खेड्यातील सलोनी काकी तर शहरातील सुखदाची आई रेणुका याही देशकार्यात प्रभावी कर्तृत्व करतात.

## हृदय परिवर्तना अतिरेकी हव्यास :

प्रेमचंदांनी या कलाकृतीत जवळ जवळ सर्वच पात्रांची हृदय परिवर्तने दाखवली आहेत. अनेकांचा उल्लेख वर झालाच आहे. अमरकांतचे वडील समरकांत एक व्यापारी. पैसा पैसा जपून ठेवणारे. पण पैशासाठी वाटेल ते करणाऱ्या या माणसाने आपल्या नोकराच्या पत्नीला मृत्यूनंतर आजीवन मदत केली होती. समरकांतही मुलाच्या व आसपासच्या वातावरणाने प्रभावित होऊन देशभक्त बनतात. त्यांनी एक मंदिर बांधलेले असते. त्यात हरिजनांना प्रवेश मिळावा म्हणून आंदोलन केले जाते. आरंभी नकार देणारे समरकांत गोळीबारात प्राणहानी झाल्यावर मंदिराची द्वारे हरिजनांना खुली करतात व पुढे तर जनतेच्या वतीने घरांच्या आंदोलनाचे नेतृत्वही करतात. त्यांचे व्याही सेठ धनीरामही तरुणांच्या कार्यात सामील होतात. सलीम तर आपली नोकरीच सोडून तुरुंगात जातो पण त्याचे वडिलही शेवटी जनसंघर्षाने प्रभावित होऊन गरिबांना घरासाठी जमिनी देण्याचे ठरवतात.

गोळीबार करणाऱ्या पोलिसांपासून तो तुरुंगातल्या अधिकाऱ्यापर्यंत सर्वच लोक माणुसकीचा प्रत्यय देतात.

यात कालेखां नावाच्या एका दरोडेखोराचे हृदयपरिवर्तन घडलेले दाखवले आहे. जेलमधील कालेखां एक दिव्य पुरुष वाटतो. नमाज पढताना त्याच्यावर केलेल्या माराहाणीमुळे तो खाली कोसळून मरतो. कालेखांचे हे चित्रण फार प्रभावीपणे चितारले गले आहे.

हा सर्वभाग हृदयपरिवर्तनाच्या तत्त्वावरील आस्थेमुळे काहीसा अतिरंजित व मेलोड्रॅमॅटिक झालेला आहे. सर्वच पात्रांना नाटकातील शेवटच्या अंकात जसे एकत्र आणले जाते तसे एकत्र आणले गेले आहे. सर्वच पात्रे जनतेचे नेतृत्व करताना मोठी भाषणे देतात व जनतेवर त्यांचा परिणामही होतो ! या सर्व दोषांनी युक्त असलेली ही कादंबरी त्यातील व्यक्तिचित्रांमुळे आणि जनसंघर्षाच्या प्रभावी चित्रणामुळे मोठी वाटते.

या कादंबरीत जनतेतील प्रचंड उत्साहाचे, लढा लढविण्याच्या शक्तीचे, भयाचे व वीरवृत्तीचे मोठे रोमांचकारी चित्रण झालेले आहे. १९३०-३२ च्या आसपास भारतीय जनता देशभक्तीच्या भावनेने कशी स्पंदित झाली होती याचे प्रत्ययकारी चित्रण ही कलाकृती प्रस्तुत करते. जनतेतून खेड्यात व शहरात नेतृत्व कसे वर येत होते आणि सामान्य माणसेही विशिष्ट ध्येयाने प्रेरित होऊन त्यात व समर्पणाच्या मार्गावर कशी आगेकूच करीत होती याचे चित्रमय दर्शन प्रेमचंद घडवितात. देशभक्तीच्या भावनेच्या स्पर्शाने परीसाचे जणू सुवर्ण झाले होते. अखंड भारत एक 'कर्मभूमि' झाली होती. हे कर्म निष्काम होते, प्रत्येक जण आपल्या स्वकेंद्रित व्यक्तित्वाला संक्रमित करून जीवनाचे सार्थक करून घेत होता. स्वातंत्र्यपूर्व काळात भारतीय जनतेचे मन कसे घडत होते आणि त्याचे स्वरूप कसे होते याचे प्रत्ययकारी दर्शन घ्यायचे असेल तर 'कर्मभूमि' कलाकृतीचे पारायण आवश्यक आहे. कितीतरी तांत्रिक दोष यात आहेत. किती तरी गोष्टी काहीशा घडविल्यासारख्या वाटतात, वास्तवाला विशिष्ट दृष्टीने आकार दिला जात असल्याची अकलात्मक घटना घडत आहे याची जाणीव होत असते. काही ठिकाणी संयोग व घटना हास्यास्पदही वाटतात. पण एका जीवनाच्या प्रचंड प्रवाहाचे रूपदर्शन घडत असताना हे दोष या उणिवा दुर्लक्षित केल्या जातात. जाणवते ती लेखकाची प्रचंड ऊर्जा, उदात्ततेवरचे प्रेम, मानवतेविषयीचा कळवळा !

## संघर्षाचे स्वरूप :

या कादंबरीतील संघर्षाचे रूप पाहिले तर शहर व गांव दोन्ही ठिकाणी

सामान्य जनता आपल्या हक्कांसाठी कशी जागरूक होत होती याचे दर्शन घडतं.

खेड्यांत महंताच्या जमिनीवरच्या कराविरुद्ध चळवळ उभी केली जाते. यात अमरकांतसारखे समझौतावादी असतात तर आत्मानंदासारखे प्रत्यक्ष लढा देण्याची इच्छा असणारे क्रांतिकारीही असतात. हा लढा आरोह–अवरोहाचे रूप धारण करतो पण कोणत्याच निष्कर्षाला पोचत नाही. महंतासारख्या विलासी व स्वार्थी माणसावर अमरकांतचा विश्वास अनाठायी तर वाटतोच पण जनतेच्या मुक्तीच्या संघर्षाच्या दृष्टीने तो प्रतिगामी ही वाटतो. प्रेमचंदांनी तटस्थ कलावंताच्या भूमिकेतून हेच दाखवले आहे. महतांची भेट घेण्यात अमरकांतला झालेला त्रास व भेट झाल्यावर त्याला मिळालेल्या आश्वासनातील फोलपणा, तसेच अमरकांतच्या उत्साही वृत्तीतील हास्यास्पदता प्रेमचंदांनी स्पष्ट केली आहे. अमरकांतचे काहीसे असंतोष निर्माण करणारे भाषणही त्याच्या सुचिंतित विचाराचे फळ नसून त्याच्या क्षणिक उत्तेजनेचा परिणाम होता हे त्यांनी दाखवले आहे. त्यानंतर मात्र म्हातारी सलोनी व मुन्नी या खेड्यातल्या बायका खराखुरा संघर्ष करतात. याहि क्षणी मध्यमवर्गीय नेतृत्वाच्या मर्यादा स्पष्ट होतात व सामान्य जनतेतील संघर्षाच्या यशस्वितेबद्दल प्रेमचंदांची खात्री असते हेही स्पष्ट होते. अमरकांत शेवटपर्यंत आपल्या कार्याबद्दल साशंक व धरसोड वृत्तीचा दिसतो. खेड्यातील लढा प्रत्यक्षपणे सरकार विरोधी नसला तरी पुढे सरकारी नोकरशाही जन-आंदोलनाच्या विरोधी उभी राहाते हे दाखवले आहे. सरकारतर्फे तपासणी करणारे नोकरही कसे सरकारधार्जिणे असतात व सरकार संकटात येणार नाही, नुकसानीत येणार नाही असे जनहितविरोधी खोटे रिपोर्ट देतात यावरही चांगलाच प्रकाशझोत टाकला आहे.

शहरांतील लढा हरिजनांच्या मंदिर प्रवेशासाठी असतो व त्यात यशही मिळतें. सरकारी यंत्रणा आरंभी शेठ समरकांत यांच्या बाजूने राबवली जाते पण पुढे स्वतः समरकांतच मंदिर खुले करतात. दुसरा लढा गरीब श्रमिकांसाठी घरे बांधण्याच्या उद्देशाने म्युनिसिपालटीकडून भूमी मिळविण्यासाठी होतो. हा लढा एका बाजूला म्युनिसिपालटीतले श्रीमंत व केवळ वैयक्तिक नफा मिळवू पहाणारे सभासद व त्यांच्याविरुद्ध गरीब जनता यांच्यातला असतो. शेवटी श्रीमंत सभासदांचे हृदयपरिवर्तन होते व जमिनी द्यायला ते तयार होतात असे दाखवले आहे. या लढ्यात हरताळ होतो, सत्याग्रह होतो. जनतेच्या संघर्षशील स्वभावाचा प्रत्यय

येतो. सरकार श्रीमंतांच्या बाजूनेच जनविरोधी भूमिका घेत असते. मात्र या कादंबरीत प्रत्यक्ष ब्रिटिश सरकारशी संघर्ष दाखवलेला नाही. राजकीय घटनांचा राजकीय व्यक्तींचा प्रत्यक्षपणे उल्लेख न करता तत्कालीन समाजातील एकूण वातावरणाचे प्रभावी चित्रण प्रेमचंद करतात धनिक व धनहीन यांच्यातील विरोध संबंध प्रेमचंद दाखवतात पण एकूण राष्ट्रीय विचारांच्या स्पर्शाने हा वर्ग कलह फार संघर्षशील भूमिका घेणार नाही असे मत प्रकट करतात. सर्व प्रश्नाची सोडवणूक करण्यासाठी एक सरकारतर्फे कमिटी नेमली जाते. तसेच धनिकही गरिबांची मने व त्यांची परिस्थिती समजून घेऊ शकतात असा विश्वास व्यक्त केला गेला आहे. हा त्यावेळच्या राजकीय वातावरणाचा परिणाम असणे शक्य आहे. मात्र ह्या सर्व गोष्टी लेखकाला मान्य आहेत असे म्हणता येत नाही. लेखक प्रेमचंद या सर्व निष्कर्षापासून काहीसे दूर असावेत असेच वाटते. या संदर्भात सुखदाचे शेवटचे उद्‌गार महत्त्वाचे वाटतात. ' मला वाटते जे झाले ते चांगलेच झाले. जे काम चांगल्या भावनेने केले जाते ते ईश्वरार्थ असते. परिणाम काहीही होवो. यज्ञाचे काही फळ मिळाले नाही तरी पुण्यतर प्राप्त होतेच. मी हा निर्णय म्हणजे विजयच समजते. एक अभूतपूर्व विजय. आम्हाला जे बलिदान करावे लागले ते जनतेतील जागृती पहाता काहीच नाही. या बलिदानांशिवाय जागृती झाली असती असे का तुम्हाला वाटते ? आणि या जागृतीशिवाय का समझौता झाला असता ? मला तर यात ईश्वराचा हात स्पष्ट दिसतो आहे !' या उद्‌गारांनी अमरकांतला एक प्रकारची मोठी मनःशांती मिळते. प्रेमचंदांना दाखवायची होती ती जन-जागृती आणि प्रत्येक गोष्ट मिळवण्यासाठी बलिदानाच्या रुपाने द्यावी लागणारी किंमत. तेव्हा प्रेमचंदांना ही सर्व घटनांची परिणती मान्य होती, त्यातले सर्व विचार मान्य होते असे म्हणता येणार नाही. एक जनवादी कलावंताला करायची होती जन-जागृती. या ती कलाकृतीने निश्चितपणे घडली आहे असे म्हणता येईल. सर्व घटनांतून अमरकांत व सुखदा यांना दैवीशक्ती व ईश्वरी हात दिसून येत होता.

प्रेमचंदांना काय दाखवायचे होते ? ' पठाणिनीच्या गिरफ्तारीमुळे शहरात असे आंदोलन उत्पन्न झाले. जीर्ण वृद्धावस्थेतील कठोर तपस्येने मेलेल्यांत सुद्धा जीवन फुंकले जात होते. भीरू आणि स्वार्थी लोकांना सुद्धा कर्मक्षेत्रांत आणून उभे केले जात होते. परंतु अशा निर्लज्ज लोकांचीही कमतरता नव्हती, जे म्हणत होते ' हिला आता जीवन जगून करायचे आहे काय ? मरायचे तर आहे ! बाहेर न

मरता तुरुंगात मरते आहे ! आम्हाला अजून खूप जगायचे आहे. खूप काही करायचे आहे. आम्ही आगीत कशी उडी मारायची ?' पण याच बरोबर दुसऱ्या प्रकारचे लोकही होते. 'संध्याकाळ, मजूर आपली कामे सोडून, छोटे दुकानदार आपली दुकाने बंद करून घटना स्थळाकडे धावत आहेत. तिथे पठाणिन आता नाही. जेलमध्ये पोचली असेल. हत्यार बंद पोलिसांचा पहारा आहे, सभा होणे शक्य नाही. भाषणे होणार नाहीत, जमावबंदी आहे. पण यावेळी कोणी काही विचार करीतच नाही, कुणाला काही दिसतच नाही. सर्व कोणत्यातरी वेगमय प्रवाहात वहात जात आहेत. एका क्षणात सारे मैदान जनसमूहाने भरून गेले.' आणि प्रचंड सभा झाली– वक्ते उत्स्फूर्तपणे बोलले, जनतेने उत्स्फूर्तपणे दाद दिली. समरकांतसारखा धनिकही प्रचंड आवेगाने, उत्साहाने आणि करु वा मरु या बाण्याने बोलला. हा जो जनतेतला वेगमय प्रवाह आहे याचे मोठे प्रत्ययकारी चित्रण प्रेमचंद या कलाकृतीत करतात. माणसे आहेत, त्यांच्यात प्रेम आहे, द्वेष व घृणाही आहे, राग व लोभही आहेत . पण या सर्वांना सामावून घेणारी प्रचंड ज्ञानशक्ती म्हणून काही वेगळी ऊर्जा निर्माण झाली होती. तिचे दिग्दर्शन हा या कलाकृतीतला सर्वात महत्वाचा भाग आहे. राजकीय व सामाजिक घटनांच्या प्रत्यक्ष निर्देशापेक्षा यामागच्या जन–मानसाचे विराटत्व दाखविण्यात प्रेमचंद यशस्वी ठरले आहेत. तांत्रिक दोष, कलात्मक उणिवा या सारख्या गोष्टी या विराटत्वात पाल्यापाचोळ्या सारख्या उडून जातात. व्यक्तींच्या, व्यक्ति–प्रतीकांच्या (Types) व जनतेच्या मनाचे स्पंदन व आंदोलन दाखवणे हा हेतू साध्य झाला आहे. स्वाधीनता–संग्रामात भारतीय मानस कसे होते ? 'कर्मभूमि' कडे बोट दाखवावे म्हणजे खरे व समर्पक उत्तर मिळते. अशी ही विराट आशय कवेत घेणारी कलाकृती थोर नाही काय ?

० ० ०

## (४) गोदान : एक महान कलाकृती

प्रेमचंदांची ही शेवटची संपूर्ण कादंबरी––१९३२ मध्ये लिहायला प्रारंभ केला आणि प्रकाशित झाली १९३६ च्या जूनमध्ये. ही कादंबरी विलक्षण कलात्मक संयमाने आणि तन्मयतेने त्यांनी लिहिली. त्यांच्या सर्व कलात्मक शक्ती

या कृतीत उत्कटतेने प्रकट झालेल्या दिसतात. प्रदीर्घ व खोल जीवनानुभ सातत्याने कलात्मक पातळीवर ठेऊन समरसतेने तो व्यक्त करणे, छोटचा व मोठचा जीवन प्रसंगांच्या चित्रात्मक बांधणीतून त्या जीवनानुभवाचा ओघ गतिमान ठेवणे, वास्तवाकडे कोणत्याही मोहाने क्षणभरही पाठ न फिरवता कलाकृतीत त्याचा सृजनशील उपयोग करून घेणे आणि घटनांची, पात्रांच्या स्वभाव वैशिष्टचांची विश्वसनीय आणि अपरिहार्य अशी संयोजना करून जीवनाचे वस्तूदर्शी स्वरुप प्रकट करणे, नानाविध पात्रांच्या स्वभाव वैशिष्टचांचा वेध घेत जिवंत चरित्र-सृष्टी निर्माण करून तिचा उत्कट प्रत्यय देणे आणि हे सर्व करताना वाचकांमध्ये जीवनाबद्दल एक प्रगल्भ जीवन-दृष्टी उत्पन्न करणे या वैशिष्टचांचा प्रत्ययकारी बोध 'गोदान' वाचताना होत राहतो. आदर्शवादावरची प्रेमचंदांची आस्था पूर्णपणे नष्ट झाली नसली तरी ती अधिक सखोलपणे आणि कलात्मकतेने प्रकट होताना दिसते. विविध प्रकारच्या स्वभावाच्या माणसांच्या मनाचे नानाविध भाव-प्रसंगातले खेळ नाटचमय पद्धतीने दिग्दर्शित केले जातात. त्यांना कुठेही नाटकीपणाचे स्वरुप येत नाही. यातील मुलांचे व इतरांचे मृत्यू पात्रांच्या जीवनाला कलाटणी देणारे, त्यांना अधिक अंतर्मुख करणारे व कलात्मक अपरिहार्यतेने घडलेले दिसतात. (अन्य कलाकृतीत मृत्यूसंबंधी काहीसा अतिरेकी मोह प्रेम-चंदांमध्ये होता हे आधी सांगितलेच आहे.) हृदय परिवर्तने अधिक साक्षेपाने आणि प्रभावीपणे घडलेली आहेत. प्रेमचंदांचा साहित्यासंबंधीचा उद्देश्यवाद (साहित्याने मानवी जीवनाची सेवा करण्याचे व्रत अंगिकारलें पाहिजे इत्यादी) इथे अनुभवाला अधिक समृद्ध करताना दिसतो. थोडक्यात 'गोदान' मध्ये प्रेमचंदांनी स्वतःच्या मानसिक संस्कारांच्या कलेच्या वा जीवनानुभवाच्या कलात्मक अविष्काराच्या आड येणाऱ्या पुष्कळशा मर्यादा स्वतःच अतिक्रमित केलेल्या दिसतात.

## ग्रामीण व नागर संस्कृतीचे ताण :

'गोदान' मध्ये भारतीय जीवनातील ग्रामीण व नागर जीवनाचे ताण मोठ्या ताकदीने व्यक्त केले आहेत. दोन्ही जीवनातील माणसांचे स्वभाव, त्यांची संस्कृती, त्यांची जगण्याची रीत, त्यांची परस्परांच्या जीवन-व्यवहारापासूनचे दूरत्व व एकमेकांच्या जीवन-व्यापाराला दिलेले छेद, एका राष्ट्रीय वातावरणातून जात

असताना परस्परांशी जवळीक साधण्याची आवश्यकता... हे सारे वास्तव 'गोदान' कादंबरीत प्रतिबिंबित झाले आहे. नागर व कृषी संस्कृतीतील विसंवाद व संवाद यांचे वस्तुदर्शी रुप–चित्रण हे या कलाकृतीचा भावानुभावाचा केंद्रीय घटक आहे. भारतीय व ग्रामीण व नागर जीवन अनेक प्रकारच्या अंतर्विरोधांनी गतिमान झालेले आहे. हे असंख्य पातळीवरचे अंतर्विरोधही या कादंबरीत सामर्थ्याने प्रकट झाले आहेत या कादंबरीत सहाजिकच सामाजिक वास्तव अधिक प्रकर्षाने आले आहे आणि राजकीय परिस्थितीचा निर्देश अप्रत्यक्षपणे आलेला आहे.

## कृषी जीवनाचे वास्तव :

'गोदान' कादंबरीत जितक्या विस्ताराने सखोलपणे आणि कलात्मक प्रत्यकारितेनें ग्रामीण जीवनाचे विशेषत: शेतकरी वर्गाचे वास्तव व्यक्त झाले आहे तितक्या सामर्थ्याने फारच विरळ कलाकृतीत ते प्रकट झाले असेल.

या कलाकृतीचा नायक होरी आणि नायिका धनिया कादंबरीच्या आरंभीच प्रेमचंदांनी आपल्या नायकाच्या जीवन–स्थितीचे स्वरुप स्पष्ट केलें आहे. चाळीस वर्षाचा हा शेतकरी दारिद्र्याने विविध प्रकारच्या कौटुंबिक चिंतेने सावकार व जमीनदार यांच्या रक्त–शोषणाने इतका जर्जर झालेला आहे की त्याची बायको धनिया म्हणते, 'तुमची अवस्था पाहिली की मी अधिकच सुकून जाते. ईश्वरा, हे म्हातारपण कसे निभावेल? कुणाच्या दारावर जाऊन भीक मागायची?' दोघांच्या भाषणांत निर्माण झालेली थोडीशी मृदुता वास्तवाच्या आगीने जणू पोळून जाते. काठी पकडत होरी म्हणतो, 'साठापर्यंत जाण्याची वेळच येणार नाही धनिया, त्या आधीच जाऊ.' (आणि शेवटी हेच घडते) त्यांच्या सह जीवनातील कटु व गोड प्रसंग, दारिद्र्यातून सोसलेले आघात, सर्व दैवी व अधिदैवी आपत्तींना मिळून तोंड देताना निर्माण झालेली प्रेमाची जवळीक, त्यांची लाचारी आणि जिजीविषा या सर्वांचे अद्‌भुत रसायन आरंभीच्या एका प्रसंगातच प्रेमचंद प्रकट करतात आणि स्वतःच्या एका विलक्षण भाष्याने त्यांच्या सह–जीवनाचे महाकाव्य अभिव्यक्त करतात : 'खांद्यावर काठी घेऊन होरी घरून निघाला, तेव्हा दरवाजावर उभी राहून पुष्कळ वेळपर्यंत धनिया त्याच्याकडे पहात राहिली. त्याच्या या निराशेने भरलेल्या शब्दांनी घायाळ झालेल्या. धनियाच्या हृदयांत भीतीदायक थरथर उत्पन्न केली. जणू ती आपल्या नारीत्वाच्या

संपूर्ण तपाने आणि व्रताने आपल्या पतीला अभयदान देत होती. तिच्या हृदयातून आशीर्वादांच्या व्यूहच निघून होरीला आपल्यात समावून घेत होता. दारिद्र्याच्या या असीम सागरात सौभाग्यत्व ही एकच अशी काडी होती की जिला पकडून तो सागर ती पार करीत होती. या अशोभनीय परंतु वास्तवाशी जवळीक असणाऱ्या शब्दांनी जणू झटका देऊन तो काडीचा आधार हिरावून घेण्याचा प्रयत्न केला, किंवा ते शब्द वास्तवाला जवळचे असल्यामुळे त्यांच्यात इतकी वेदना- शक्ती आली होती. चकणा म्हटल्यावर चकण्याला जे दुःख होते ते दोन्ही डोळे शाबूत असणाऱ्याला थोडेच होते ?'

(भाषांतरातून मुळची ताकद जाणवणे कठीण आहे. पण अशा भाष्यांनी ही कादंबरी जागोजाग अनुभव-समृद्ध झालेली आहे )

प्रेमचंदांच्या कादंबऱ्याबद्दल बोलताना त्यांच्या माणसाबद्दलच प्रामुख्याने बोलावे लागते. कृषि-जीवनाचे वास्तव पहाताना, त्यांच्या होरी-धनिया या दांपत्याबद्दल व त्यांच्या कुटुंबियांबद्दलच सांगावे लागते. कारण प्रेमचंदांची कथा वा कथेतील असंख्य प्रसंग त्यांच्या पात्रांच्या परस्पर संबंधातूनच निर्माण झालेले असतात. पुनः ते वेळोवेळी सांगितल्याप्रमाणे स्वतःचे वैशिष्टय घेऊन येतातच पण प्रतीकात्मक सामर्थ्याने आपल्या आसपासच्या माणसाचे, वर्गाचे, जातीचे प्रतिनिधित्वही करतात. होरी-धनिया म्हणजे शेतकरी वर्ग- भारतीय कृषि-जीवन, मात्र हे जीवन रेखीव व ठोस व्यक्तित्वांच्या माध्यमातून प्रकट होते ही प्रेमचंदांची कला.

होरी हा एक जेमतेम तीन बिघे जमीन बाळगणारा शेतकरी. देव आणि दैव यावर विश्वास ठेऊन जगणारा दरिद्री मनुष्य, अवर्षण, अतिवर्षण, पूर या दैवी आपत्तींनी नेहमीच गांजलेला, दारिद्र्यातून उत्पन्न झालेल्या रोगराईच्या तडाख्यांनी पिडला गेलेला अर्धपोटी वा रिकाम्यापोटी श्रम करण्याची पाळी वारंवार या शेतमजुरावर येते. पण दैवी वा अधिदैविक आपत्तींपेक्षा माणसाच्या रुपाने येणाऱ्या आपत्ती फार मोठ्या व त्रासदायक. परंपरांनी अधिक रुढींनी याचे सर्व जीवन नियंत्रित केलेले. या परंपरा व रूढी त्याचे सर्वांगीण शोषण करण्यासाठीच जणू भारतीय हिंदू समाज रचनाकारांनी निर्मिलेल्या. शेती करणे आणि दोन-चार बिघ्यांची जमीन मालकीची असणे ही या शेतकऱ्याला मोठ्या

प्रतिष्ठेची बाब वाटते. धर्माच्या नावावर त्याचे शोषण करणारा ब्राह्मण दातादीन हा त्याला देवासमान पूज्य त्याच्या गांवचा व इलाख्याचा प्रमुख जमीनदार रायसाहेब हा त्याला अन्नदाता वाटतो. त्याच्या मायावी बोलण्याने आणि थोड्याशा सन्मानाने वागविण्याच्या कसबामुळे हा साधा सुधा खेडूत मनुष्य त्याचा भक्तच बनतो. दुलारी साहुआईनं, झिंगुरी सिंह, तलाठी पटेश्वर, जमीनदाराचा कारकून नोखेराय या शेतकऱ्यांच्या जीवनाला लागलेल्या रक्तशोषक जळवा. कधी गोड बोलून तर कधी कठोर वाक्ताडन करून शेतकऱ्यांकडे आलेले पैसे आणि त्याच्या खळ्यांतले धान्य यांची लूट करणारी ही सावकार मंडळी. या सर्वांची प्रेमचंदांनी वैविध्यपूर्ण पण मोठी प्रत्ययकारी चित्रें काढली आहेत. त्यांच्यात आपसांतही ईर्ष्या असते. फसवाफसवी व स्वार्थसंबंध असतात. पुष्कळसे अंतर्विरोधही असतात. याचे भरगच्च आलेखन 'गोदान' मध्ये केले आहे.

सावकार, जमीनदार, सरकारी नोकर यांच्या जात्यांत भरडला जाणारा होरी तसा मनाचा सरळ, पापभीरु, आणि नम्र ज्या जमीनदाराच्या पायाखाली मान दबलेली आहे त्याचे पाय चेपणे यातच कल्याण आहे असे समजणारा. कमालीचा सहिष्णु--आणि मर्यादशीलपणे वागणारा. चार शेतकरी बंधू आदर देतात, मानाने नमस्कार करतात यातच धन्यता मानणारा. पण छोटचा छोटचा गोष्टीत तो अप्रामाणिकपणा करण्याचा प्रयत्न करीत नसे असे नाही. भोला महतोची गाय आवडली आणि एखादीं कपिला आपल्या दारावर असावी. मुलांना दूध मिळावे, बिरादरीत प्रतिष्ठा वाढावी आणि गोबरच्या सगाईसाठी मुली सांगून याव्यात अशी त्याची इच्छा. भोला महतोची पत्नी वारलेली आणि पन्नाशी उलटून गेला तरी विधुरावस्था कष्टदायक झालेली. भोलाचा हा हिरवटपणा पाहून होरी त्याला बायको मिळवून देण्याचे खोटे आश्वासन देतो आणि गाय घेऊन येतो. खोटे बोलून गाय आणताना त्याच्या मनाला वेदना होत नाहीत असे नाही पण लोभ वरचढ ठरतो. वीस रुपये शेकडा विकलेले बांबू पंधरा रुपये शेकडा विकले म्हणून भावाना सांगायला तयार असतो. गरज पडली की कोणत्याही सावकाराकडून पैसे घेण्यासाठी तयार असतो. आणि परत देण्याचे भरघोस पण खोटे आश्वासन द्यायला मागेपुढे कधीच पहात नाही.

पण या छोटचा मोठचा गोष्टीत स्वार्थ पहाणारा हा होरी जीवनातल्या मोठचा व सत्वपरीक्षा पहाणाऱ्या प्रसंगात विलक्षण कर्तव्यनिष्ठेचा आणि नैतिक

नियमांचे पालन करण्याचा प्रत्यय देतो. भावांना मुलांप्रमाणे वाढवले पण ते वयात आल्यावर वेगळे होतात. जमिनीचे तुकडे पडतात. दारिद्र्य वाढते– सगळ्यांचेच. पण होरी वडिलकीचा आव व कर्तव्यतत्परता विसरत नाही. धाकटा भाऊ हीरा मत्सराने गाईला विष देऊन मारतो आणि ही गोष्ट होरीला माहित असते. पण हीरावर आळ येऊ नये त्याच्या घराची तलाशी दारोग्याने घेऊ नये म्हणून दारोग्याला लाच देऊन वाटेला लावण्याची तयारी दर्शवितो. हीरा आपल्या घरी विस्तव न्यायला आला म्हणून त्याचे मन आनंदाने फुलून जाते. हीरा पळून जातो, त्याची भांडकुदळ पत्नी पुनिया निराधार होते. पण वडिलकीच्या नात्याने होरी तिचे शेत आपल्या आधी नांगरतो व तिचा सर्व भार आपल्या खांद्यावर घेतो. संयुक्त कुटुंबात झालेले संस्कार होरीच्या मनांत सतत उफाळून येत असतात म्हणूनच पुनियाला ढकलणाऱ्या बांबू खरेदी करणाऱ्याला होरी वडिलकीच्या नात्याने धमकी देतो, दुसऱ्या दमेकरी भावाला मधून मधून धान्य देऊन त्याला मदत करतो. मुलाने (गोबरने) विधवा झनियाला गर्भवती अवस्थेत घरी आणून सोडले, तिला हाकलून द्यायला आलेला होरी तिने पायाला विळखा घालताच आश्रय देतो व सुनेप्रमाणे शेवटपर्यंत प्रमाने वागवतो. चांमार जातीने बहिष्कृत केलेल्या आणि प्रियकराने–मातादीनने झिडकारून दिलेल्या चांभार जातीच्या गर्भवती सिलियाला आपल्या झोपडीत आधार देतो. त्यासाठी गांवकऱ्यांचे सर्व शिव्याशाप सहन करतो.

होरीचे सर्व धान्य सावकारांच्या घरात जाते, उसाचे सर्व पैसे जबरदस्तीने कर्जाची फेड म्हणून कापून घेतले जातात, त्याचे बैल नेले जातात, झोपडी गहाण ठेवावी लागते, जमीन गहाण पडते, शेतजमीनीचा मालक रस्त्यावर मजूर म्हणून कामावर येतो, दातादीनच्या शेतात मजुरासारखे राबावे लागते, गोबर पळून जातो आणि शहरांतून गांवी आल्यावर बापाशी भांडतो, एका मुलीच्या लग्नाला कर्ज घ्यावे लागते तर दुसरी मुलगी चाळीस वर्षाच्या शेतकऱ्याला जवळ जवळ विकावी लागते. या सर्व विपत्ती खर तर जितक्या होरीच्या तितक्याच त्या भारतीय शेतकरीवर्गाच्या आहेत. एक गाय घरी असावी ही साधी इच्छाही पुरी होऊ शकली नाही आणि शेवटी अकाली म्हातारपण आलेला होरी मजुरी करताना उष्म्याचा तडाखा बसून मरून जातो.

व्यक्ती, कुटुंब प्रमुख, शेतकरी वर्गाचा प्रतिनिधी, भारतीय संस्कृतीचे संस्कार घेऊन जगत असणाऱ्या व अकाली मरण भोगणाऱ्या सामान्य जनतेचाही हा

प्रतिनिधि—अशा विविध नात्यांनी होरीचे चित्र प्रेमचंदांनी चितारले आहे. ही सर्व नाती एकमेकांत मिसळून गेली आहेत आणि तरीही आपापल्या परी सर्व स्वायत्त आहेत ही कलाकाराची किमया.

होरीच्या विरुद्ध स्वभावाची धनिया. काहीशी कडक, तापट, अतिशय स्वाभिमानी, प्रसंगी सावकाराला व दारोग्यालाही आव्हान देणारी, जिभेची तिखट, पण माता व पत्नी या दोन्ही भूमिकांत विलक्षण प्रेमळ, सर्वस्व पणाला लावणारी ! दारिद्र्यातही स्वत्व आणि शील यांना जपणारी झुनियाला दिलेल्या आश्रयामुळे वाळीत टाकणाऱ्या बिरादरीच्या लोकाना डिवचण्याकरता झुनियाला मुल झाल्यावर मोठ्यामोठ्याने गांणी म्हणणारी धनिया गोबरची बदललेली वृत्ती पाहून आपल्या सुनेला दोष देते ? भावांसाठी आणि त्यांच्या संसारासाठी जीव ओवाळून टाकणाऱ्या होरीला कटू वाग्बाणांनी घायाळ करते आणि दुःखाच्या वेळी समंजसपणे साथ देते, आपल्या सर्व शक्तीनिशी नवऱ्याचे व मुलांचे संरक्षण मोठ्या हिमतीने करते ! होरी—धनियाचे संबंध म्हणजे जीवनातले सुख व दुःख भोगून परिपक्व झालेल्या दांपत्याने सुखदुःखापलीकडचे आत्मीयतेचे संबंध ! कर्तव्य आणि प्रेम दोन्ही या ठिकाणी एकजीव झालेली. होरीशी अनेक बाबतीत मतभेद पण सदैव उभी होरीच्या बाजूने !

या दांपत्याला दोन मुली सोना व रूपा. याच्या बालपणाचे, विशेषत्वाने तारुण्याचे चित्रण आहेच पण त्यांच्या विवाहाविषयक समस्यांनीही जीवमानुभवाचा गोफ गुंतागुंतीचा केला आहे.

होरीचे दोन भाऊ शोभा आणि हिरा. त्याच्यापासून वेगळे झाले. संयुक्त कुटुंबाचे विघटन आणि दारिद्र्याचे वाटप यामुळे निर्माण होणारे प्रश्न यात आले आहेत.

गोबर झुनियाला सोडून पळतो— वीस कोसावर असलेल्या लखनौ शहरात येतो. रोजगार करतो, मजूर होतो. त्याच्या निमित्ताने जमीन सोडून शहरात रोजगार करायला येणाऱ्या शेतमजुरांच्या समस्येचे वास्तव चित्रित केले आहे आणि नगर व खेडी यांच्या संबंधातील काही धागे उलगडून दाखवले आहेत. गिरणी कामगारांची अवस्था, त्यांची व्यसनें, हरताळ, संप, मारपीट, लाठीमार याचे वर्णन केले आहे आणि जमीन सोडून खेड्यातून शहरात आलेल्या मजुराची

मनोवस्था कशी असत याचे कामगार जीवनाच्या संदर्भात मोठे मार्मिक चित्रण गोबरच्या रुपाने प्रेमचंदांनी केले आहे.

या खेड्यातल्या शेतकऱ्यांच्या जीवनाशी संबंध असतो रायसाहेब या जमीनदाराचा. तो शहरात राहतो आणि आपल्या नोकरांमार्फत नियंत्रण करीत असतो. खेडे व शहर यांच्यातल्या संबंधीचा हा एक दुवा.

शहरी सुशिक्षितांवर सुधारणेचे विचार प्रभाव टाकत होते. त्यावेळी शहरी मध्यमवर्गात दोन प्रवृत्ती प्रबळ होत्या. एक भोगाची होती व दुसरी त्यागाची व लोकसेवेची होती. खेड्यातला कच्चा माल (उदा. ऊस) शहरातील कारखान्यात येतो व पिळवणुकीचा वा शोषणाचा नागर– वेढा घट्ट होती. तसेच समाजसेवेच्या अतिरिक इच्छेने खेड्याकडे जाणाऱ्या सुशिक्षित मध्यम वर्गाचे चित्रणही प्रेमचंदांनी केले आहे. खेड्यातील जनजीवनात येणारी मालती व तिच्याबरोबर येणारे मेहता फार काही करू शकत नाहीत पण वैराण वाळवंटातल्या झुळकीसारखा यांचा ग्राम-प्रवेश किंचित थंडावा होरीच्या जीवनात आणतोच.

प्रेमचंदांनी खेड्यातल्या ग्रामीण जनतेचे करुणाजनक चित्र रेखाटताना शहरी मध्यमवर्ग व उच्च वर्ग यांच्यातल्या ऐषाआरामाचे, वैभवाचे व सुखविलासाचे चित्रही पार्श्वभूमी म्हणून प्रस्तुत केले आहे. हे कलात्मक उपयोजन यांत्रिकपणे केलेले नाही, ते जिवंतपणे आणि वास्तवाचा ज्वलंत भाग म्हणून आलेले आहे. नागर जीवन आणि ग्रामीण जीवन यातले अंतर आणि ज्या बिंदूवर त्याचे संपर्क स्थापित होतात ते संपर्क– बिंदू दोहोचें प्रेमचंदांनी चांगलेच भान ठेवले आहे. आजच्या भारतीय जीवनात या दोहोतले अंतर वाढले आहे आणि प्रत्यक्ष संपर्काची क्षेत्रे कमी आहेत. प्रेमचंदांनी हेच दर्शविले आहे. समीक्षेचा कथा हा मुद्दा येऊन व अधिकारिक कथा, गौण कथा याचे संबंध तपाशीत 'गोदान' चा विचार केला तर वरकरणी दोन वेगळ्या कथा वाटतात. त्यांत संघटन नाही असा आरोपही केला गेला. पण कथा हा प्रेमचंदांच्या कलाकृतीचा मुख्य घटक नाहीच. त्यांच्या कलाकृतीत महत्त्व आहे हे विराट भारतीय जीवनाच्या आविष्काराचे. नागरजीवन व ग्रामीण जीवन हे त्याचे दोन भाग. त्यातले वास्तव अंतर व प्रत्यक्ष संबंध महत्त्वाचे मानले तर 'गोदान' वर कथेच्या दृष्टीने केलेला विघटनाचा आरोप येण्याचे कारणच नाही. प्रेमचंदांच्या कादंबरीत कथा या घटकाला महत्व नव्हते. म्हणून कथेला महत्त्व

देऊन केलेली समीक्षा त्यांना अन्यायकारक तर होतीच पण जुन्या निकषांवर नव्या साहित्याचे मूल्यमापन करण्यासारखा तो प्रकार होता.

## नागर जीवनाचे स्वरुप :

ग्रामीण जीवनाच्या समानंतर नागर जीवनाचे स्वरूप प्रस्तुत करून प्रेमचंदानी 'गोदान' कादंबरीतील वास्तवाला व्यापकतेचे परिमाण दिले एवढेच नव्हे तर ग्रामीण भाव-विश्वाला उठावही आणला.

या समांतरपणाचा अधिक विचार करणे आवश्यक आहे. ग्रामीण जीवनात दारिद्र्य अधिक वाढते आहे, शेतकरी जमिनीवरून उखडला जात आहे. तो शहराकडे रोजगारासाठी धावत येत आहे आणि शहरातल्या जीवनाचा आस्वाद घेतल्यावर त्याला ग्रामीण जीवन फारच भयाण वाटते. नीरस जीव घेणे वाटते. होळीच्या सणासाठी गोबर घरी परततो आणि त्याच्या दृष्टीतून गाव कसे दिसते याचे मोठे प्रभावी चित्र प्रेमचंदानी काढले आहे. होरी दिवसेदिवस मानसिक व शारीरिक दृष्टया खचून जात आहे, धनियाच्या हातून जीवनाचा आनंद आणि सार्थकता दोन्ही गोष्टी निसटून जात आहेत. नागर जीवनात मेहता व मालती यांना समाज सेवेचे व्रत घेऊनच जीवनाचे सार्थक होईल अशी आशा वाटते. दोघे प्रणयाच्या बंधनांनी एक दुसऱ्याला बांधून टाकतात पण समाजसेवा अधिक चांगल्याप्रकारे करता यावी म्हणून विवाहाचे बंधन मालती स्वीकारीत नाही. ती आपले व्यक्ति-स्वातंत्र्य टिकवू पहाते, प्रणय व वैवाहिक जीवनातली सुरक्षितता व आनंद यांना ती लाथाडते. आजीवन प्रेमाच्या रज्जूंनी बद्ध होण्याचा व एकमेकाला आधार देण्याचा निश्चय ती दोघे करतात. आरंभी मालती चैन करणारी स्वच्छंदी स्त्री असते पण मेहताच्या सहवासात आल्यावर तिला आपला फुलपाखरासारख्या जीवनाचे वैयर्थ्य जाणवते. मेहता तत्वज्ञानाचा प्राध्यापक. विवाह म्हणजे बंधन मानणारा आणि स्त्रियांविषयी काहीशी अढी असणारा. पण त्याचीही मते पालटतात. मन बदलते. या मध्यम वर्गातल्या सुशिक्षित माणसांना समाजाच्या उन्नतीसाठी खेड्यातील जनतेकडे जावे असे वाटते.

खेड्यातील मानवी स्वभावाची सार्वकालिक वैशिष्टये इथेही आढळतात. गावात तरुण व सुंदर स्त्रियांवर रुंजी घालणारे गावकरी असतात तसे ते शहरातही असतात. मालतीच्या कृपा-कटाक्षासाठीं मिस्टर खन्ना सर्व प्रकारे प्रयत्न करतात.

खेड्यात गरिबांना लुटणारे छोटे सावकार आहेत तसेच शहरात रायसाहेब व राजा सूर्यप्रतापसिंह यांना एकमेकांच्या विरुद्ध लढवून दोघांकडून पैसा उपटणारे तंखासारखे फसवे लोकही आहेत. मिर्जा खुर्शेदसारखा माणूस निरनिराळ्या योजना तयार करतो व त्या राबवतो. कधी पैसा मिळतो, कधी घालवतो पण त्याला या सर्वांत एक खेळाचा आनंद मिळत असतो. कधी ते खेड्यातून कामासाठी आलेल्या म्हाताऱ्या शेतमजुरांचा कबड्डीचा खेळ आयोजित करतील तर कधी हॉस्पिटल काढतील, कधी वेश्यांची नाटक मंडळीही स्थापन करतील. पण या सर्वांच्या मुळाशी एक कलंदर जीवन जगण्याची उर्मी असते, समाजाचा विचार नसतो.

प्रेमचंदांनी रायसाहेब हे जमीनदाराचे प्रतिनिधित्व करणारे पात्र निर्माण केले आहे आणि त्याच्या चांगल्या व वाईट दोन्ही वैशिष्ट्यांचा पुरेशा सामर्थ्याने दिग्दर्शन केले आहे. आपल्या कुळांबरोबर काहीसे निर्दयपणाने वागणारे रायसाहेब आपल्या मित्रांबरोबर फारच स्नेहाने वागतात आणि त्यांच्या जिवावर चैन करणाऱ्या नातेवाईकांचे गुणदोष माहित असूनही सहिष्णुतेने वागतात. जमीनदार वर्गाच्या दुःखाचे स्वरुपही प्रेमचंदांनी तटस्थपणे चितारले आहे. शहरात वाढत चाललेल्या उद्योगांमुळे खन्नासारखे उद्योगपतीही 'गोदान' मध्ये आले आहेत. धनाच्या पाठीमागे धावणारांच्या नशिबी जीवनातले सुख वा आनंद नसतो हे प्रेमचंदांचे आवडते सूत्र या कादंबरीतही रायसाहेब आणि खन्ना यांच्या माध्यमातून त्यांनी दाखवले आहे.

गाव आणि शहर यातील माणसे माणुसकीच्या नात्याने समान भूमीवरही येतात. गोबर आणि झुनिया यांचे व मालतीचे आत्मीयतेचे संबंध त्यांनी दाखवले आहेत.

## कलात्मक परिपक्वतेची प्रसाद चिन्हे :

'गोदान' कादंबरीतील जवळ जवळ सर्वच चरित्र सृष्टी ही कुशल आणि कलात्मक आलेखामुळे विलक्षण मूर्त व जिवंत वाटते. या पात्रांचे परस्पर संबंध व त्यातून निर्माण होणारे भावनात्मक प्रसंग प्रेमचंदांनी खूपच समरसून रेखाटले आहेत. या प्रसंगात कमालीची नाट्यात्मकता आहे पण कुठेही भडकपणा नाही. ज्याच्या त्याच्या स्वभाव वैशिष्ट्यांप्रमाणे अनुभव घेणे, तो उचित हावभाव व अनुभव यांच्या सहाय्याने व्यक्त करणे, स्वभाव, संस्कृती, परिस्थिती यांचे भान

राखून पात्रांच्या संवादांची योजना करणे यासाठी कलावंताला पर-मन प्रवेशाची सिद्धी अवगत असावी लागते आणि ती जितक्या प्रमाणात असेल तितक्या प्रमाणात तो कलावंत थोर होऊ शकतो. 'गोदान' मध्ये ही पर-काया-प्रवेशाची सिद्धी प्रेमचंदांना चांगलीच लाभलेली दिसते. 'गोदान' मधल्या कुठल्याही प्रसंगांचे बारकाईने अवलोकन केले की प्रेमचंदांच्या या सिद्धीचे भान येते.

या ठिकाणी प्रेमचंदांचे 'रंगभूमि' तले विवेचन आठवते. प्रभुसेवक कवी होता, चिंतक होता. त्याचे भाषेवर प्रभुत्व होते. सजावट करण्याची कला त्याच्या अंगी होती. तो यशस्वीपणे कविता लिहू शकत असे. पण हे सर्व असूनही प्रेमचंद सांगतात की मोठ्या कलावंताला आवश्यक असा दुसऱ्याच्या मनःस्थितीत अवगाहन करण्याची व सहानुभूतीने ती जाणून घेण्याची क्षमता त्याच्या ठिकाणी नव्हती. सहाजिकच तो सामर्थ्यवान कवी होऊ शकला नसता. ही जी अनुप्रवेश सिद्धी कलावंताला उपजत हवी असते ती प्रेमचंदांमध्ये प्रचंड प्रमाणात होती.

कोणत्याही काळी आणि कोणत्याही स्थळी रसिकांना आवाहन करू शकतील असे भाव-प्रसंग किंवा रसात्मक प्रसंग निर्मिणे ही थोर कलावंताची मोठी किमया असते. असे प्रसंग भाषेचे बंधन अतिक्रमित करून सार्वदेशिक आणि सार्वकालिक होतात. 'गोदान' मध्ये अशा प्रसंगांची अखंड मालिका आहे.

होरी जमीनदार रायसाहेबाना भेटायला जातो तो पहिलाच प्रसंग धनिया व होरी यांच्यामधील भिन्न स्वभाव-वैशिष्ट्यांचा. भिन्न व्यक्तित्वांचा आणि तरीही त्यांच्यात असलेल्या उत्कट गार्हस्थ्य प्रेमाचा एक हृदयस्पर्शी चित्रपट प्रस्तुत करतो. भोलाला विधुरावस्था जाचक वाटते व पन्नाशी उलटून गेल्यावरही एक पत्नी हवीशी वाटते. त्याच्या या कमजोरीचा उपयोग करून होरी त्याच्याकडून गाय उपटतो ही फसवणूक करताना होरीच्या मनात खूप उलघाल होते, नैतिक बोचणी त्याच्या मनाला व्यथा देते पण शेतकऱ्याची व्यवहार कुशलता व स्वार्थीपणा यांचा वरचष्मा होतो. या प्रसंगात भारतीय शेतकऱ्याचा स्वभाव तर व्यक्त होतोच पण प्रेमचंदांची चारित्र्य सृष्टी किती संमिश्र असते याचाही बोध होतो. गाय आणायला गेलेली युवावस्थेच्या उंबरठ्यावर असलेली गोबर आणि भोलाची तरुण विधवा कन्या झुनिया यांच्यातला प्रथम प्रणय प्रसंग तर प्रेमचंदांच्या मानवी मनाचा मागोवा घेण्याच्या कलेचे मोठे उदाहरण आहे. हा उन्मादक प्रणय प्रसंग पात्रांच्या अनागर व्यक्तित्वाचे मान ठेऊन इतक्या हळुवारपणे आणि संयमाने रेखाटला आहे की

प्रेमचंदांना प्रणयाचे चित्र जमत नाही अशा शेरा मारणाऱ्या फिराक गोरखपुरी-सारख्या रसिकाने पुन: पुन: वाचून आपल्या मनाचा पुनर्विचार करावा. आपल्या भावाने गाईला विष देऊन मारल्याचे ठाऊक असताना त्याला वाचवू पहाणाऱ्या व कुटुंबाची 'मर्यादा' अलांछित राखू इच्छिणाऱ्या होरीचे आणि विलक्षण दु:खाने क्रोधविष्ट झालेल्या धनियाचे भांडण व त्यातून उद्‌भवलेले समर प्रसंग वाचकाच्या मनावर होरी, धनिया त्यांच्या परिस्थितीचा फायदा घेणारे गांवातलें सावकार व सरकारी अधिकारी या सर्वांची मोठी प्रभावी छाप उमटवतो. गर्भवती झुनियाला आपल्या आईबापांपाशी सोडून गोबर पळून जातो. या सर्व प्रसंगात तर धनिया व होरी यांच्या मनाचं स्वाभाविक औदात्य, माणुसकीचे प्रचंड भान आणि प्रेमचंदांची नाट्यमय प्रसंग निर्मिण्याची विलक्षण ताकद यांचा चांगलाच प्रत्यय येतो. बहिष्काराच्या प्रसंगात होरी व धनिया यांच्या वेगळ्या प्रतिक्रिया आणि या प्रसंगात व्यक्त होणारे कारुण्य, धर्मभीरूता, माणुसकीचा प्रचंड गहिवर आणि जातिप्रथा व गावकी याचे निर्घृण रूप यांचा संमिश्र अनुभव हे सर्व फार परिणाम-कारक आहे. गोबरचे दोन अडीचशें रुपये गाठीला बांधून गावी आगमन आणि त्यानंतरचे वात्सल्य, प्रेम, करुणा, हास्य इत्यादी विविध भावांनी नटलेले प्रसंग ग्रामीण संस्कृतीवर चांगलीच प्रभाव टाकतात. यातून निर्माण होणारी धनिया व झुनिया यांच्यातील धुसपुस, गोबरचे होरीशी काहीसे तिखट वागणे आणि तरीही आशीर्वादाचा वर्षाव करण्याचे माता–पित्याचे वात्सल्य यांचा कलात्मक अविष्कार संमिश्र भावनांचे इंद्रधनुष्य रसिकाच्या मनात उत्पन्न करतो. शहरात गेल्यावर गोबरचे पालटलेले दिवस, त्यामुळे त्याचा बदललेला स्वभाव व झुनियाशी त्याचे पूर्णपणे बदललेले वागणे या सर्वांच्या पार्श्वभूमीवर गर्भवती झुनियाला मदत करणाऱ्या चुहियाची प्रगाढ सहानुभूती माणसाच्या ठायी असणाऱ्या प्रचंड सद्-भावनांचे महात्म्य दर्शवते. तिकडे चांभार सिलिया व ब्राह्मण मातादीन यांच्या प्रेमातून निर्माण होणाऱ्या विविध धार्मिक व सामाजिक समस्या व त्यातून दिसणाऱ्या मानवी मनाच्या विविध वृत्तींचा मोठा चित्ताकर्षक आविष्कार प्रेमचंदांनी केला आहे. पुढे सिलियाच्या मुलाच्या मृत्यूप्रसंगी मातादीनचा झालेला संपूर्ण हृदय-पालट स्वाभाविकतेच्या पातळीवर ठेऊन कलात्मकता तर साधली आहेच पण रसिकांवर पवित्र संस्कार करण्याचे कार्यही केले. सोनाच्या विवाहप्रसंगी धनिया व होरी यांच्या मनातील विचित्र आरोह-अवरोह त्यांच्या स्वभावाचे

किती तरी पैलू प्रकट करतातच पण भारतीय संस्कारांच्या गडदपणाविषयी खातरजमाही करतात. प्रेमचंदांची सर्वच चरित्र सृष्टीही इथल्या मातीतून उपजलेली पूर्ण देशी वाटते याचे कारण प्रेमचंदांनी भारतीय मानसाचे मूलस्त्रोत उत्तम प्रकारे अवगत करून घेतले होते. वेळोवेळी होरीच्या शोषणाचे प्रसंग तर भारतीय समाजातील अनेक प्रकारच्या विषमतेवर, अंतर्विरोधांवर आणि व्यवस्थेच्या निर्घृण व्यवहारावर प्रखर प्रकाश झोत टाकून या एकूण व्यवस्थेच्या विरुद्ध विद्रोहाची प्रचंड आग निर्माण करतात. थोर साहित्याच्या मोठेपणाचे एक गमक असे सांगितले जाते की ते वाचल्यावर वाचक पूर्वीचा राहात नाही. त्याचे आंतरिक व्यक्तित्व बदललेले असते. ‘ गोदान ’ संवेदनशीलपणे वाचणारा वाचक सामाजिक, धार्मिक आणि आर्थिक विषमतेवर आधारलेल्या समाजरचनेचे खरे स्वरुप उघड्या डोळ्यांनी पहातो. मनाने अनुभवून झिणझिणतो आणि बुद्धीने सुन्न होऊन जातो. ‘ गोदान ’ वाचल्यावर खरा रसिक जीवन सुखमय नाही, ते दुःखाने ठाम भरलेले आहे. या जाणिवेने अस्वस्थ तर होतोच पण ज्या समाज व्यवस्थेत होरी, धनिया यांच्यासारख्या माणसांना जगण्याची शिक्षा भोगावी लागते त्या समग्र व्यवस्थेविरुद्ध खोलवर विद्रोही भूमिकेत उभा राहातो. होरीचे शेतमजूर होणे, पुढे रस्त्यावर मजूराचे काम करणे आणि त्यात उष्म्याच्या लाटेने मरून जाणे हे सर्व प्रसंगच प्रेमचंदांनी मोठ्या ताकदीने रंगविले आहेत. होरीच्या शेवटच्या अवस्थेचे चित्रण तर केवळ अद्वितीय आहे. या कादंबरीतले कितीतरी प्रसंग कलाकृतीच्या एकूण अनुभवविश्वाला सरस, समृद्ध आणि जिवंत तर बनतातच पण वाचकांवर फार मोठा शिवत्वाचा संस्कार करून जातात. जीवनाचे नग्न सत्य, प्रेमचंदांच्या शिवत्वाची ओढ आणि कलावंताची सौंदर्य सृष्टी यांचे इतके अद्वैत फार कमी कलाकृतीत आढळते.

हे सर्व लिहिताना जाणीव होते ती एवढीच की प्रेमचंदांच्या ‘ गोदान ’ चे मोठेपण शब्दात पकडून सांगणे अशक्य आहे. त्याकडे फक्त अंगुलिनिर्देश करून एवढेच म्हणणे शक्य आहे—— ‘ स्वतः अनुभवावे.’

●●●

## खंड - ४

# प्रेमचंदांची लघुकथा

- बडे घर की बेटी
- पंचपरमेश्वर
- शतरंज के खिलाडी
- सुजान भगत
- गुल्ली डंडा
- पूस की रात
- दो बैलों की कथा
- ठाकुर का कुआँ
- ईदगाह
- नशा
- दूध का दाम
- बडे भाईसाहब
- कफन

## प्रेमचंदांची कथा :

प्रेमचंदांनी सुमारे ३०० कथा लिहिल्या. संख्येच्या दृष्टीने या कथा जगातील कोणत्याही मोठ्या कथालेखकाच्या तुलनेने कमी नाहीत आणि गुणवत्तेच्या दृष्टीनेही यातील सुमारे २०-२२ कथा चेकाव्ह, मोपाँसासारख्या कथालेखकांच्या तोडीच्या कथा ठरतील. प्रेमचंदांनी केवळ कथाच लिहिल्या असत्या तरी त्यांना महान साहित्यिकाचा दर्जा प्राप्त झाला असता.

प्रेमचंदांच्या कादंबऱ्या व कथा यात जीवनदृष्टी व साहित्यविषयक दृष्टिकोण यात फरक नाही. मात्र त्यांच्या कादंबरीपेक्षा त्यांच्या कथा कलात्मक दृष्टचा अधिक यशस्वी आहेत असे मानणारे समीक्षक आहेत. याचे मुख्य कारण असे की प्रेमचंदांच्या कादंबरी वाङ्मयात विस्तार फार आहे आणि त्यामुळे त्यात काहीसा पसरटपणाही आला आहे असे एक मत आहे. त्या दृष्टीने त्यांच्या अधिकांश कथा विलक्षण बांधेसूद आणि तंत्र दृष्टचा फार निर्दोष अशा झालेल्या आहेत.

प्रेमचंदांनी हिंदी कादंबरी वाङ्मयाला वास्तवाभिमुख केले तसेच कथा वाङ्मयालाही वास्तवाचा भक्कम आधार दिला. प्रेमचंदांचे समकालीन कथाकार जयशंकर प्रसाद वृत्तीने रोमँटिक होते, प्रेम हा त्यांच्या कथांचा केंद्रीय भाव होता त्यांच्या कथांत मानवी मनांतील अंतर्द्वंदे तरलपणे चित्रित झालेली आहेत. त्यांची माणसे काहीशी विशिष्ट समाजापासून वेगळी व स्वतःच्या भावविश्वांत अस्वस्थ झालेली दिसतात. या उलट प्रेमचंदांचे कथाविश्व सामान्य माणसांनी गजबजून गेलेले आहे. प्रेमचंदांची अधिकांश पात्रे तुमच्या आमच्या जीवनातून उठून आलेली वाटतात. सामान्य माणसाच्या जीवनात जितके प्रेम या भावनेला महत्त्व असते तितकेच प्रेमचंदांच्या कथाविश्वांतही आहे. म्हणजेच त्यांनी प्रेम या भावनेला उचित स्थान दिलें असले तरी तीच भावना जीवनातील सर्वश्रेष्ठ व एकमेव महत्त्वाची असे मानले नाही. प्रेमाबरोबरच इतर भौतिक दुःखानी गांजलेली माणसे प्रेमचंदांच्या कथाविश्वात मोठ्या प्रमाणांत दिसतात.

प्रेमचंदांचे कथाविश्व नाना प्रकारच्या माणसांनी समृद्ध झालेले दिसते. यात भिन्न वयोगटाची माणसे आढळतात. खोडया करणारी बालके आणि किशोर

वयाची मुले आहेत. बालकांच्या मनोविश्वाची चांगलीच जाण प्रेमचंदांना होती. त्यांच्या क्रीडा, त्यांचे मोठ्या माणसासंबंधी रागलोभ, परस्पर स्पर्धा यांचे सूक्ष्म; निरीक्षण प्रेमचंदांनी केलेले होते. प्रेमचंदांनी तरुण स्त्री–पुरुषांच्या अनेक प्रकारच्या समस्यासंबंधी व संबंधांविषयी लिहिले. ग्रामीण स्त्री–पुरुषांतील प्रणय हे तर त्याचे खास क्षेत्र आहे. हा प्रणय जीवन व्यवहारापासून अलग संपन्न होत नसतो तर जीवनातल्या हरघडीच्या समस्यांतूनच निर्माण होतो व फुलतो. नागर युवक युवतीच्या सफल असफल प्रेमाविषयीही त्यांनी कथा लिहिल्या. मात्र त्यांच्या या कथां तप्रणयाच्या रमणीय आविष्काराऐवजी त्याचे विश्लेषण व त्यांतून उद्‌भवणाऱ्या समस्यांचे प्रकटीकरण अधिक आहे. वयाने काहीशी प्रौढ झालेली माणसे तर प्रेमचंदांच्या कथांत मोठ्या प्रमाणावर आहेत. वृद्ध स्त्री–पुरुषांची विविध रूपे प्रेमचंदांनी फार कुशलतेने चित्रित केली आहे.

प्रेमचंदांची पात्रे अनेक वर्गांतून आली आहेत. अस्पृश्य जीवनावरच्या अनेक कथा त्यांच्या व्यापक सहानुभूतीचे दर्शन घडवतात. जमीनदार, सावकार, ब्राह्मण–पुरोहित हा शोषक वर्ग व अस्पृश्य यांच्या संबंधावर आधारलेल्या कथा वाचल्या तर प्रेमचंद पहिले दलित कथाकार होते असे म्हणावे लागेल. 'सद्‌गति' 'ठाकुर का कुआँ,' 'कफन' या त्यांच्या अत्यंत श्रेष्ठ मानल्या जाव्यात अशा कथा. आर्थिक अडचणींनी जेरीस आलेल्या मध्यमवर्गाची दुःखेही त्यांनी कथांतून व्यक्त केली आहेत. मध्यमवर्गीय जीवनातल्या नानाविध समस्यांनी त्यांची कथा भरपूर व्यापली गेली आहे. यांत विधवेची दुःखे आहेत, विधवा–विवाहाचे प्रश्न आहेत. जरठ विवाहातून निर्माण झालेल्या गंमती व आपत्ती आहेत, आंतरजातीय विवाहाचे प्रश्न आले आहेत. अनेक बायकांच्या दादल्याची कर्मकटकट आली आहे. प्रेमचंदांनी १९१० ते १९३६ या कालावधीत कथा लेखन केले. या काळात भारतीय नागर समाज संयुक्त कुटुंबातून विभक्त कुटुंबपद्धतीकडे चालला होता माणसे उखडली जात होती. यातील सुख-दुःखे विशेषतः दुःखे प्रेमचंदांनी मोठ्या सहानु-भूतीने व्यक्त केली. विशेषतः खेड्यात राहाणाऱ्या माणसाचे कुटुंब विभाजन म्हणजे दारिद्र्याचे वाटप ही दुखद घटना त्या त्या कथांतून वारंवार येते. प्रेमचंदांचा माणूस कुटुंबात राहाणारा, कौटुंबिक भावनात्मक संबंधांनी बद्ध झालेला माणूस आहे. त्यांच्या छोट्या कथांतून आलेली मोजकी माणसेही स्वतःच्या भावविश्वांत. एकटी फारशी नसतात. कुटुंब व बाहेरचा समाज यांच्याशी त्याचे फार दृढ संबंध

असतात. 'बडे घर की बेटी' मधल्या कुटुंबातील बिघडत चाललेल्या संबंधांशी व माणसांच्या मानसिक ताणांशी बाहेरच्या माणसांचा काहीतरी संबंध असतोच खालच्या वर्गातील जीवन तर वैयक्तिक असे फारसे नसते. यामुळे प्रेमचंदांनी काम ग्रंथींनी उत्तेजित झालेली व आपल्याच एकटेपणाचा भोग करणारी माणसे रंगविली नाहीत हे खरे आहे. पण त्यांनी जी माणसे आणली ती आपल्या परंपरा, जातीची बंधने, वर्गाच्या शृंखला, सामाजिक स्थितीचे पाश यांनी जखडलेली माणसे आहेत. म्हणजेच ती सामान्य जीवनातील सामान्य माणसे आहेत— वास्तववादी जीवन दृष्टीने त्यांच्या कथांतीला माणसांची त्यांच्या व समस्यांची निवड झालेली आहे. मधूनच त्यांच्या कथात वेश्याही येतात. पतिता तर येतातच. जमीनदारी व्यवस्था, नोकरशाही, पोलिस यंत्रणा, न्याय–पद्धती यावर प्रेमचंदांनी आपल्या कथांतून आसूडच ओढले आहेत.

प्रेमचंदांच्या कथांना मानवी मनाचे मजबूत अधिष्ठान आहे. खरे तर त्यांच्या कथा सारांश रूपाने प्रस्तुत करता येतात. कारण त्यात कथातत्व असते. घटनांची मालिका असते, या घटनांमध्ये क्रम असतो. पुष्कळसा हा क्रम कालानुसारही असतो. पण या कथांचा सारांश सांगितला तर कथांतील प्राणच हरवून जातो कारण त्यांच्या कथा घटनांवर आधारलेल्या नसतात, त्या पात्रांच्या मनोविश्वावर आधारलेल्या असतात. हे मनोविश्व रुग्णाचे नसते वा केवळ कामपिडितांचे नसते. भारतीय समाजांत जितके काम–भावनेला महत्व आहे तेवढे प्रेमचंदांनी दिलेले आहे. पण माणसे काम भावनेवरच जगत नसतात तर माणसांच्या जगण्याच्या प्रेरणा अनंत असतात याची खूणगाठ प्रेमचंदांनी बांधून ठेवलेली असल्यामुळे त्यांच्या कथांत नाना प्रेरणांनी जगणारी माणसे येतात. ज्या प्रमाणात कुटुंब, कुटुंबांतील संबंध, जात–बिरादरी व वर्ग, परंपरा, धर्म यानी भारतीय माणसाचे मन 'सामान्य' बनविलेले आहे. त्याप्रमाणातच प्रेमचंद ते मूर्त करतात. म्हणजेच प्रेमचंदांची माणसे पूर्णपणे देशी असतात, भारतीय असतात. म्हणूनच प्रभावितही करतात.

प्रेमचंदांच्या कथांत सामाजिक समस्यांनी विद्ध झालेले जीवन येते तसेच राष्ट्रीय प्रश्नांनी उत्तेजित झालेले वातावरणही येते. देशासाठी सर्वस्वाचा होम करणारी माणसे येतात, त्यांच्या भौतिक दृष्टचा दुःखमय झालेल्या जीवनाचा आलेख पहायला सापडतो आणि उदात्त भावनांनी सार्थक झालेल्या क्षणांचा प्रत्ययही त्यांची पात्रे देतात. यात त्यागी माणसे आहेत तशीच राष्ट्र सेवेच्या

नावावर स्वार्थ साधणारी माणसेही आहेत. राष्ट्रीय जीवनांत जे अंतर्विरोध भारतीय नेतृत्वांत आढळतात ते प्रेमचंदांच्या कथांतून दृष्टिगोचर होतात. त्यांच्या कथांतून फसव्या व आपमतलबी नेतृत्वावर घणाघाती आघात आहेत. जेलमधल्या वातावरणाने पीडित झालेली परंतु जीवन–सार्थकतेच्या समाधानाने प्राण त्यागणारी माणसे आहेत. प्रेमचंदांनी काही ऐतिहासिक कथाही लिहिल्या. पण त्याचे प्रयोजन ऐतिहासिक वातावरण निर्माण करण्यापेक्षा ऐतिहासिक पात्रांचा उज्ज्वल आदर्श निर्माण करणे हे आहे.

प्रेमचंदांवर सुधारणावाद किंवा उदारमतवाद, गांधीवाद व साम्यवाद यांचा प्रभाव पडला आणि त्यांच्या कथांतूनही तो प्रतिबिंबित होतो. पण त्यांच्या कथांतील अनुभवांत विचार इतके विरघळून गेलेले आहेत की कुठेही काही बाहेरून आलेले आहे– अनुभवबाह्य आहे म्हणून कलाबाह्य आहे असे वाटत नाही. त्यांच्या मनावर आदर्शवादाचा प्रभाव होता. कादंबरी वाङमयात कधी त्यांचा अस्वाभाविक प्रभाव काहीसा कलेला मारकही ठरलेला आहे पण कथावाङमयात अशी फसलेल्या कथांची उदाहरणे फारच कमी आहेत. सर्व कथांचा दर्जा सारखा नाही हे खरे आहे पण दुय्यम दर्जाच्या कथांतही आदर्शवादातून आलेली हृदयपरिवर्तने व उदात्त शेवट अस्वाभाविक वाटत नाहीत. प्रेमचंद काळाबरोबर सतत गतिमान राहिले आहेत. जमीन व श्रम यांच्याविषयी अतोनात ओढ असलेला शेतकरी, शेवटी या दोहोपासून दूर होतो. ('पूस की रात', 'कफन') हा प्रवास केवळ वैचारिक नव्हता. तो जीवनाच्या प्रत्यक्ष निरीक्षणाने, साक्षात् संबंधाने घडला होता. म्हणूनच त्यांच्या कथांतून अमूर्त, अस्पष्ट असे काही नसते. जे असते ते सर्व ठोस, मूर्त व स्पष्ट.

प्रेमचंदांची लघुकथेच्या रूपावरची, तंत्रावरची पक्कड अगदी घट्ट होती. 'बडे घर की बेटी' (१९१०) पासून 'कफन' (१९३६) पर्यंतच्या सर्व कथा याची साक्ष देतात.

त्यांच्या कथांतील घटना वास्तव जीवनांतील व्यावहारिक घटना असतात. त्यामुळे त्यांत अंगभूत विश्वसनीयता असते. अवास्तव व कल्पित वाटणारे प्रसंग प्रेमचंदांच्या कथांतून दाखवता येणार नाहीत. घटनांतील क्रमांत कार्यकारण भाव असतो पण त्याचा आधार सामान्यतः मानवी मन व त्याची परिस्थिती यांचा व्यावहारिक संबंध असतो. माणसाचे मन व त्याच्या भोवतालची परिस्थिती यांचे

परस्परांना प्रभावित करणारे संबंध प्रेमचंदांनी मान्य केले आहेत म्हणूनच त्यांची पात्रे परिस्थितीला वाटेल तशी वाकवू टाकणारी वा मनस्वी आकार देणारी, अद्वितीय शक्ति-केंद्रे असलेली नसतात तसेच ती केवळ परिस्थितीच्या हातची निर्जीव वा यांत्रिक प्रतिक्रिया करणारी बाहुली नसतात. व्यापक व खोलवर अर्थाने आर्थिक व भौतिक परिस्थितीचे प्राबल्य प्रेमचंद मान्य करतात पण त्याचा आग्रही वा अति-वादी आविष्कार त्यांच्या कथांतून होत नाहीत. म्हणूनच त्यांच्या पात्रांना संवेदना असतात, मनोवृत्ती असतात, स्वभाव असतो व भावनांचे आरोह अवरोह ही असतात. मात्र कर्तुमअकर्तुम शक्तीचा प्रत्यय देणारी ही माणसे नसतात. प्रेमचंदांच्या पात्रांना 'स्वभाव' असतो. प्रेमचंदांच्या पुढच्या काळात विशिष्ट क्षणी विशिष्ट मनोवृत्ती वा 'मूड' ने उत्तेजित झालेली पात्रे कथा साहित्यात आली. या पात्रांना मनोवृत्ती होत्या, या मनोवृत्ती उत्कटही होत्या व त्या मनोवृत्तींच्या प्रचंड दबा-वांनी त्यांचा स्थायी स्वभाव उखडला जातो. पण प्रेमचंदांच्या काळच्या पात्रांच्या मनोवृत्तीना 'स्वभावा' ची भरभक्कम बैठक होती. माणसे संज्ञाप्रवाह, अवचेतन मनाची अतार्किक शक्ती यांनी भारावून बाहेर निष्क्रिय पण आतून उत्तेजित झालेली नव्हती. म्हणूनच असे म्हणता येईल की प्रेमचंदांनी माणसांचे नानाविध नमूने प्रस्तुत केले– माणसांच्या केवळ मनोवृत्ती दाखविण्यात त्यांना फारसा रस वाटला नाही. याचा अर्थ असा नाही की मनोवृत्तीचे चित्रण करण्यात प्रेमचंदांचे कसब कमी पडत होते. त्यांच्या पात्रांत प्रणय, ईर्ष्या, निष्फळ क्रोध, समर्पणाची आकांक्षा, उत्कट वात्सल्य, सन्मानलालसा, विद्रोह, इत्यादी असंख्य मनोवृत्ती व्यक्त झाल्या आहेत. पण त्यांना पात्रांच्या स्वभावाचा आधार आहे. विविध वयाच्या व स्वभावाच्या माणसांच्या मनांत अनुप्रवेश करण्याची सिद्धी प्रेमचंदांना लाभलेली होती. आणि म्हणूनच त्यांच्या यशस्वी कथा कोणत्याही काळात टिकून राहातील अशा आहेत.

प्रेमचंदांनी आकाराने फार छोटया 'ठाकूर का कुआँ' सारख्या कथा लिहिल्या तर 'अलग्योझा' सारख्या दीर्घ कथाही लिहिल्या. एक व्यक्तीच्या मनोभावांच्या चित्रणापासून तो तीन तीन पिढयांच्या जीवनावस्थांच्या दिग्दर्शना पर्यंत सर्व तऱ्हेच्या कथा त्यांनी लिहिल्या. कथांतील घटनांचा व पात्रांचा अनिवार्य तेवढाच उपयोग करण्यात प्रेमचंद कुशल होते. स्वाभाविकतेच्या व विश्वसनीयतेच्या तत्त्वांना बाधक न होता घटनांची कलात्मक मांडणी करून कथेत

कुतूहल व जिज्ञासा शेवटपर्यंत कायम ठेवण्याची किमया प्रेमचंदांना लाभलेली होती आणि त्यांची ही किमया इतकी सहज होती की कथेच्या अनुभवापासून प्रयत्नपूर्वक दूर जाऊन विश्लेषक बुद्धीने समजून घेतल्याशिवाय या किमयेचा 'चमत्कार' जाणवत नाही. त्यांच्या कथांत निवेदन असते, निवेदनांत प्रचंड प्रवाह व गती असते, त्या प्रवाहात जीवनसंवादी सहजपणा असतो म्हणूनच प्रेमचंदांची कथा वाचताना असे वाटत राहाते की आपण आसपासचे जीवन अधिक बारकाईने पाहात आहोत. यात जी सहजसिद्ध अशी कलात्मक किमया असते तिचे मोठेपण अकृत्रिमपणे मनावर प्रभाव टाकते पण वेगवेगळेपणाने जाणवत नाही.

प्रेमचंदांना इतके सांगायचे होते आणि ते सांगणे इतके महत्वाचे होते की त्यासाठी जाणूनबुजून प्रयोग करण्याचे कारणच नव्हते. मात्र त्यांच्या निवेदनाकडे जागरुकतेने पाहिले की त्यातले 'नाटच' ध्यानात येते. हे नाटच केवळ संवादापुरते मर्यादित नसते तर वाक्यापासून ते घटनांच्या मालिकेपर्यंत ते सर्वव्यापी असते आणि असे असूनही ते 'नाटकी' वाटत नाही. प्रेमचंदांनी विरोध (Contrast) या तत्वाचा जो उपयोग कथा विश्वात सातत्याने व प्रचुरतेने करून घेतला आहे तो पहाण्यासारखा आहे. कथेच्या प्रवाहात मध्येच ते अशी काळजाला भिडणारी 'धुन' वाजवतात की आश्चर्य वाटावे. त्यांच्या कथा-प्रवाहात सांपडलेल्या वाचकाचे तिकडे वेगळे असे लक्षच जात नाही. अप्रत्यक्ष परिणाम मात्र होत राहातो.

अनुभवाचे बीज फुलविण्याचे प्रेमचंदांचे कसब वाखाणण्यासारखे आहे. यासाठी ते घटना व प्रसंगांची निर्मिती तर करतीलच पण कधी मधूनच व्याख्यानेही देतील. किस्से सांगतील, पात्रांच्या मनोवृत्तींशी स्वतः एकरूप होऊन वाचकांना बरोबर वहात नेतील. कधी दूर राहून चित्रमय विश्व वाचकांसमोर ठेवतील तर कधी त्या विश्वात स्वतःच गुंतून गेल्याचेही दाखवतील. कलावंताने आपल्या विश्वाशी कसे व कधी समरस व्हावे, त्यांत किती गुंतून जावे व त्याचवेळी किती तटस्थही असावे याचे उत्तम उदाहरण प्रेमचंदांची कथा प्रस्तुत करते. दोन चार वाक्यांतच कथेतील अनुभवाला अधिक व्यापक कसे करावे. व जीवनाच्या विविध स्तरांशी कसे जोडावे हे प्रेमचंदांकडून नवोदित कलावंतानी शिकण्यासारखे आहे.

प्रेमचंद मोठे कलावंत होते. पण त्यांच्या जीवनाशयाने समृद्ध असलेल्या कथांतून त्यांचा कलावंत वेगळा जाणवत नाही. शेवटी जीवनानुभव मूर्त व साकार

करण्यात फुलवण्यात, समृद्ध करण्यात व प्रभावीपणे प्रतीतिक्षम करण्यात सर्व कसब उपयोगात आणायचे असते. हा जीवनानुभव वाचकापर्यंत पोचवितांना कलावंत स्वत:कडे वेगळेपणाने ध्यान आकर्षून घेतच नाही. कारण तो खऱ्या अर्थाने मोठा ' बहुरूपी ' असतो. प्रेमचंद असेच ' बहुरूपी ' कलाकार होते.

प्रेमचंदांच्या काही निवडक कथांचा समीक्षात्मक परिचय या ठिकाणी दिला आहे. एकेका कथेवर एकेक स्वतंत्र लेख लिहावा इतका बारकावा व कलात्मक कसब या कथांतून दिसते. पण या समीक्षणांचा उद्देश केवळ मूळ कथा (शक्य झाल्यास हिंदीतूनच) वाचकांनी वाचाव्या एवढाच आहे.

## (१) बडे घर की बेटी : (जमाना, डिसेंबर १९१०)

१९१० साली 'जमाना' मध्ये प्रथम उर्दूत प्रकाशित झालेली ही कथा लघुकथा या वाङ्मय प्रकारावर प्रेमचंदांचा केवढा अधिकार होता याची साक्ष देते.

प्रेमचंदांची सामाजिक वास्तवावरची पकड जबर होती. याचेही प्रमाण या कथेच्या रूपाने मिळते. एकत्र कुटुंब व्यवस्थेत एक भाऊ नोकरदार व दुसरा काहीसा उनाड असला की विघटनाची बीजे कशी अंकुर धारण करतात याचे सूचन ही कथा करते. शिवाय एखाद्या अधिक श्रीमंत घराण्यातली कन्या काहीशा सामान्य परिस्थितीच्या कुटुंबात आली की तिला जुळवून घेताना कसा त्रास होतो याचेही सूचन यात झाले आहे. पण भारतीय स्त्रीच्या मनावर एकत्र कुटुंबातील वातावरणाचे, दीर, सासरा, यांच्याबद्दलच्या आदराचे जे संस्कार बद्धमूल झालेले असतात तेही वास्तवाचा एक भाग आहे. या कथेतील आनंदी मोठ्या घराण्यातली; तिचा पती नोकरदार व धाकटा दीर उनाड. हा उनाड दीर, एक दिवस होले मारून आणतो व मांस शिजवायला सांगतो. जेवताना तूप नव्हते म्हणून रागावतो, आनंदी सांगत की सर्व तूप मांस शिजवताना संपले. भांडणाला सुरवात होते, उणीदुणी काढली जातात. दीर आनंदीच्या माहेरबद्दल अनुद्गार उद्गार काढून आनंदीचा अपमान करतो. आनंदीला माहेरचा अपमान सहन होत नाही. तीही प्रत्युत्तर करते त्यात माहेरच्या श्रीमंतीचा गर्व असतो. दीर तिला खडावा फेकून मारतो. अपमानित झालेली आनंदी रुसते, नवऱ्याला सर्व सांगते. नवरा अलग राहायचा निर्णय जाहीर करतो. कुटुंबात मोठे उदास व दुःखमय वातावरण निर्माण होते. लहान

भाऊ उनाड असला तरी एकत्र कुटुंबातले वडिल भावाबद्दलच्या आदराचे संस्कार त्याच्या मनावरही झालेले असतात. वडिल भाऊ आपल्यामुळे घर सोडून जातो आहे हे पाहिल्यावर पश्चातापाने तो स्वतःच घर सोडण्याचा निर्णय घेतो. तो वहिनीचीही क्षमा मांगतो. दोन भावांना अलग करणारी ही घटना आनंदीला सहन होत नाही. ती छोटचा दिराला घर न सोडण्यास बजावते. दोन्ही भावांतले मनोमालिन्य दूर होते.

कथेचा शेवट प्रेमचंदांनी आदर्शवादी व भावुक पद्धतीने केला असा आरोप काही समीक्षकांनी केला. पण १९१० च्या आसपास एकत्र कुटुंबाचे संस्कार किती गाढ होते आणि स्त्रीच्या मनावर–कुलीन घराण्यातून आलेल्या स्त्रीच्या मनावर ते केवढे प्रबळ होते याची जाणीव माणसाचे मन जाणणाऱ्या प्रेमचंदांना असल्यामुळे त्यांनी शेवट अगदी वास्तववादी पद्धतीनेच केला आणि कथेची मनोविज्ञानाची बैठक पक्की ठेवली असेच म्हटले पाहिजे.

ही कथा निवेदनात्मक पद्धतीने लिहिली आहे आणि निवेदन प्रेमचंदांच्या चित्रात्मक शैलीमुळे जिवंत झाले आहे. एका काळच्या श्रीमंत पण आता परिस्थिती बिघडल्यामुळे काहीसे अवनत झालेल्या कुटुंबाचे वर्णन केले आहे. अशा कुटुंबात सहाजिकच एखादा युवक शिक्षण घेऊन परिस्थिती सावरण्याचा प्रयत्न करतो. दुसरा परंपरांचे सामंती संस्कार झाल्यामुळे उनाडक्या करतो. पती मिळवता असेल तर त्याच्या पत्नीला वेगळे राहाण्याचे विचार परवडतात. त्याप्रमाणे आनंदीच्या मनातही धुसफुस असते. (ही धुसफुस असली तरी एकत्र कुटुंबातील नात्यागोत्याचें संस्कार अधिक खोलवर असतात) ही धुसफुस व दिराचा उनाडपणा यातील संघर्ष अनिवार्य असतो. मिळवत्या माणसाचा अहंकारही काहीसा टोकदार असतो. त्याप्रमाणे एकत्र कुटुंबाचे समर्थन करणारा श्रीकंठ पत्नीला धाकटचा भावाने अपमानित केले हे पाहिल्यावर चिडतो. प्रेमचंदांनी ही मनाची जाण आरंभापासून सतत ठेवली आहे. मुलगा मिळवता असला तरी त्याला दोन कठोर शब्द सुनविण्याचा अधिकार बापाला असतोच. त्याप्रमाणे बेनीमाधव सिंह चिडतात. त्यांना वेगळे राहाण्याचा मुलाचा निर्णय दुःखमय वाटतो. या कौटुंबिक संघर्षाला वारे घालून अधिक भडकावणाऱ्या गावच्या लोकांचे वर्णनही प्रेमचंद सहजपणे जाता जाता करतात व कथेला अधिक व्यापकपणा आणतात. गावकऱ्यांच्या कुजबुजीचा अर्थ वयस्क बेनीमाधव जाणतात पण बी. ए. पास तरुणाला तो कळत

नाही ! लाल बिहारीला आपल्या कर्त्याधर्त्या व शिक्षित भावाबद्दल आदर असतो व त्यामुळे त्याला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप होतो. हे अतिशय स्वाभाविकपणे प्रेमचंदांनी दाखवले आहे. आपल्यामुळे घर फुटते आहे व आपल्या प्रिय बंधूला आता जावे लागते आहे याची टोचणी स्वाभाविक धाकट्या भावाला असह्य होते. प्रेमचंदांनी शेवटपर्यंत मानवी मनाच्या वास्तवाचे भान जागृत ठेवले आहे. शेवटी आनंदी धाकट्या भावाला घर न सोडण्याचा प्रेमळ आदेश देते तो आदेश म्हणजे एकूण कौटुंबिक वातावरणाचा, आनंदीच्या मनात खोलवर रूजलेल्या संस्कारांचा आणि तत्कालीन कौटुंबिक वास्तवाचा परिपाक आहे. ही केवळ हृदयपरिवर्तनाची कथा नाही, ती धक्काकथाही नाही, यांतला सुखमय अंत आदर्शवादी वळसा दिल्याने झालेला नाही. जे आहे ते अगदी सहज, स्वाभाविक आणि प्रवाहमय, म्हणूनच ही कथा अतिशय यशस्वी लघुकथा आहे. ९-१० पृष्ठांच्या मर्यादित आकारात सर्व घटक सहजपणे गोवण्याच्या प्रेमचंदांच्या कौशल्याचे कौतुक वाटते !

## (२) पंचपरमेश्वर ('सरस्वती' जून १९१६)

प्रेमचंदांची 'पंचपरमेश्वर' ही कथा त्यांच्या मनावर आदर्शवादाचा प्रभाव असताना लिहिली गेली आहे. समीक्षकांनी या कथेसंबंधी लिहिताना 'पंचाच्या न्यायाच्या जागेवर बसल्यावर मनुष्यातला न्याय देणारा ईश्वर जागा होतो' किंवा 'माणसावर कर्तव्याची जबाबदारी आली की त्याच्यातले 'सत्' जागृत होते' इत्यादी प्रेमचंदांच्या आस्थांविषयी मतभेद प्रकट केले आहेत व ही कथा आजच्या काळाच्या दृष्टीने फारशी औचित्यपूर्ण राहिली नाही अशीही टीका केली आहे.

वस्तुत: या कथेचे समीक्षण करताना वरील दोन्ही मुद्दे गैरलागू आहेत. १९१६ च्या आसपास लिहिलेल्या या कथेत आदर्शवादी मनाचा आविष्कार झाला असला तरी ती कथा म्हणून आजही भिडते, उत्तम वाटते. याचे कारण असे की जबाबदारी आल्यावर वा न्यायदानाच्या खुर्चीवर बसल्यावर सर्वच माणसांच्या मनातला ईश्वर जागा होतो अशी भूमिका प्रेमचंदांनी घेतलेली नाही. अशी भूमिका मानवी स्वभावाच्या वैचित्र्याची जाण असलेला कोणीही कथाकार घेऊ शकत नाही. त्याचप्रमाणे ही कथा प्रातिनीधिक म्हणूनही लिहिली गेली नाही. काही माणसात काही विशिष्ट कारणाने मनुष्याचा सद्भाव जागृत होऊ शकतो

याचे विश्वसनीय वाटणारे व मनाला प्रभावित करणारे कलात्मक प्रकटीकरण प्रेमचंदांनी केले आहे आणि ही कथा वाचताना माणसाच्या निर्मलतेचा, त्याच्या धार्मिक भेदभावनेला संक्रमित करून जाणाऱ्या विमल विवेकशीलतेचा प्रत्यय येतो. काही माणसे काहीं क्षण प्रभावित करू शकतात. ही सफलता या कथेपुरती पुरेशी आहे असे वाटते.

या कथेत एक धागा हिंदु-मुसलमान ऐक्याचाही आहे. धार्मिक कर्मकांड व खाणेपिणे यासंबंधी वेगवेगळेपणा असला तरी दोन्ही जमातीत माणुसकीच्या पातळीवर उत्तम सलोखा कित्येक वर्षापासून निर्माण झालेला आहे असा प्रेमचंदांचा विश्वास होता.

जुम्मन शेख व अलगू चौधरी यांच्या पिढीजात मैत्रीचे वर्णन प्रेमचंदांनी समरसतेने केले आहे. पुढे निर्माण होणाऱ्या पेचप्रसंगाच्या गहनपणासाठी हे वर्णन आवश्यक आहे. या वर्णनात हलकासा विनोदाचा स्वर असल्यामुळे आरंभीचा भाग फार मनोरंजक झाला आहे. जुम्मन शेख आपल्या आत्याची जमीन आपल्या नावे करून घेतो व नंतर तिला घरांत खूप त्रास दिला जातो. शेवटी नाईलाजाने आत्या आपली फिर्याद गावच्या पंचायतीसमोर नेते. गांवपंचायतीचे संस्कार ग्रामीण जनतेच्या मनांत खूप खोलवर गेलेले असतात व ही बाब प्रेमचंदांच्या कथेची एक आधारशिला आहे. आत्या आपले दुःख गांवच्या लोकांना सांगते पण जुम्मनशेखच्या लाठीला घाबरलेले लोक आत्याला साथ देत नाहीत. गांवच्या लोकांचे सामूहिक मन प्रभावीपणे व्यक्त करण्यात प्रेमचंदांना चांगलेच यश आले आहे. पंचायत भरते. जुम्मनचे काही विरोधक हजर असतात. जुम्मनला निर्णय आपल्या विरुद्ध जाईल अशी भीती वाटते. पण प्रेमचंद मोठ्या कौशल्याने एक आकर्षक पण वास्तव अशी घटना निर्माण करतात. आत्या सरपंच म्हणून जुम्मनचा मित्र अलगू चौधरी याचे नाव सुचवते. वरून थंड चेहरा ठेवणारा जुम्मन शेख आंतून फार खुश झालेला असतो. कारण अलगू त्याचा बालपणापासूनचा उत्तम मित्र असतो.

इथे कथेला आणखी एक कलाटणी मिळते. आत्या आधी अलगू चौधरीला भेटलेली असते व तिचे, वाक्य 'संबंध बिघडतील म्हणून इमानीपणाने बोलणार नाहीस ?' अलगूच्या मनात गुंजत राहिलेले दाखवले आहे. अलगूची सरपंच बनण्याची इच्छा नसते. पण पंचाच्या खुर्चीवर बसल्यावर मात्र त्याच्या मनांत

न्यायदेवता जागी होते. तो जुम्मन शेखला असे प्रश्न विचारतो की जुम्मनला आश्चर्य वाटते. शेवटी निर्णय म्हातारीच्या– आतेच्या बाजूनें होतो.

अनेक वर्षांचे मैत्रीचे संबंध दुरावतात, त्यात औपचारिकपणाच येतो असे नाही तर द्वेष व रागही निर्माण होतो. आता अलगूचा बदला घेण्याची इच्छा जुम्मनच्या मनात निर्माण झाली होती.

आणि त्याला एक निमित्त सांपडतेही. अलगूचा एक उत्तम बैल मरतो. त्याच्या जोडीच्या बैलाचा उपयोग नसतो म्हणून तो बैल अलगू चौधरी समझु साहूला विकून टाकतो पैसे एक महिन्यानी देण्याचे ठरते. या काळात समझु साहू त्या बैलाकडून निर्दयपणाने कामे करून घेतो व त्याच्या खाण्यापिण्याची काळजी ही घेत नाही ! (शेतकरी व व्यापारी यांच्यातला बैलाकडे पहाण्याचा दृष्टिकोणही प्रेमचंदांनी जाता जाता व्यक्त केला आहे.) मजबूत व सुंदर बैल शेवटी कामाने पिचून मरून जातो. रात्री माल व पैसे यांच्यासकट समझु साहू रस्त्यातच अडकून पडतो. रात्रभर जागे राहाण्याचा प्रयत्न करूनही त्याचा डोळा लागतो व त्या अवधीत त्याच्या कमरेचे सर्व पैसे व त्याचा माल चोरीला जातो. समझु साहू चिडतो. अलगूचे पैसे देण्याचे नाकारतो व मामला पंचायतीसमोर येतो.

पंचायतीत दोन्ही पक्षाकडचे लोक असतात. सरपंच म्हणून समझु साहू जुम्मन शेखचे नाव घेतो. आरंभी जुम्मनला बदला घेण्याची संधी मिळाल्याचे सुख होते व समझू साहू निकाल आपल्या बाजूचा होणार या खुशीत असतो. पण सरपंच म्हणून आसनस्थ झाल्यावर जुम्मनच्या मनातले किल्मिष नाहीसे होते, कर्तव्यबुद्धी जागृत होते. विशुद्ध न्याय प्रेम उत्पन्न होते आणि ईर्ष्या व राग नष्ट होऊन निकाल अलगूच्या बाजूने दिला जातो.

पचांच्या मुखाने ईश्वर बोलत असतो याचा अनुभव अलगूप्रमाणे जुम्मनला येतो. दोघे एकमेकांच्या गळ्याला मिठी मारतात व मनोमालिन्य दूर होते. वर्षाचा खंडित झालेला मैत्रीचा प्रवाह पुन: वाहू लागतो.

या कथेतील विवेकाची व न्यायबुद्धीची जागृती अत्यंत स्वाभाविक वाटते. एक तर ग्रामीण जनमानसातील पंचायतीचा संस्कार त्याकाळी प्रबळ होताच. अलगु चौधरी व जुम्मन शेख यांची घनिष्ट मैत्रीही त्यांच्या अंतर्मनात त्यावेळी असते. या कथेचा विकास प्रेमचंदांनी विलक्षण संयमाने आणि चित्रात्मक शैलीने

केला आहे. कथेला अनेक कलाटण्या दिल्या असून कुतूहल सारख वाढत राहाते. या कलाटण्या घटनाप्रधान नसून मानवी स्वभावावर आधारलेल्या असल्यामुळे कथेचे आवाहन स्थळकाळाची बंधने अतिक्रमित करते. यातील हिंदु–मुसलमान संबंधांचा धागा कथाविश्वाच्या बाहेरचा व उपरा वाटत नाही. तसेच प्रेमचंदांची आदर्शवादावरची श्रद्धा या ठिकाणी अकलात्मक झालेली नाही. याचे कारण असे की अलगु काय किंवा जुम्मन काय ही ईश्वराला वा अल्लाला मानणारी व घाबरणारी माणसे होती. शिवाय जबाबदारीचा भार खांद्यावर आल्यावर माणसे (निदान काही माणसे) विवेकवान होतात, न्यायनिष्ठुर होतात, स्वार्थाला अतिक्रमित करतात, असा जीवनातला अनुभव या कथेचा प्रमुख आधार आहे. कथेला पुरेसा भरीवपणा आला असला तरी कुठेही व्यक्ती वा प्रसंग यांच्या काटेकोर उपयोगाचे कलात्मक भान सुटलेले नाही.

## (३) शतरंज के खिलाडी (माधुरी–ऑक्टोबर १९२४)

ही एक गाजलेली कथा. लखनौच्या विलासी वातावरणाचे मोठे प्रभावी वर्णन प्रेमचंदांनी केले आहे. एकीकडे इंग्रजांचे आक्रमण सुरू होते आणि भारतीय राजेरजवाडे त्यांचे अंकित व आश्रित होत होते. पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणे भारतीय संस्थाने इंग्रजांच्या घोडदौडीपुढे कोसळत होती. या वातावरणात बुद्धीबळाचा खळ एक प्रतीकात्मक अर्थ धारण करतो. सर्वच पराक्रमी व वरच्या वर्गातील लोकांच्या मनावर राजकीय व सामाजिक दृष्टेचा मरगळ व उदासीनता आलेली होती आणि जीवनात बुद्धीबळाच्या खेळीसारख्या लुटुपुटुच्या लढायांनी मनोरंजन केले जात होते.

मिरजा व मीर हे दोघे जागीरदार. अवधचा नबाब इंग्रजांचा बंदी झाला. पण या मोठ्या घटनेशी त्याना काहीच कर्तव्य नव्हते. राजकीय प्रचंड घडामोडी-विषयीची ही उदासीनता एकप्रकारे त्यांच्या विनाशाची नांदी होती. अयोध्येच्या नबाबाला वाचविण्यापेक्षा बुद्धिबळाच्या राजाला वाचविण्यात यांना अधिक उत्साह वाटत होता. त्यांचे घरात लक्ष नव्हते. मिरजाची पत्नी या खेळामुळे वैतागलेली असायची तर मीरसाहेबाची पत्नी व्यभिचारी झाली होती. खानदानी शान बेगडीपणाने संभाळीत दोघेही सर्व जीवन खेळात व्यतीत करीत होते. प्रेमचंदांनी

कुटुंब व समाज दोन्ही ठिकाणी निर्माण झालेली निष्क्रियता, अधःपतन आणि अव्यवस्था यांचे मोठे सूचक चित्र काढले आहे. मीरच्या पत्नीचा प्रियकर नबाबाच्या दूताचे सोंग घेऊन मीरसाहेबांना नबाबांनी युद्धासाठी मदत करायला निमंत्रित केल्याचे सांगतो. बुद्धिबळाच्या खेळात सर्वच बुद्धी गुंतवलेल्या मीरसाहेबांना ते खरे वाटते ! दोघे पळून जाऊन गोमती नदीच्या काठी एकांत स्थळी डाव मांडतात. खेळताना प्रतिस्पर्ध्यांचे होणारे डावपेच व त्यांच्या मनांतील भावनात्मक आंदोलने याचे मार्मिक चित्रण प्रेमचंदांनी केले आहे.

हे खेळगडी खेळताना चिडतात, एकमेकावर प्रथम शाब्दिक हल्ला करतात, उणीदुणी काढतात, नंतर तलवारी उपसून लढतात, एक दुसऱ्यावर वार करून घायाळ होऊन पडतात व मरतात. ते विलासी होते पण भित्रे नव्हते. वैयक्तिक पराक्रम त्यांचेपाशी होता. प्रेमचंदांनी भारतीय योद्धयांच्या एका मर्मस्थानावर नेमके बोट ठेवले आहे. ही कथा बुद्धिबळाच्या खेळाडूंच्या निमित्ताने एकोणिसाव्या शतकातील एकूण भारतीय समाजाचे राजकीय वास्तव सूचित करते. या कथेतील घटनांच्या माध्यमातून व्यंगात्मक सूर मोठ्या कौशल्याने ध्वनित केलेला आहे. या कथेत तत्कालीन सामंतशाही वातावरणाचे, वर्गाचे आणि व्यक्तीचे जीवनदर्शन घडविले आहे. फार मोठा आशय प्रतीकात्मक रूपाने ही कथा व्यक्त करते.

## (४) सुजान भगत (' माधुरी '– मे १९२७)

मानवी मनाचे प्रेमचंदांचे ज्ञान किती मोठे होते याचे ही कथा एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

सुजान शेतकऱ्याला पैसा मिळतो आणि त्याची प्रवृत्ती एकदम धर्माकडे वळते. त्याच्या बदललेल्या मनाचे आणि त्यामुळे त्याच्या घरी बदललेल्या वातावरणाचे मोठे प्रभावी चित्र प्रेमचंद प्रस्तुत करतात. आता त्याची संपत्ती साधू, महात्मा, भिकारी, ब्राह्मण, यज्ञ, याकडे वळते. सुजानला धर्मकार्याची जणू नशाच चढते. पत्नी त्याला आवरण्याचा प्रयत्न करते पण सुजान पक्का हट्टी बनलेला असतो. त्याचा मान वाढतो व गावात द्वेषही वाढतो.

सुजान शेतकरी आता ' भगत ' झाले. आता प्रत्येक कार्याचा विचार औचित्य वा धर्म या कसोटीवर होऊ लागला. पूर्वी स्वार्थाच्या कसोटीवर होत

होता. सुजान आता सूक्ष्म जगात आला. केवळ भगत राहिला. श्रम करणारा शेतकरी लुप्त झाला. पण हळू हळू त्याच्या घरांतला त्याचा अधिकारही कमी होऊ लागला. मुलगा भोला श्रम करू लागला व त्याचा अधिकार घरात वाढू लागला. आता सुजानची पत्नीही भोलाची बाजू घेऊ लागली.

आतापर्यंत भोलाने बापाचा प्रत्यक्षपणे अपमान केला नव्हता. एका भिकाऱ्याला मापटे भरून गहू सुजान देऊ लागला हे पाहून भोलाने मापटे हातून काढून घेतले. मुलाकडून अशा तऱ्हेने अपमान व्हावा हे सुजानला असह्य झाले. घरात आपली पत व प्रतिष्ठा कमी झाली आहे हे त्याला पुरतेपणी कळले. बाहेर त्याची प्रतिष्ठा वाढली होती पण घरच्यांच्या दृष्टीने तो एक निकम्मा व केवळ खर्च करणारा माणूस होता. भोलाच्या या कृतीचे व त्याच्या वाक्ताडनाचे समर्थन सुजानची पत्नीही करू लागली हे सुजानला फारच झोंबले. माणसाचे घरातील स्थान शेवटी त्याच्या उत्पादक शक्तिवर कसे अवलंबून असते हे प्रेमचंदांनी सहजपणे पण मोठ्या कौशल्याने सूचित केले आहे.

भगत रुसला, रागावला. एकीकडे जाऊन बसला. पत्नी, मुलगा सर्व समजूत काढू लागली. तो आता वेगळ्या अर्थाने अंतर्मुख झाला होता. तो धार्मिक झाला होता खरा पण त्यामागे त्याची वृत्ती खऱ्या धार्मिक श्रद्धेची नव्हती प्रतिष्ठेच्या लालसेने तो 'भगत' झाला होता. आता त्याची पत्नी त्याला खोचकपणे म्हणते, 'आता मायेत कशाला गुंतता? अर्धी भाकर खा. ईश्वराचे भजन करा आणि पडून रहा.' हा आघात मर्मघाती होता. सुजानच्या मनात पुनः एक परिवर्तन चक्र फिरते. गेलेली पत व प्रतिष्ठा मिळविण्यासाठी तो आता पुनः जीव तोडून काम करतो. भोला त्याचे प्रचंड काम बघून चकित होतो, घाबरतो आता पुनः सुजानला घरांत प्रतिष्ठा मिळते. खळ्यावर एका भिक्षुकाला सुजान भरपूर धान्य देतो, देतो एवढेच नव्हे तर धान्याचा तो बोझा भिकाऱ्याला उचलत नाही म्हणून स्वतः डोक्यावर घेऊन त्याची घरी पोचवतो. पण भोला एक शब्दाने त्याला विरोध करीत नाही.

एक सुजाण शेतकऱ्याचे हे चित्र. सुजान खरा धार्मिक नसतो. जीवनातली मुख्य प्रेरणा असते ती प्रतिष्ठा मिळविण्याची. प्रेमचंदांनी हा मानवी मनोव्यापार आणि (त्यातील बारीकसारीक परिवर्तने) त्याचा सर्व घरावर व आसपासच्या वातावरणावर होणारा प्रभाव फारच बारकाईने व कुशलतेने चित्रित केला आहे.

माणसाच्या मनाबरोबरच जीवनाच्या प्रवाहाची प्रेमचंदांची जाण जबर होती. याचा फार सामर्थ्यशाली आविष्कार या कथेत झालेला दिसतो.

## (४) गुल्ली – डंडा ('हंस' फरवरी १९२९)

खेळासंबंधी प्रेमचंदांची कथा आहे व कादंबऱ्यात मोठ्या समरसतेने भरपूर लिहिले आहे. 'गुल्ली–डंडा' (विटी-दांडू) ही त्यांची विटीदांडूच्या खेळावर आधारलेली अतिशय सुंदर कथा. या कथेत बालपणीच्या आठवणींचा रम्य स्पर्श आहे, मागे वळून गत घटनांकडे पहाताना होणाऱ्या सुखमय संवेदनांची मिठास आहे, बालकांच्या मनाच्या निरीक्षणाने ही कथा दमदार झालेली आहे, विटी–दांडूच्या खेळाच्या वर्णनाने रंजकता आलेली आहे पण या सर्वांची चव चाखत असताना प्रेमचंदांनी सामाजिक जीवनातील विषमतेमुळे निर्माण झालेल्या कारुण्याची डूब देऊन जी गांभीर्याची पातळी या कथेला सहजपणे दिली आहे ती कथेला श्रेष्ठत्वाचा खिताब बहाल करते.

विटीदांडूच्या खेळाची महती सांगत मोठ्या खेळीमेळीच्या शैलीत प्रेमचंद कथेला आरंभ करतात. कथेतला नायक इंजिनियर असला तरी त्याच्या मनातला देशीपणा चांगलाच टिकून असतो आणि म्हणूनच ही कथा विशिष्ट रूप धारण करू शकली. खेळताना भूकतहान हरपते, घरच्याचे राग काही काळ विसरले जातात याचे मोठे चित्ताकर्षक वर्णन वाचकाचे मन पकडून ठेवते चांभाराचा मुलगा गया आणि हा मुलगा यांच्यातला तंटा दाखवला आहे. हा मुलगा कोतवालाचा. गया चांभाराने त्याला डाव देत नाही म्हणून दांडूने मारावे ही घटना विचित्रच ! पण खेळात सर्व सारखेच. पुढे शहराच्या जागी बदली झाल्यामुळे या मुलाने इतर मित्रांवर कसा भाव मारला याचे मोठे मनोरंजक आणि बालमनाचे वास्तव चित्रण करणारे वर्णन प्रेमचंदांनी केले आहे.

पुढे वीस वर्षांनी इंजिनियर बनून हा मुलगा गावी येतो आणि गयाशी विटीदांडू खेळतो. या वरवर चमत्कारिक भासणाऱ्या घटनेला प्रेमचंदांनी मानस. शास्त्रीय बैठक देऊन विश्वसनीय बनवले आहे. गया व इंजिनियर दोघे खेळतात. इंजिनियर खेळतो ती हौस म्हणून, पूर्वीच्या स्मृतींचा सुखद चाळा म्हणून. तर गया खेळतो ते मोठ्या झालेल्या मित्रांचे मन मोडू नये म्हणून. इंजिनियर गयाशी खेळताना रडे डाव खेळतो. विटी दांडूवर टणकन आपटली असतानाही डाव सोडत

नाही. एकदा गया म्हणतो–' नाही भाई तू बेईमानी थोडीच करणार आहेस !' पुन: एक रडीचा डाव. आता तर आवाज झालेला नाकारणे शक्य नव्हते. इंजिनियर म्हणतो–' विटेवर आपटली असेल' रडीचे डाव खेळणाऱ्या भिडूला एका काळी बदडून काढणारा गया सहजपणे म्हणतो, 'होय होय, विटी विटेवरच आपटली असेल दांडूला लागती तर इतका आवाज आलाच नसता !' –गयाचे हे वाक्य मोठे खोचक आहे. वरून निरागसपणे उच्चारलेले पण आंतून कींव, राग, दया, अहंकार खोडकरपणा, व्यंग्य, तिखटपणा, अवमान, बेरकेपणा इत्यादी विविध संमिश्र भावांनी भरगच्च भरलेले ! अशी व्यंजना–क्षमता प्रेमचंदांमध्ये भरपूर आढळते.

शेवटी निर्लज्जपणाची ही एक सीमा असतेच. इंजिनियर डाय गयाला देतो. अंधार पडत चालल्याचे सांगून गया खेळ थांबवू पहातो. इंजिनियर खेळण्याचा आग्रह धरतो. गया त्याचा मान राखण्यासाठी खेळण्याचे नाटक करतो. मिनिट-भरात डाव हरतो. इंजिनियरला वाटते गयाला खेळण्याची संवय राहीली नाही गया उत्तर देतो– ' खेळायला वेळ कुठे मिळतो भय्या !' या सहजपणे निघालेल्य उद्‌गारांत गयाच्या जीवनाचे कारुण्य भरलेले आहे !

पण दुसऱ्या दिवशी विटीदांडूचा खेळ पहायला येण्याची विनंती करून गया निघून जातो. दुसऱ्या दिवशी आपल्या कारमधून इंजिनियर विटीदांडूचा खेळ पहातो. आज गयाचे रूप अगदीच वेगळे होते. तो आपल्या गांवातल्या मित्रां-बरोबरच खेळत होता. गयाचे नैपुण्य विलक्षण होते. गयाच्या कालच्या आणि आजच्या खेळीतले जमीनअस्मानाचे अंतर इंजिनियरला पदोपदी लाज आणत होते ! इतक्यात एक तरुण रडीचा डाव खेळतो. काल शांत, सौम्य, हीनदीन असलेला गया आज मात्र लहानपणीसारखाच क्रुद्ध होतो. त्याचे रागावलेले रूप पाहूनच तो तरुण घाबरतो. इंजिनियरला कळते–गयाने काल बरोबरीने खेळ केलाच नाही. त्याने दाखवली ती दया. आणि याचे कारणही 'मी आता ऑफिसर आहे !' ही ऑफीसरी त्याच्या माझ्यातली भिंत बनली आहे. आता त्याचा आदर मला मिळेल, माझ्याशी नम्र व्यवहार असेल. साहचर्य मिळणार नाही-इंजिनियरला वाटते. 'तो मोठा झाला आहे आणि मी क्षुद्र झालो आहे.' इथे ही कथा संपते. कथा संपता संपता विषसतेवर आधारलेल्या समाज रचनेत माणसा माणसाच्या मनांत निर्माण झालेल्या भिंतींचा विद्रूप बळकटपणा ही कथा दाखवून

जाते. खेळता खेळता अचानक त्या हलक्या–फुलक्या खेळातून मानवी जीवनाचे गंभीर सत्य बाहेर पडावे आणि त्याने चकित करावे तशी ही कथा चकित करते. गयाच्या चांभार जातीचा संदर्भही वेगळाच खुपणारा प्रकाश झोत टाकतो.

## (६) पूस की रात ('माधुरी' मे १९३०)

दारुण अनुभवाकडे काहीशा वरवरच्या मिस्किलपणाने पहात, विनोदाच्या किंवा खेळकरपणाच्या पातळीवर ठेऊन त्यातले भीषण कारुण्य आणि शोकात्मता व्यक्त करणे हे प्रेमचंदांच्या कथा लेखनाचे एक खास वैशिष्टच आहे. 'शतरंज के खिलाडी', 'कफन', 'पूस की रात' या कथा वरील गोष्टींचे पुरावे आहेत. 'पूस की रात' ही त्यांची कथा शेतकऱ्याच्या जीवनाचे एक दुःखद वास्तव अशाच तऱ्हेने प्रस्तुत करते.

शेतकऱ्याला शेती करणे सुखाचे व फायद्याचे तर राहिले नाहीच उलट दुःखाचे आणि अतोनात परिश्रमांचे बनले आहे. शेतावर काम करण्यापेक्षा मजुरी करणे शेतकरी अधिक पसंत करतो, ही भारतीय कृषि जीवनातली एक प्रमुख शोकांतिका आहे. तो आपल्या जमिनीपासून, श्रमापासून दुरावतो आहे याची विदारक जाणीव देणारी ही कथा वर वर पहाता काहीशा हलक्याफुलक्या अंगाने लिहिली आहे. या कथेत शेतकरी जीवनाच्या वास्तवाचा एकच भाग मुख्यत्वे करून प्रकट केला आहे. पौष महिन्यातल्या प्रखर थंडीचा मुकाबला करणे गरीब शेतकऱ्याला अशक्य होऊन जाते.

हलकूने पोटाला चिमटा घेऊन पौष महिन्यातल्या थंडीशी मुकाबला करण्यासाठी घोंगडे घेण्याच्या उद्देशाने तीन रुपये जमा केलेले असतात. ते त्याला सहनाला द्यावे लागतात. कारण सहना आपली उधारी वसूल करण्यात फार कठोर असतो. साध्या तीन चार रुपयांच्या घोंगडीच्याही आड येणारा हा सावकारी पाश प्रेमचंद आरंभीच दाखवतात.

पौषाची अंधारी रात्र. कडक थंडी. या थंडीत हलकूची जी दयनीय स्थिती होते त्याचे मोठे हृदयद्रावक चित्र प्रेमचंदांनी काढले आहे. त्याचा कुत्रा जबरा हाही थंडीत गारठलेला असतो. पशु आणि मनुष्य यातले अंतरच जणू नाहीसे झालेले असते. पण दुसऱ्या पातळीवर यांच्यातले ममत्वाचे, क्रीडेचे संबंध चितारून

प्रेमचंदांनी काहीसा ट्रॅजिक ताण शिथिल केला आहे. थंडीपासून बचाव करण्या
साठी हलकू त्या कुत्र्यालाच अंगाजवळ घेतो. दोघांनी एकमेकांच्या आत्म्याची
ओढ जाणवते. काहीशा लौकिकतेपलीकडचे हृत्-बंध जाणवतात. कुत्रा आणि
त्याचा मालक माणूस यांच्यातले संबंध प्रेमचंदांनी फार ताकदीने चितारले आहेत

हलकूच्या डोक्यात एक कल्पना येते. सुकलेली पाने गोळा करून तो शेकोटी
करतो. त्याचा व कुत्र्याचा देह गरम होतो. सुखावतो व सुस्तावतो सुखावलेला हल
कुत्र्याबरोबर खेळतो. कुत्रा आपल्या कर्तव्यात तत्पर असतो. इकडे हलकूल
आळसावल्यामुळे नीज येते. तिकडे नीलगायी शेत चरून जातात. कुत्रा भुंक
असतो. पण निद्रेने हलकूला जणू दोरीने जखडून टाकले होते ! नीलगायी शे
चरून गेल्या. सकाळी हलकूची पत्नी येऊन त्याला रागे भरते. हलकू पोट दुख
असल्याचे नाटक करतो. मुन्नी उदास झालेली असते हलकू मात्र प्रसन्न होत
कारण रात्री थंडीत आता इथे झोपण्याची गरज राहिलेली नाही.

दैवी व मानवी संकटामुळे शेतीपासून, जमिनीपासून व स्वतःच्या श्रमापासू
शेतकरी कसा दुरावता आहे याचे हे चित्रण. सुस्तावलेला, आळसावलेला हल
नावाने हलकू असला तरी अंगाने जाडजूड असतो हे प्रेमचंदांनी आधीच विनो
ढंगाने नमूद केले आहे. प्रेमचंदांचा कुठलाही शेतकरी असा जाडजूड नसतो. हलकूच्य
जाडजूडपणाचा त्याच्या सुस्तीशी संबंध आहे. हलकू आणि पौषाच्या थंड रात्री
त्याची होणारी दैना हा या कथेतील अनुभवाचा केंद्रीय भाग. या भागाचे चित्र
विलक्षण कौशल्याने प्रेमचंदांनी केले आहे. त्यात त्यांचे मानवी स्वभावाचे
निसर्गाचे सूक्ष्म निरीक्षण प्रत्ययास येते. यात जशी पौषाची रात्र जिवंत पा
म्हणून येते तसाच हलकूचा कुत्राही एक पशूचे शरीर असलेला मानवात्मा म्हणू
येतो– अर्थात वास्तवाची पातळी कुठेही न सोडता. कुत्र्याशी हृदय–संवाद त्याच्य
एकटेपणाला अधिक प्रभावीपणे व्यंजित करतो. हलकूची शेवटची निष्क्रियता
तात्कालिक घटना नसते. तो त्याच्या एकूण परिस्थितीचा परिपाक असतो,
प्रेमचंद आरंभीच्या सहना–हलकू संबंधातून तर दाखवतातच पण सर्व कथेत
जाणीव वाचकाला होत राहाते. शेताचा सारा भरण्यासाठी मजूरी करणे शेतकऱ्याल
भाग पडते. पण हलकू तत्कालिक थंडीचे संकट टळल्याच्या आनंदात असतो.
आनंद ज्या संदर्भात प्रेमचंदांनी व्यक्त केला आहे तो संदर्भ पाहिला तर
स्मशानात प्रेताने जरासे दात विचकून हसावे तसे विषण्ण करणारे वाटते. एखाद

भाबड्या वाचकाला मात्र ही कथा गमतीदार वाटण्याची शक्यता नाकारता येत नाही. हा अभिव्यक्तीचा तिरकसपणा प्रेमचंदांच्या काही सामर्थ्यशाली कथांत परिणामकारकतेने जाणवतो.

## (७) दो बैलों की कथा ('हंस' अक्तूबर १९३१)

प्रेमचंदांनी प्राण्याविषयी मोठ्या आपुलकीने लिहिले आहे. शेतकऱ्यांच्या जीवनाशी समरस झालेले कलावंत असल्यामुळे सहाजिकच कुत्रा, बैल या प्राण्यांच्या बद्दल त्यांना खूप जिव्हाळा होता. 'दो बैलों की कथा' या असीम जिव्हाळ्यातून निर्माण झालेली कथा आहे.

या कथेतील हीरा आणि मोती हे दोन बैल म्हणजे प्रेमचंदांनी निर्मिलेली माणसांसारखीच पात्रे आहेत. प्रेमचंदांचे वैशिष्ट्य हे की त्यानी या मूक प्राण्यांच्या भावनांचे जे चित्रण केले आहे ते मानवाच्या भाषेत असलें तरी त्या प्राण्यांच्या वास्तवाचे भान सोडत नाही.

या दोन बैलांची आपसातली आत्मीयता, त्यांचे झगडे, त्यांचे बेबनाव आणि बंधुभाव यांचे मोठे मार्मिक चित्रण प्रेमचंदांनी केले आहे. झूरी या जोडीला काही कामासाठी सासुरवाडीला पाठवतो. या बैलांना झुरीकडे इतके प्रेम मिळालेले असते की ते सासुरवाडीला जायलाही नाखुष असतात आणि तिथे गेल्यावर दावी तोडून पुन: आपल्या मालकाकडे येतात. झुरीचे हृदय भरून येते पण आपल्या माहेरच्या घरी बैल टिकलें नाहीत याचा झुरीच्या बायकोला फार राग येतो. ती त्यांची पेंड बंद करते आणि कोरडा भुसाच फक्त खायला देते दुसऱ्या दिवशी झुरीचा मेहुणा येऊन बैलांना गाडीला जुंपून घेऊन जातो. बैलांचे आपसातील संवाद मोठे मार्मिक आहेत. बैलांना भाषा येत असती तर तसेच ते बोलले असते इतका वास्तवाभास निर्माण करण्यात प्रेमचंद यशस्वी झाले आहेत. त्यांच्याकडून खूप काम करून घेतले जाते. मार दिला जातो, खायला केवळ कोरडा भुसा. मात्र या घरात एक छोटी मुलगी असते. तिला सावत्रपणाचा त्रास होत असतो. तिला या बैलांबद्दल आपुलकी वाटते व ती त्याना चोरून दोन भाकऱ्या आणून देते. बैल पळण्याचा विचार करतात. ती मुलगी त्यांची दावी सोडते आणि बैल पळाले म्हणून आरडाओरड करते. या छोट्या प्रसंगानें प्रेमचंदानी या कथेत एक वेगळीच

ताकद आणली आहे. मनुष्य आणि प्राणी दोघें वेदनेंच्या स्पर्शरेषेवर एकत्र सूत्राने बांधलेले असतात.

बैल पळतात. वाटेत एक भला मोठा सांड त्यांच्यावर हल्ला करतो. पण दोघे संघटित शक्तीने त्याला सळो की पळो करुन सोडतात. या सर्व नेहमीच्या घटनातले प्राण्याना स्वाभाविक असे जे भावनांचे मनोहर कारंजे आहे त्याचे सौंदर्य दाखविण्यात प्रेमचंद चांगलेच यशस्वी झाले आहेत. एका मटरच्या शेतात चरत असताना या दोघांना पकडण्यात येते आणि कोंडवाड्यात बंद करण्यात येते.

कोंडवाड्यात आणखीही गुरे असतात. त्यांना खाणे दिले जात नाही त्यामुळे ती सर्व रोडावलेली असतात. या दोघांच्या गळ्याभोवती मजबूत दावी बांधली जातात. तरीही इतर गुरांना सोडविण्यासाठी हे दोघे बैल कोंडवाड्याची भिंत शिंगांनी हळू हळू भोसकून पाडून टाकतात. याना मात्र बाहेर पडता येत नाही. दुसऱ्या दिवशी अधिक जाड रश्शीने यांना बांधले जाते.

एक दिवस त्यांचा लिलाव होतो. कसाई त्याना विकत घेतो. बैलांना त्याचा वास येतो. बैलाना हाकून नेत असताना त्याना जाणवते ते हे की ज्या रस्त्यावरून त्याना नेले जात आहे तो रस्ता त्यांचा चिरपरिचित आहे. या कथेत योगायोगाने घडलेली गोष्ट एवढीच. दोघे बैल धावत झूरीच्या गोठ्यात येतात. कसायाला झूरी हाकलून देतो. रोडावलेल्या त्या मूक जनावरांना झूरीच मिठी मारतो असे नव्हे तर त्याची रागावलेली बायको सुद्धा त्यांच्या माथ्यांची चुंबने घेते.

या कथेतील घटना शेतकऱ्यांच्या नित्याच्या जीवनात घडणाऱ्या आहेत. त्यामुळे कथा वास्तवाची पातळी कुठेच सोडीत नाही. त्या बैलांचे आपसांतील संवाद, त्यांच्या भावना, त्याचा विचारविनियम या सर्व गोष्टींचा इतक्या कौशल्याने प्रेमचंदांनी आविष्कार केला आहे की या मूक प्राण्यांना जणू वाणी दिली गेली आहे. या बैलांची आत्मीयता केवळ आपसातच होती असे नव्हे तर त्या सर्व घराबद्दल होती. एवढेच नव्हे तर सारा गावच बैलांच्या कौतुकात उत्साहाने सामिल झालेला असतो. गावांतील हृत्–बंधांचे सूक्ष्म धागे कसे गुंफलेले असतात याचे मोठे मार्मिक सूचन प्रेमचंदांनी केले आहे. बैलांच्या वाणीतून त्यांच्या भावनांचा आविष्कार करताना त्यांच्या व्यापारांचे, क्रीडांचे, शारीरिक हालचालीचे जे चित्र प्रेमचंद उभे करतात ते त्यांच्या सूक्ष्म निरीक्षण शक्तीचे द्योतक आहे. मोठा

कलावंत माणसा माणसातीलच नव्हे तर सर्व प्राण्यांतील प्रेम संबंध आणि आत्मिक ऐक्य कसे प्रभावीपणे व्यक्त करू शकतो याची द्योतक ही कथा फार उत्तम कथांत गणली जावी.

## ठाकुर का कुआँ (जागरण ऑगस्ट १९३२)

ही आकाराने अगदीं छोटीशी कथा प्रेमचंदांच्या सर्वोत्कृष्ट कथांपैकी एक प्रेमचंदांची सहानुभूती इतकी व्यापक होती की समाजात सर्वात शेवटचा वर्ग अस्पृश्य वर्ग–त्यांच्या लेखनाचा एक महत्त्वाचा विषय होता. या कथेत त्यांनी गावकुसाबाहेर राहाणाऱ्या अस्पृश्यांचे सामान्य जीवनातले सामान्य गोष्टी-बद्दलचे दुःख मोठ्या सहानुभूतीने टिपले आहे. अस्पृश्यांना पिण्याचे पाणीही सरळपणे उपलब्ध नसते आणि गावात विहीरी असूनही पाण्यासाठी त्यांना वरच्या जातीच्या कृपेवर अवलंबून लाचार जिणे जगावे लागते ही घटना त्यांच्या कथेचा विषय बनली आहे.

आजारी जोखूने तोंडाला लोटा लावला तो त्याला कळले की पाण्याला घाण वास मारतो आहे. गंगी दररोज पाणी आणत असे पण विहीर फारच लांब होती. तिने ठाकुराच्या विहीरीवरून पाणी आणण्याचा बेत व्यक्त केला. तिने घाणेरडे पाणी जोखूला पिऊ दिले नाही. घाण पाणी प्याल्याने आजारपण वाढते हे तिला माहित होते पण पाणी गरम करून प्याल्याने त्यातला दोष कमी होतो हे मात्र तिला ठाऊक नव्हते. ठाकुराच्या विहीरीवरून पाणी आणण्याचा विचार तिने व्यक्त केला खरा पण ही गोष्ट किती अवघड आहे हे जोखूला माहींत आहे. दोन तीन वाक्यांत वास्तवाचे भेदक चित्रण प्रेमचंदांनी केले आहे. ‘हातपाय तोडून घेशील आणखी काही व्हायचे नाही. गप्प बस मुकाट्याने. ब्राह्मण देवता आशीर्वाद देतील. लाठी मारतील, सावकार एकास पाच घेईल. गरीबाचे दुःख कोण जाणतो ? खांदा देण्याची गोष्ट अलाहिदा. असे लोक विहीरीवर पाणी भरू देणार ?’

तरीही गंगा पाणी आणायला जाते. त्यावेळी ठाकुराच्या दरबारात चाल-लेल्या गप्पांचा सारांश प्रेमचंदांनी दिला आहे. शोषण, फसवेगिरी आणि कुटिलपणा यांचा अर्क जणू तिथे आला आहे. गंगीच्या मनातले या उच्च जातीच्या कारवायां-बद्दलचे विचार सहजपणे व्यक्त केले आहेत. त्यांत सारे पशु-चरित्र स्पष्ट झाले आहे. याच पार्श्वभूमीवर ठाकुरांच्या घरांतल्या स्त्रियांवरही एक भाष्य आहे. त्यांनाही घरात दासीपेक्षा अधिक किंमत नसते.

अंधार पडलेला असतो. मोठ्या धीराने गंगी पाण्याची चोरी करण्यासाठी विहिरीवर उभी राहते. पाण्याच्या हंड्याला हात लावणार तोच ठाकुरांच्या घराचे द्वार उघडले. प्रेमचंदांची छोटी टिपणी साऱ्या वातावरणाला भयावहपणा जिवंत करते. 'सिंहाचे तोंड यापेक्षा अधिक भयानक नसेल.' गंगीच्या हातून घडा सुटतो. ती जिवाच्या आकांताने धावत घरी जाते, जोखू तेच घाणेरडे पाणी पीत असतो.

शेवटी अस्पृश्याला आजारपणातही घाण पाणी पिऊन तहान भागवावी लागते. हे वास्तव आजही फारसे बदलले आहे असे नाही. प्रेमचंदांच्या अस्पृश्यांच्या बद्दलच्या अशा कथा ते पहिले दलित कथाकार होते याची साक्ष देतात.

या छोट्या कथेची सुरवात अगदी तीर सुटल्यासारखी गतीने झालेली आहे. आणि तो तीर वर्मी लागल्याचा प्रभाव उत्पन्न करून शेवट केला आहे. मधल्या भागांत अस्पृश्य जीवनाचे भयावह वास्तव, वरच्या वर्गाच्या अन्यायाचे विद्रूप आणि माणसामाणसातले जातिव्यवस्थेमुळे निर्घृण झालेले संबंध, हे सर्व जीवनाचे भेदक घटक चित्रात्मक पद्धतीने प्रस्तुत केलेले आहेत. या कथेत एक प्रकारची गतिशीलता आहे, त्वरा आहे. एकेका वाक्याने जणू रेखीव मूर्तीची बनावट केलेली आहे, रंगाची एक सूक्ष्म रेषा जशी चित्राचा प्रभाव साकारत असते तितक्या कौशल्यानें सारी कथा साकार होते. सत्य आणि सौंदर्य यांच्यातली भेदक रेखाच हरवून जाते. अशी ही कथा–सुमारे तीन ते साडेतीन पृष्ठांची. प्रेमचंदांवर पसरट-पणाचा आरोप करणाऱ्यांनी त्यांच्या अशा कथांचे मनन करायला हवे.

## (९) ईदगाह : ('चाँद' ऑगस्ट १९३३)

प्रेमचंदाना बालकांच्या मनाची जाण किती जबर होती आणि त्यांच्या जीवनाचे त्यांचे निरीक्षण किती सूक्ष्म होते, याचा प्रत्यय 'ईदगाह' ही कथा देते.

हमीद नावाचा एक पोरका व गरीब मुलगा ईदच्या जत्रेत आपल्या इतर साथीदारांप्रमाणे खेळणी किंवा खाऊ न घेता आपल्या म्हाताऱ्या आजीचे हात पोळू नयेत म्हणून आपल्या जवळच्या केवळ तीन पैशांचा एक चिमटा विकत घेतो.

या घटनेला कथेचे रूप देताना आणि अनुभवाचे बीज फुलवताना प्रेमचंदानी बारीकसारीक घटना, पात्रे आणि इतर अनेक प्रकारचे तपशील यांचा जो सुंदर गोफ विणला आहे तो फारच मनोहर वाटतो !

शेवटी ईद येते. ३० दिवसांचे रोजे झाल्यावर. मुलांमध्ये मोठ्या माणसांमध्ये खुशीची लहर निर्माण होते. ईदच्या जत्रेच्या तयारीसाठी धावपळ सुरू होते. या खुशीचे आणि धावपळीचे मोठे चित्ताकर्षक वर्णन प्रेमचंदांनी केले आहे. या खुशीच्या आणि उत्साहाच्या पार्श्वभूमीवर पोरक्या हमीदच्या आजीच्या मनात मात्र वेदनाच उत्पन्न होते. गरीबाच्या घरी ईदचे आगमन म्हणजे दुष्काळात तेरावा महिना! आता हमीदला ती जत्रेसाठी काय देणार होती? तिच्या गरीबीचे आणि श्रममय जीवनाचे चित्र आठ दहा वाक्यात रेखाटून प्रेमचंद तिच्या व्यथेला पोरक्या हमीदविषयीच्या प्रेमाच्या विरोधी रंगांनी अधिक गडदपणा आणतात म्हातारी अमीना रडते आहे पण भोळ्या पाच वर्षाच्या हमीदला वाटते ती आपण एकटे जत्रेला कसे जाणार या विचारानेच काळजी करीत रडते आहे. बटव्यात असलेल्या आठ पैशापैकी तीन हमीदच्या हाती देऊन ती त्याला जत्रेला पाठवते.

हमीद इतर साथीदारांबरोबर जत्रेला चालला आहे. सर्वत्र मुले मोठ्या खुशीत आहेत. बागा, माळी, शाळा, चेंडूने खेळणाऱ्या इंग्रजी मडमा, आपल्या आया-मावशा हे त्यांचे गप्पांचे विषय. जोडीला भविष्य सांगणारा चौधरी आणि त्याला वश असलेले भूत! कॉंस्टेबलांचे छोटे पगार आणि त्यांचे चैनीचे अवाढव्य खर्च! या सर्व गप्पातून मुलांच्या मनाचे दर्शन तर घडतेच पण थोडेसे कुटुंबाचे व समाजाचेही. अगदी सहज.

ईदचे नमाज पढले जातात. समानतेवर आधारलेल्या या धर्माचे शिस्तशीर नमाज पढणे मोठ्या प्रभावीपणे प्रेमचंद दाखवतात. प्रार्थना संपली आणि मुले खेळण्यांच्या, खाऊच्या दुकानांकडे धाऊ लागली. खेळण्याची दुकाने आणि मुलांचा प्रचंड उत्साह! मुले खेळणी घेतात, त्यांना कुरवाळतात, आपलेच खेळणे सर्वांपेक्षा कसे अधिक चांगले आहे या तोऱ्यात ऐट मारतात! खाऊ घेतात, एकट्याने खातात! हमीद मात्र लालचावलेल्या नजरेने सर्वांकडे पहात खिशांतले फक्त तीन पैसे जपत राहातो! मोहसिन त्याला एक खुशबूदार रेवडी देऊ करतो, हमीद हात पुढे करतो. मोहसिन रेवडी तोंडात टाकतो. सर्व मुले हसतात, हमीद मात्र कमालीचा खट्टू होतो. या उत्साहाच्या आनंदाच्या वातावरणात ही छोटीशी घटना इतरांच्या मनातला आनंद फुलवते पण हमीदच्या मनात मात्र हिरमुसलेपणा निर्माण करते! अशा वरकरणी विनोदी वाटणाऱ्या पण काळजाचा तुकडा पाडणाऱ्या छोट्या घटनांचे 'स्ट्रोक्स' प्रेमचंद खूप ठिकाणी देतात.

खेळण्याच्या दुकानानंतर एका लोखंडी सामानाच्या दुकानापाशी मुलांचा जथा येतो. हमीदला एक चिमटा दिसतो. त्याला आठवते. आपल्या घरी चिमटा नाही. आजीचे हात पोळतात. चिमटा घेतला तर आजीला किती आनंद होईल ! सहा पैशांचा चिमटा तीन पैशांत त्याला मिळतो. प्रथम हमीदची थट्टा होते. पण आता दृश्य पालटलेले असते. इतरांच्या खेळण्यापेक्षा आपला चिमटाच कसा श्रेष्ठ आहे हे हमीद सर्वांना पटवून देतो. त्यांच्यातल्या युक्तिवादाचे स्वरूप मोठे गमतीदारही आहे आणि बालकांच्या मनाचे वास्तव संभाळून तो युक्तिवाद मांडला आहे. आता हमीद हीरो ठरतो. प्रत्येकाला त्याचा चिमटा श्रेष्ठ वाटतो. प्रत्येक जण चिमटयाला हात लावून पहातो आणि हमीदलाही आपली खेळणी पाहू देतो. कुठेतरी आंत खेळण्यांबद्दलची आसक्ती आहेच. हमीद म्हणतो, ‘मी तुम्हाला चिडवीत होतो. हा लोखंडाचा चिमटा. तुमच्या या खेळण्यांची बरोबरी थोडीच करणार ! ही खेळणी इतकी सुंदर आहेत–वाटते आता बोलणार, आता बोलणार !’ पण इतर मुलांना आता ते काही पटत नाही. हमीदला आजी जो दुवा देईल तो याना थोडाच मिळणार ! आता तर महमूद आपल्या केळयातले एक केळेही हमीदला देतो.

जत्रेहून आलेल्या मुलांचे घरी मोठे उत्सुकतेने स्वागत होते. प्रेमचंदांनी या सर्व खेळण्यांचे कसे कौतुक होते हे सांगितले आहेच पण थोडयाच वेळात ही मातीची खेळणी फुटून जातात व मुले कशी निराश होतात, इतरांशी भांडतात हेही दाखवले आहे. या पार्श्वभूमीवर हमीदच्या चिमटयाने काय केले ? हा शेवटचा प्रसंग प्रेमचंदांनी फारच समरसतेने चितारला आहे. प्रेमचंदांना लहान मुलांपासून म्हाताऱ्यापर्यंत सर्व माणसांच्या मनात अनुप्रवेश करणे कसे सहज जमले होते त्याचा हा पुरावा. हमीदला प्रेमाने आजी जवळ घेते. त्याच्याकडे चिमटा पाहून चकित होते. तीन पैसे चिमटा खरेदी करण्यात खर्च करणाऱ्या या मुलाबद्दल आजीला राग येतो. ‘अमीनाने ऊर बडवला. कसा बेअक्कल कारटा आहे ! दुपार झाली. काही खाल्ला प्याला नाही. आणतो काय तर हा चिमटा ! सगळया जत्रेत तुला दुसरे काहीच मिळाले नाही. हा लोखंडाचा चिमटाच घेऊन आलास ?’ ‘हमीदने अपराधी भावनेने म्हटले– ‘तुझी बोटे तव्यावर पोळतात न ! म्हणून हा चिमटा आणला !’

‘म्हातारीचा राग एकदम संपला. तिचे मन स्नेहाने भरून आले. सारी

कळ शब्दांत पसरून देणारा स्नेह हा नव्हे, हा स्नेह मूक होता, खूप भरीव, रस आणि स्वाद यांनी भरलेला !'

"आणि एक मोठी विचित्र घटना घडली. हमिदच्या चिमट्यापेक्षाही विचित्र ! बालक हमिदने म्हताऱ्या हामिदची भूमिका केली होती. म्हातारी अमीना बालिका अमीना झाली. ती रडू लागली. पदर पसरून ती हमीदला आशीर्वाद देऊ लागली आणि मोठे मोठे अश्रुबिंदु ढाळू लागली. हामिदला यातले मर्म काय समजणार ?"

एका प्रगल्भ कथाकाराच्या या कथेच्या अंतावर भाष्य करायला वाचकांच्या मनांत विचक्षणपणा राहिलेला नसतो. सहृदय वाचकच आता अमीना बनून दाटून आलेल्या हुंदक्यांना मोठ्या कष्टाने दाबून टाकण्याचा प्रयत्न करीत असतो! या कथेतली बालमानसाची जाण, मानवी जीवनातल्या भावात्मक ऐश्वर्यांची समृद्ध अभिव्यक्ती आणि माणसाच्या अंतर्मनातल्या सुप्त भावबंधांना जागे करून उचंबळून आणण्याची कला या कथेला शाश्वताचे परिमाण देऊन जाते. (काही समीक्षक बंधूंनी मात्र लोखंडाच्या चिमट्यात खूपच समाजवाद पाहिला आहे.)

## (१०) नशा ('चाँद' फेब्रुवारी १९३४)

जीवनाकडे पहाण्याची प्रेमचंदांची दृष्टी अतिशय खुली होती. कोणत्याही विचाराची झापडे न लावता ते माणसांकडे पहात- एकाच वेळी सहानुभूतीने आणि कलाकाराच्या तटस्थतेने. त्यामुळे माणसाच्या परिस्थितीचे व त्याविषयीच्या त्याच्या प्रतिक्रियांचे विश्लेषण ते काटेकोरपणे करू शकत. गरीब तेवढे सद्भावनाशील आणि त्यांच्या हातून घडलेले कुटिल वर्तन केवळ परिस्थितीच्या दडपणातून झालेले म्हणूनच क्षम्य. तसेच श्रीमंतवर्ग हा पिळवणूक करणारा म्हणून त्या वर्गातली सर्व माणसे स्वभावाने निर्दय व शोषण करणारी, गरिबांना अमानुषपणे वागवणारी. असा वर्गीय दृष्टिकोण त्यांनी कधीच ठेवला नाही. त्यामुळेच माणसामधले गुणदोष आणि प्रवृत्ती यांचा मागोवा घेताना त्यांनी माणसाच्या मनालाच महत्त्व दिलें. 'नशा' कथा याचे एक ज्वलंत उदाहरण आहे.

या छोट्याशा कथेत एका वेगळ्याच नशेचे वर्णन प्रेमचंदांनी केले आहे. वीर नावाच्या गरीब विद्यार्थ्याला श्रीमंताबद्दल ईर्ष्या असते आणि ही अभावातून

उत्पन्न झालेली ईर्ष्या व्यक्त करताना तो श्रीमंतवर्गाच्या शोषक चारित्र्याचा नेहमी उल्लेख करतो. त्याचा मित्र ईश्वरी श्रीमंत असतो, मनाचा उदार असतो. आपल्या गरीब मित्राची बोलणी शांतपणें सहन करतो. एकदा वीरला ईश्वरी आपल्याबरोबर आपल्या घरी नेतो– सुटी घालविण्यासाठी. या श्रीमंती ऐषाआरामाच्या आणि नोकरचाकरांवर शाही थाटाने हूकूमत गाजविण्याच्या जीवनाची थोड्याच वेळात वीरला 'नशा' चढू लागते. त्याचे मूळ समतेचे व विषमता विद्रोही विचार बदलत जाऊन तोही एक इतर श्रीमंत पण चढेल तरुणासारखा वागू लागतो. ही 'नशा' शेवटपर्यंत चढत जाते आणि शेवटी ईश्वरी त्याच्या वागण्यावर चिडून जाऊन म्हणतो– 'तू किती मूर्ख आहेस ! इथे त्याची नशा संपायला सुरवात होते. नशापाणी करून अद्वातद्वा वागणाऱ्या व बरळणाऱ्या माणसाची झिंग थोबाडात लगावल्यावर खाली यावी तसा परिणाम ईश्वरीच्या वाक्याने होतो. विरोध किंवा ताण या तत्वाचा मोठा कलात्मक प्रयोग प्रेमचंद करीत असत. या कथेत नशेचा आरोह जितक्या धिमेपणाने दाखवला आहे तसाच अवरोहही मोठ्या परिणामकारक पद्धतीने दाखवला आहे.

प्रथम प्रेमचंद वीरच्या श्रीमंतांविषयीच्या दृष्टिकोनाचे वर्णन करतात. ईश्वरी खानदानी रईस असतो. त्याच्या वागण्यात श्रीमंती, अधिकार व अरेरावी असतेच पण दुसऱ्या बाजूला मित्रांबरोबर वागताना उदारपणाही असतो. प्रेमचंदांचा गरीब वीर हा अनुभव सांगतो आहे. तो स्वतःबद्दल म्हणतो, 'कदाचित त्याच्या जागी मी असतो तर माझ्यात तोच कठोरपणा आला असता जो त्याच्यात होता. कारण माझे लोक– प्रेम सिद्धांतावर नाही तर स्वतःच्या अवस्थेवर आधारलेले होते. पण तो मात्र माझ्या जागी असता तरी सुद्धा श्रीमंतच राहिला असता. कारण तो स्वभावानेच विलासी आणि ऐश्वर्य प्रिय होता.'

दसऱ्याच्या सुटीत दोघे ईश्वरीच्या घरी जातात. ईश्वरी त्याला सूचना देतो की तिकडे जमीनदाराना उघडपणे शिव्या वगैरे देऊ नकोस पण सिद्धांतवीर अभिमानाच्या तोऱ्यांत सांगतो, 'तुला काय असे वाटते की मी तिथे जाऊन कोणी वेगळाच होईन ?'

आणि प्रवासाच्या सुरवातीपासूनच तो वेगळा होऊ लागतो. वीर आणि ईश्वर यांचे पोशाक, वागणे, रीतिरिवाज यातच इतके अंतर होते की खानसाम्यापासून सर्वांनाच झटकन कळत असे की मालक कोण आणि गळेपडू कोण. या

दोघातला विरोध व त्यांना मिळणारी वेगळी वागणूक व त्यातून वाढणारी सूक्ष्म ईर्ष्या यांचे मोठे खुमासदार चित्रण प्रेमचंदांनी केले आहे. द्वितीय श्रेणीने कधीच प्रवास न केलेला वीर प्रतापगडला डब्यात चढणाऱ्या एका माणसावर नकळत ओरडतो–' हा सेकंड क्लास आहे, ' तो मनुष्यही शांतपणे सांगतो, ' तेवढी माहिती या सेवकाला आहे.' वीर विलक्षण शरमतो. श्रीमंतीचा नशा नकळत चढू लागतो.

ईश्वरचे ज्या तऱ्हेने त्याचे नोकर स्वागत करतात त्याने वीर अधिकच शरमतो. प्रत्येक जण जणू त्याच्याकडे पाहून म्हणत असतो, ' तू कावळा या हंसा-बरोबर कसा ?' पण ईश्वर त्याची ओळख तो फार श्रीमंत जमीनदार आहे अशी करून देतो आणि त्याच्या बावळट वेषाबद्दल सांगतो– ' महाशय गांधींचे भक्त आहेत, खादीशिवाय काहीच वापरीत नाहीत !' इत्यादी. ईश्वरच्या या सर्व व्यवहारात एका पातळीवर या दरिद्री मित्राची मानहानी होऊ नये अशी इच्छा असते तर दुसऱ्या पातळीवर या मित्राला थोडी अद्दल घडवावी असा गंमतीदार हेतूही असतो. त्याच्या सर्व वागण्याचा हा दुपदरी थाट पाहिला की प्रेमचंदांच्या कलात्मकतेचा प्रत्यय अधिक उत्कटपणे जाणवतो.

ईश्वरच्या घरी खानदानी श्रीमंताच्या थाटात वीरला वागणे भाग पडते आणि त्यातून होणाऱ्या विसंगती, गंमतीजमती दाखवीत प्रेमचंद मानवी स्वभावा-बद्दलची आपली विलक्षण जाण व्यक्त करतात, आता तो ही छोटयाशा चुकांबद्दल नोकरांवर रागावू लागतो. ' मी ईश्वरपेक्षा नाजुक डोक्याचा बनलो होतो किंवा तसा बनणे भाग पडले होते. ईश्वरी एक वेळ आपल्या हाताने आपला बिछाना पसरील पण मेहमानसाहेब आपल्या हाताने बिछाना कसा पसरणार ? त्यांच्या मोठेपणावर कलंक लागेल ना !'

वीर नोकरांवर रागावतो. आपल्या खोटया ऐश्वर्याचे अतिरंजित वर्णन करून सर्वांवर छाप पाडण्याचा प्रयत्न करतो, ईश्वरीकडे येणाऱ्या एका ठाकुराला नोकरी देण्याचे आश्वासन देतो. प्रेमचंद त्या ठाकुराचे वर्णन करतात, ' असे कळले की त्या दिवशी ठाकुराने खूपच भांग झोकली. आपल्या पत्नीला खूप बडवले आणि गावच्या सावकाराबरोबर झगडा करायला तयार झाला. ' हे एखाद्या कसलेल्या चित्रकाराच्या तूलिकेचे ' स्ट्रोक्स ' प्रेमचंदांच्या मानवी मनाच्या जबर निरीक्षणाचे दर्शन घडवतात.

वीर पूर्ण बदलतो. कावळ्याला हंस होणे शक्य नसते पण हंसाची पिसे मात्र तो भरपूर लावतो. या घटनेतले कारुण्य आणि हास्य एकाच वेळी प्रेमचंदांनी व्यक्त केले आहे.

येतांना डब्यात प्रचंड गर्दी होती. जेमतेम तिसऱ्या वर्गाच्या डब्यात उभे राहायला जागा मिळाली. एका गावकऱ्याचे गाठोडे वीरच्या तोंडाला लागत राहाते श्रीमंतीची नशा चढलेली होतीच. वीर गांवकऱ्याला बडवू लागतो. तो गावकरी व आजुबाजूचे लोक त्याच्या या वागण्याबद्दल चिडून कटु टीकाटिप्पणी करू लागतात. शेवटी ईश्वरही म्हणतो– 'What an idiot you are Bir!' आता मात्र त्याची नशा उतरू लागते.

प्रेमचंदांनी कथेचा शेवट इतक्या प्रभावीपणे केला आहे की माणसाच्या मनाचा हा आरोह-अवरोह खूप काळ रसिकाच्या मनात अनेक विचारांची गर्दी करून टाकतो. एक गरीब माणूस श्रीमंती वातावरणात गेल्यावर त्याची जी गंमत होते, त्रेधा तिरपीट उडते, खोटे अवसान आणावे लागते त्याचे चित्रण करणारे छोटे छोटे प्रसंग मोठ्या चित्रात्मक कौशल्याने प्रेमचंदांनी उभे करून हा अनुभव फुलवला आहे. हे बारीकसारीक तपशील वास्तवाचे विश्वसनीय जग तर निर्मिलातच पण ते अनेकांगीही आहेत. असंख्य अनुभव– छटांनी हा केंद्रीय अनुभव समृद्ध केलेला आहे. यातला संयम आणि काटेकोरपणा कथेची प्रत खूपच वाढवतो.

## (११) दूध का दाम ('हंस' जुलाई १९३४)

वास्तवाच्या अनेक संदर्भाचे व पातळ्यांचे प्रेमचंदांना चांगलेच भान होते. जातीयता भारतीय समाजातले एक भयानक वास्तव. यावर आधारलेल्या अनेक कथांपैकी ही एक उत्कृष्ट कथा.

समाजातली आर्थिक विषमता आणि जातीयवादातून निर्माण झालेल्या स्पृश्यास्पृश्यतेच्या कल्पनांनी काही वर्गांना किती हीनदीन आणि पशुवत् जीवन कंठावे लागते याचे हे भेदक चित्रण. वरकरणी काहीसे हलकेफुलके वातावरण देऊन प्रेमचंदांनी या विषमतेचा अनेक बाजूने वेध या कथेत घेतला आहे.

बाबू महेशनाथांना तीन मुली झाल्या व नंतर मुलगा. प्रत्येक वेळी त्या गावात मदतीला आणावे लागे भंगिणीला. आता मुलगाच झाला पाहिजे ही इच्छा जितकी मातापित्यांची तितकीच भंगिणीची व तिच्या पतीची. कारण मुलगी झाली तर एक रुपया व साडी मिळायची ती मिळणार नाही हें त्यांचे भय. मुलगा झाला खरा पण मातेच्या स्तनातून दूधच येईना. शेवटी नाईलाजाने भंगिणीचे दूध मुलाला द्यायचे ठरते. भंगिणीचा रुबाब वाढतो, दबदबा वाढतो. एवढेच नव्हे तर प्रसंगी घरच्या मालकाला सुद्धा ती अक्कड दाखवायला कमी करीत नाही. मालकाच्या मुलाला भंगिणीचे दूध तर त्या भंगिणीच्या मुलाला मंगलला मात्र वरचे दूध. परिणामी मालकाचा मुलगा धष्टपुष्ट होतो तर मंगल रोडावतो.

सुमारे वर्ष झाल्यावर गावच्या शास्त्रीजींना या अधर्माचा राग येतो. भंगिणीचे दूध बंद केलें जाते. प्रायश्चित्त घेतले जाते आणि भंगिणीचा रुबाब कमी होतो.

प्लेगमध्यें मंगलचा बाप मरतो तर गटार साफ करताना मंगलची आई साप चाऊन मरते. मंगल एकटा पडतो. अनाथ मंगल महेशनाथांच्या उष्टयावर जगतो. त्याच्या जोडीला त्याचा टॉमी कुत्रा. मंगलच्या पोरकेपणाचे, लाचार जगण्याचे आणि त्याच्या व टॉमीच्या संबंधीचे मोठे मार्मिक चित्रण प्रेमचंद करतात.

मंगलला महेशनाथांचा मुलगा सुरेश घोडा बनायला सांगतो. भीतीने मंगल खेळायला तयार होत नाही. सुरेशनेही घोडा बनले पाहिजे हाही त्याचा हट्टी असतो. या साध्या घटनेला सहजपणे प्रतीकात्मक पातळी दिली आहे. शेवटी समाजात जे होते ते या कथेतही घडते. वरच्या वर्गाची मुले जबरदस्तीने मंगलला घोडा बनवतात व सुरेश त्याच्यावर बसतो. सुरेशच्या वजनाने मंगल पडतो व सुरेश भोकांड पसरतो.

आपल्याला मंगल शिवला असे खोटे सुरेश सांगतो. मंगलला मारायला आई तयार असते पण शिवाशिवीच्या भीतीने शिव्यावरच काम भागवते. मंगल हिरमुसला होऊन तिथे कधीच न येण्याचा निश्चय करून आपल्या जुन्या पडक्या झोपडीत जातो. बरोबर कुत्रा असतोच.

मंगल आणि कुत्रा यांच्या जगण्याची पातळी एकच हे मोठ्या कलात्मकतेने प्रेमचंदांनी सुचविले आहे.

भूक लागल्यावर याच मंगलचा निश्चय बदलतो, कुत्र्याबरोबर तो संवाद करतो. त्याच्या मनातले हे करुण परिवर्तन मोठ्या मानसशास्त्रीय जाणकारीने प्रेमचंदांनी दाखवले आहे. दोघेही उष्टी मिठाई, मलाई व भोजन यांच्या लालसेने सुरेशच्या घराच्या आसपास येतात. भोजने झालेली असतात. उष्ट्या पत्रावळी टाकण्यासाठी नोकर बाहेर येतो. मंगल कुठे आहे का पहातो. मंगल कृतज्ञतेने पत्रावळ घेतो. मंगल टॉमीला म्हणतो– 'पाहिलेस? ही पोटाची आग! या उष्ट्या भाकऱ्या न मिळत्या तर?' तो पुढे म्हणतो, 'सुरेशला आईने दूध दिले होते. दुधाचा दाम कोणीच देऊ शकत नाही. मला मात्र हा दुधाचा दाम मिळतो आहे.'

आरंभापासून शेवटपर्यंत दोन वर्गांच्या व वर्णांच्या जीवन-व्यापारांच्या विषमतेचे आणि उच्च वर्गाच्या स्वार्थपणाचे मोठे मार्मिक दिग्दर्शन प्रेमचंद या कथेत करतात. मात्र शेवटची मंगलच्या तोंडी दिलेली वाक्ये काहीशी त्याच्या मानसिक वयाला न शोभणारी वाटतात. तीच वाक्ये त्याच्या तोंडी न घालता आपले भाष्य म्हणून प्रेमचंदांनी दिले असते तर शेवटी काहीशी डागळलेली कथा निर्दोष व उत्कृष्ट कलेचा नमुना झाली असती. पण यापूर्वी प्रेमचंदांना अपेक्षित परिणाम ही कथा भरपूर प्रमाणात साधून जाते.

## (१२) बडे भाई साहब ('हंस' नोव्हेंबर १९३४)

एका छोट्या भावाच्या दृष्टीतून मोठ्या भावासंबंधी लिहिलेली ही कथा. काहीशा विनोदी 'व्हेन' मध्ये लिहिलेली पण शेवटी जीवनाबद्दल काही गंभीर सांगून जाणारी.

मोठा भाऊ पाच वर्षांनी मोठा असतो पण फक्त तीन इयत्ताच पुढे असतो. कारण शिकण्याच्या बाबतीत घाई करणे त्याला पसंत नव्हते, पाया मजबूत घालू इच्छित होता. एक वर्षाचे काम दोन वर्षात करीत होता. खेळात पुष्कळ वेळ घालवणाऱ्या पण पहिल्या क्रमांकाने दरवर्षी पास होत जाणाऱ्या आपल्या छोट्या बुद्धिमान भावावर देखरेख करणे व त्याला शिस्त लावणे ही आपली जबाबदारी आहे असे तो समजत होता.

प्रेमचंदानी त्याच्या अभ्यासाचे, खेळण्यात वेळ न दवडल्यामुळे होणाऱ्या कोंडमाऱ्याचे आणि त्यामुळे अभ्यासावर होणाऱ्या परिणामाचे मोठे मार्मिक चित्र

मोठ्या गमतीदार पद्धतीने आणि खुशखुशीत शैलीत काढले आहे. हे बडे भाईसाहेब आपल्या छोट्या भावाला वेळोवेळी उपदेश करीत. व्याख्यानासाठी आवश्यक असलेली वक्तृत्व शैली आणि वकीली युक्तिवाद करण्याचे सामर्थ्य ही प्रेमचंदांची वैशिष्टये या कथेत मोठ्या कलात्मकपणे उपयोगात आणली गेली आहेत. प्रथम ते छोट्या भावाला इंग्रजी शिकवणे कसे कठीण आहे ते सांगतात. आठव्या इयत्तेत आल्यावर किती प्रचंड मेहनत करावी लागेल ते सांगतात. परिणाम असा होतो की छोटा भाऊ मिनटामिनटाचा विनियोग करणारे टाईमटेबल ताबडतोब बनवतो. ते अमलात कधीच येणारे नसते. भाईसाहेब अभ्यासात गर्क असतात व छोटे भाई खेळण्यात. पण परीक्षेत बडे भाई नापास होतात व छोटे प्रथम क्रमांकाने पास ! पण म्हणून बड्या भाईसाहेबांचा उपदेश देण्याचा आणि छोट्या भावाला शिस्त लावण्याचा अधिकार काही कमी होत नाही मोठे भाई आपल्या सहज बुद्धीने यातूनही मार्ग काढतात. परीक्षेत पास होणे वेगळे आणि बुद्धीचा खरा विकास होणे वेगळे असा युक्तिवाद ते मोठ्या विस्ताराने छोट्या भावाला ऐकवतात ! गर्व करणारांची दशा काय होते याचे अनेक उदाहरणे देऊन वर्णन करतात. आठव्या इयत्तेत इतिहासासारखे विषय शिकताना किती त्रास होतो याचे मोठे खुमासदार वर्णन करून छोट्या भावाला धाबरवून सोडतात. निबंध लिहिताना कशा अडचणी येतात याचेही वर्णन करतात. या सर्व वर्णनात प्रेमचंदांच्या प्रसन्न व खमंग शैलीने मोठी बहार आणली आहे. छोट्या भावावर थोडा परिणाम होतो. पण खेळण्याचे क्षण आठवले की सर्व निश्चय पत्त्यांच्या बंगल्यासारखे कोसळतात !

पुन: परीक्षा होते. छोटा भाऊ पहिल्या क्रमांकाने पास होतो व मोठा पुन: नापास होतो. आता छोट्या भावात थोडी कुटिलता उत्पन्न होते. तो अधिकच खेळण्यात मग्न होतो. मोठे भाईही जरा नरम पडतात. प्रेमचंदांनी कथेला पुन: एक वेगळे वळण दिले आहे. पतंग उडविणाऱ्या मुलात सामिल झालेल्या आपल्या भावाला ते सांगतात की तू आता आठवीत आला आहेस. आठवी पास होऊन पूर्वी खूप मोठ्या नोकऱ्या लोकांनी मिळविल्या आहेत. जरा पोझिशनचा विचार करून वागायला हवे ! ते आपल्या नापास होण्याचा परीक्षकांच्या पातळीशी संबंध लावून सांगतात. 'पुढें तू माझ्या वर्गात येशील, पुढेही जाशील ! खरे ज्ञान पुस्तकांनी येत नसते अनुभवांनी येते.' हे सांगण्यासाठी अनेक उदाहरणे ते देतात.

शेवटी एक हुकमी पानं काढतात. 'तुझ्यात व माझ्यात जे अंतर आहे त तूच काय परमेश्वरही नष्ट करू शकणार नाही ! मी तुझ्यापेक्षा पांच वर्षांनी मोठा आहे. दुनियेचा अनुभव मला अधिक आहे. त्याची बरोबरी तुला कधीच करता येणार नाही !'– युक्तिवाद बिनतोड असतो आणि छोटा भाऊ नतमस्तकही होतो. या युक्तिवादाला फुलविण्यासाठी प्रेमचंदांनी जी अनेक उदाहरणे दिली आहेत ती फार मजेदार आहेत.

आता शेवटी ही कथा एका वेगळ्या मनोवैज्ञानिक पातळीवर प्रेमचंद नेतात.

'भाई साहेबांनी मला मिठी मारली आणि म्हणाले, 'पतंग उडवायला मी नको नाही म्हणत, माझे मन सुद्धा लालचावते. पण काय करू? मी स्वत:च चुकीच्या मार्गावरून चालू लागलो तर तुझे संरक्षण कसे करू ? हे कर्तव्य तर माझ्या शिरावर आहे !' हे भाईसाहेबांचे कथन सबंध कथेला एक वेगळे परिमाण देते. पण प्रेमचंदांनी आणखी एक कलात्मक वळसा दिला आहे.

'संयोगवशात त्याचवेळी एक तुटलेला पतंग आमच्यावरून गेला. त्याचा दोर लटकत होता. मुलांचा एक जत्था पाठीमागून धावत येत होता ! भाईसाहेब उंच होतेच. उडी मारून त्यानी तो दोर पकडला आणि वेगाने होस्टेलकडे धावडे. मी पाठीमागे धाऊ लागलो.' भाईसाहेबांच्या मनातली बालपणाची इच्छा इथे व्यक्त होतें. छोटया भावावर देखरेख करण्यासाठी आपल्या इच्छांचे हवन करणाऱ्या आणि परिणामी मनांत ग्रंथी निर्माण होण्यामुळे अभ्यासाकडे दुर्लक्ष होऊन नापास होत जाणाऱ्या या बडे भाई साहेबांबद्दल एक प्रकारची करुणाही निर्माण होते.

एका पातळीवर हलक्या फुलक्या शैलीत नर्म विनोदाची पखरण करीत लिहिलेली ही कथा दुसऱ्या पातळीवर बडेभाई साहेबांबद्दल काहीशी सहानुभूती-पूर्ण करुणा निर्माण करते. शैलीचा हा दुपेडीपणा एक महत्त्वाचे वैशिष्टय आहे.

## (१३) 'कफन' ('जामिया' १९३६)

ही प्रेमचंदांची बहुधा शेवटची कथा. या कथेतील महत्त्वाची पात्रे दोन– साठ वर्षांचा घीसु आणि त्याचा मुलगा माधव. दोघेही चांभार जातीचे. कथेचा प्रारंभ एका उग्रकठोर वास्तवाने होतो. माधवची पत्नी बुधिया प्रसवपीडेने व्याकुळ

होऊन रडत आहे आणि हे दोघे बापलेक बाहेर शेकोटीभोवती बसून बटाटे भाजून खात आहेत. आरंभापासून शेवटपर्यंत विरोधी गडद रंगाचा असा वापर प्रेमचंदांनी केला आहे की भयाण वास्तवाची अंधारी रात्र बिकट काळोख ओकते आहे असा भास होतो.

हे दोघे निकम्मे आहेत. या आळशांना कामावर बोलावण्यास कुणी तयार नाही. यांच्या आळसाचे कारण मात्र वैयक्तिक स्वभावच नव्हे तर एकूण समाज व्यवस्था आहे. घरात मूठभर धान्य आले तर काम करणे कठीण. गेलें वर्ष बुधियाने अंगमेहनत करून यांना पोसले. पण दोघेही अधिकच आळशी आणि बेमुवर्तखोर झाले. मर मर मेहनत करणारे शेतकरीं व शेतमजूर किती सुखात आहेत हे त्यांच्या डोळ्यासमोर होते. रक्त आटवून जर हातातोंडाची गाठ पडणे मुश्किल होते तर मेहनत करायचीच कशाला हा यांचा सीधा सवाल होता. त्यांना हेही माहीत होते की त्यांच्या सारखेच निकम्मे लोक गावात नेते बनले होते. अगदी दोन पॅरेग्राफ-मध्ये प्रेमचंदांनी जमीन आणि श्रम यांच्यापासून दुरावलेल्या मजूरांचे भेंदक चित्रण केले आहे !

या विलक्षण विद्रुप व भयावह अनुभवाला प्रेमचंदांनी मधूनच काहीशा वरवरच्या हास्योत्पादक घटनांनी नियंत्रित केले आहे. दोघे बटाटे खातात, भाजलेले बटाटे हावऱ्यासारखे खाताना तोंड भाजत होते. माधव आपल्या वेदनांनी विव्हळ-णाऱ्या बायकोला पहायला तयार नाही. वरकरणी तो म्हणतो, ' माझ्याच्याने तिची अवस्था पहावत नाही.' पण खरी गोष्ट वेगळीच असते. त्याला वाटते आपण आत झोपडीत गेलो तर बाप वाटयापेक्षा अधिक बटाटे खाईल. बटाटे खाताना घीसूला वीस वर्षापूर्वी ठाकुराच्या लग्नात झालेल्या भोजनावळीची आठवण येते व त्याचे रसभरित वर्णन तो माधवला ऐकवतो. दोघेही त्या आठवणींनी सुखावतात! वीस वर्षापूर्वी–कधीतरी पोटभर चांगले अन्न खाल्ल्याची स्मृती आजही घीसूला सुखावह वाटते–वास्तवाचे हे दारुण विद्रूप अंग वरकरणी विनोदी अंगाने प्रेमचंदांनी व्यक्त केले आहे. दोघेही पाणी पिऊन अजगरासारखे जमिनीवर आडवे होतात.

सकाळी बुधिया तिच्या अर्भकासह मरून पडलेली असते. एखादा किडा मरून पडावा तशी ही अवस्था. माधव घीसूला उठवतो व दोघे छाती पिटून रडण्याचे नाटक सुरू करतात. केवळ पोटाच्या पाठीमागें लागलेल्या घीसू–माधवचे मन इतके मुर्दाड झालेले असते की त्यांना पोसणारी घरांतली सून व बायको मेल्याचे

दु:ख असे होतच नाही. माणसाचे हे निष्प्रेम, निर्दय रूप ! पण या दोघांच्याबद्दल राग येत नाही. वाटते ती प्रचंड कीव ! कारण प्रेमचंदांनी या त्यांच्या रूपाला जबाबदार असणाऱ्या व्यवस्थेकडे उत्तमरीत्या निर्देश केलेला असतो.

प्रश्न आता बुधियाच्या प्रेताची विल्हेवाट लावण्याचा होता. दोघे जमीनदाराकडे जातात. जमीनदारी व्यवस्थेवर कुठाराघात करणारे प्रेमचंद लिहितात. ‘ जमीनदार साहब दयालु थे। मगर घीसू पर दया करना काले कम्बल पर रंग चढाना था।’ (प्रेमचंद व्यवस्थेवर कठोर हल्ले करीत पण व्यक्तींना सहानुभूती देत.) पैसे जमतात. गांवच्या बायका येऊन अश्रू ढाळून निघून जातात.

पांच रुपयांची रक्कम घेऊन दोघे ‘ कफन ’ खरेदी करायला निघतात... मनाला कोणताच कपडा येत नाही ! मनात विचार दुसरेच होते. एक दुसऱ्याचे मन पहात होते. शेवटी अनेक दुकाने धुंडाळल्यावर दोघेही अभावितपणे दारूच्या दुकानावर येतात.

दारूचा दौर सुरू होतो. कफन कसे मिळेल याची चिंता माधव व्यक्त करतो. अनुभवी घीसू म्हणतो, ‘ कफन मिळेल. ज्यांनी पैसे दिले तेच पुन: कफन देतील. फक्त पैसा आता आपल्याकडे देणार नाहीत.’ दोघांच्या निर्घृण स्वभावाचे मोठे प्रभावी चित्र प्रेमचंद रेखाटतात. दारूबरोबर खाणे येते. भोजनाची सामुग्री येते. दोघेही भरपूर खातात, उरलेली भिकाऱ्याला देऊन टाकतात. आयुष्यात देण्याचा गौरव पहिल्यांदा त्यांना प्राप्त होतो. दोघांच्या नशेतील बरळण्याचे वर्णन प्रेमचंदांनी मोठ्या कलात्मकतेनें केले आहे. या बरळण्यातून त्यांच्या स्वभावात निर्माण झालेला जडशिळपणा आणि निर्लज्ज बेरकीपणा व्यक्त होतो.

नशा चढते. दोघे बुधियाला आशीर्वाद देतात– मरतांना बिचारी त्यांना भरपूर खायला प्यायाला देऊन मेली. ती आता वैकुंठाला जाणार, दोघे नशेत गातात, नाचतात. बडबडतात. माधव खोटे रडतो. घीसू त्याला समजावतो– ती मुक्त झाली. जंजाळातून सुटली, मायामोहाची बंधने तुटली !’ ही टिपणी सर्व संदर्भात खूप भयानक वाटते. दोघे गातात– ‘ ठगनी क्यों नयना झमकाय ’ आणि नाचतात व नशा अतिशय चढल्यावर बेहोष होऊन जमिनीवर पडतात.

माणूस किती अमानुष झाला आहे याचे हे विदारक चित्रण. ही अमानुषता विशिष्ट व्यक्तींच्या मनाचा परिपाक नाही. हा अमानुषपणा सामाजिक, आर्थिक

व्यवस्थेचा परिणाम आहे. अर्थात घीसू व माधव यांचे विशिष्ट स्वभावही काही अंशी त्याला कारण आहेत. भयाण काळोख्या कधी न संपणाऱ्या बोगद्यात प्रवास करावा तसा हा विषण्ण व सुन्न करणारा अनुभव. याला सामाजिक वास्तवाची भलीभक्कम बैठक आहे. दृष्टीसंपन्न वाचक नसेल तर कदाचित या दोघांची कींव करीत तो मनोरंजन करणारी ही कथा वाचल्याचे समाधान मिळवील. पण वाचक सहृदय असेल, कल्पकतेचे देणे त्याला लाभले असेल, जीवनाची जाण प्रगल्भ असेल तर यातल्या वाक्यावाक्याला जे वजन आहे त्याने भारून जाईल, शब्दा शब्दातली सूचनात्मकता त्याला विद्ध करील आणि प्रसंगातला भयावह विदारकपणा त्याला सुन्न करील.

एकत्र कुटुंब फुटू नये म्हणून स्वतःच्या सुखाला तिलांजली देणारी ' बडे घर की बेटी ' आनंदी आणि स्वतःच्या सुखापुढे पत्नीबरोबरही अमानुषपणे वागणारा ' कफन ' मधला माधव ! मानवतेचा झरा अमानुषीकरणाच्या प्रक्रियेने आटून जात असताना विविध प्रकारच्या वास्तवाचे दर्शन घडवणाऱ्या उत्कृष्ट कथांचे अनुभव कण या महान कलावंताने टिपून घेतले आणि आपल्या प्रचंड प्रतिभेने ते फुलवले. एका गतिमान वास्तवाचा वेध घेणाऱ्या सुमारे ३०० कथांमध्ये एकासारखी दुसरी कथा दाखवणे अशक्य आहे. आणि म्हणूनच या अस्सल भारतीय कथाकाराचे वैश्विक दर्जाच्या कथाकारांबरोबर तुलनात्मक मूल्यमापन करणे आवश्यक झाले आहे.

●●

# शुद्धिपत्र

'व्यक्ति', 'वाङमय', 'रुप', 'स्वरुप', 'विद्रुप', 'करुन' हे शब्द सर्वच 'व्यक्ती', 'वाङ्मय', 'रूप', 'स्वरूप', 'विद्रूप' 'करून' असे वाचावे·

## काही महत्त्वाच्या दुरुस्त्या

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | ८ | प्रेमचंदानेही | प्रेमचंदानाही |
| ५ | ५ | हवी | (रद्द समजावा) |
| ५ | ६ | वर | व |
| ८ | ४ | निर्वतले | निवर्तले |
| ९ | २४ | ताडे | तोंडे |
| ९ | २८ | पडे | पंडे |
| ११ | ११ | बोलतेपणा | बोलकेपणा |
| ११ | १५ | दृष्ट | दुष्ट |
| ११ | १७ | 'रूडी राणी' | 'रूठी रानी' |
| १२ | २३ | उत्कृट | उत्कट |
| १२ | २४ | खुर्दारामसारख्या | खुदीरामसारख्या |
| १२ | २७ | त्यासाठी | त्यापाठी |
| १३ | ९ | स्तोत | स्त्रोत |
| १३ | १६ | गुलाबराय | नवाबराय |
| १५ | १४ | फाशी | फारशी |
| १५ | १७ | 'जस्वाए इसार' | 'जल्वाए इसार' |
| १९ | ५ | स्वास्थ | स्वास्थ्य |
| १९ | २८ | बुक्कीपिंग | बुक कीपिंग |
| १९ | ९ | वाज | ताज |
| १९ | १७ | प्रतिब्ड | प्रतिबद्ध |
| २३ | २० | लखन | लेखन |
| २३ | २५ | नस | नसे |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २३ | २८ | प्रेमचंद अपने घर में | प्रेमचंद घर में |
| २५ | १ | प्रसमध्ये | प्रेसमध्ये |
| २६ | १ | लागल | लागले |
| २६ | १६ | विपूल | विपुल |
| २६ | २० | आह | आहे |
| २८ | ३ | रामाँ रोलाँ | रोमा रोलाँ |
| २८ | २९ | अतिथ्य | आतिथ्य |
| ३० | १४ | विचचना | विवंचना |
| ३१ | २४ | नावने | नावाने |
| ३१ | २८ | क्षणानच | क्षणातच |
| ३२ | ७ | गोरखपुरा नाही | गोरखपुरी नाही |
| ३२ | १५ | मारवलेद्ध | भारवलेले |
| ३५ | २ | आराज | आवाज |
| ३५ | ९ | पुर्तीसाठी | पूर्तीसाठी |
| ३८ | १७ | Satrsfactory | Satisfactory |
| ४५ | २ | मृत्युकाळ फास | मृत्यू काळफास |
| ४८ | १ | घण्यासाठी | घेण्यासाठी |
| ४८ | २५ | कार्यस्थांच्या | कायस्थांच्या |
| ४९ | १५ | विरोध जागरुक | विशेष जागरुक |
| ५० | १७ | प्रजेचे | प्रज्ञेचे |
| ५१ | १ | द्यावा | द्यावे |
| ५३ | २ | घटना बदल | घटना बद्दल |
| ५८ | १७ | मार्ग | भाग |
| ५८ | २० | परस्वरुपकताच | परस्परपूरकताच |
| ५९ | २७ | लसकार | सरकार |
| ६० | ९ | जनमाणसावर | जनमानसावर |
| ६३ | १३ | व | (अनावश्यक) |
| ६३ | १७ | आक्षेपाचे | आक्षेपाची |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६४ | २४ | समकालिन | समकालीन |
| ६४ | २५ | जन्मजात | जन्मजात विद्रोही |
| ६५ | १५ | टाळू शकले नाहीत | टाळू शकला नाही |
| ६६ | ५ | सांचे | साचे |
| ७३ | २ | स्वच्छंदा | स्वच्छंद |
| ७३ | २० | नसेल | नसते |
| ७७ | १ | सामान्यही | परंपरागत |
| ७७ | २ | संबंध | सम्बद्ध |
| ७७ | २२ | कादंबऱ्या | कादंबऱ्यांत |
| ७९ | ७ | अनुभवच्या | अनुभवाचा |
| ८० | ७ | रेखांक | रेखांकन |
| ८० | ७ | अंतविरोध | अंतर्विरोध |
| ८० | २३ | कुशल | कूशल |
| ८० | २६ | निरर्थकतेच्या | निरर्थकतेचे |
| ८० | २६ | कंटाळवाणेपणाची | कंटाळवाणेपणाचे |
| ८९ | २७ | सबखू | सक्खू |
| ९० | २७ | वापटु | वाक्पटु |
| ९६ | १८ | अस्खलित | स्खलित |
| ९८ | २६ | रंगभूमी | रंगभूमि |
| ९८ | २८ | रंगभूमी | रंगभूमि |
| १०६ | १३ | आंतरीक | आंतरिक |
| १०८ | १८ | असतोल | असतोच |
| १११ | १ | मारपटी | मारपीट |
| १११ | २२ | मिठुवा | मिठुवाला |
| ११५ | १५ | कर्मभूमी | कर्मभूमि |
| ११९ | २२ | होते | होणे |
| १२० | २ | अमरकांतला | समरकांतला |
| १२२ | २४ | सर्वेक्षणी | सर्वेक्षणे |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२५ | ८ | तर | तर ? |
| १२५ | १० | नेतृत्व समाजाचे | समाजाचे नेतृत्व |
| १२७ | ९ | सलीमा–सकीना | सलीम–सकीना |
| १२७ | १४ | परिवर्तना | परिवर्तनाचा |
| १३० | २३ | या ती | ती या |
| १३७ | १४ | दांपत्याने | दांपत्याचे |
| १३७ | १७ | विशेषषत्वाने | विशेषत्वाने |
| १३८ | १० | अतिरिक | आंतरिक |
| १३८ | २१ | येऊन | घेऊन |
| १४० | २८ | अनुभव | अनुभाव |
| १४१ | २९ | मान | भान |
| १४६ | २६ | त्या त्या | त्यांच्या |
| १५१ | २२ | सांगत | सांगते |
| १५३ | ५ | जागत | जागृत |
| १५६ | १ | सारख | सारखे |
| १५६ | १६ | खळ | खेळ |
| १६० | १२ | राहीली | राहिली |
| १७६ | १ | त | ते |
| १७६ | १६ | धाबडे | धावले |

